# अनुक्रमणिका

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

# निवेदन

पाश्चिमात्यांच्या १५० वर्षांच्या गुलामगिरीने आमच्या समाजमनावर जिहादबद्दल अत्यंत चुकीचा समज करून दिला आहे. जिहादचे नाव ऐकताच आम्ही त्वरिंत दोन्ही कानांवर हात ठेवून लागलीच तोंड लपविण्याचा प्रयत्न करू लागतो. स्वातंत्र्यपूर्व काळात तर भले भले ज्ञानी लोकसुध्दा जिहादचे नाव ऐकून विचलीत होऊन जात असत. शारीरिक आणि मानसिक गुलामगिरीच्या या कठीण काळांत मौलाना सय्यद अबुल आला मौदूदी यांनी मोठ्या हिमतीने जिहादवर लिहीण्यासाठी लेखणी हातात घेतली. संशोधनात्मक आणि विद्धत्तापूर्ण लिखाण करून त्यांनी एक श्रेष्ठतम ग्रंथ जिहाद याविषयी उपलब्ध करून दिला. मूळ ग्रंथ उर्दूत असून त्याचे शीर्षक आहे 'अल् जिहाद फिल इस्लाम'. हा ग्रंथ स्वकीयांना आणि परकीयांनासुध्दा चांगलाच भावला आहे. जगातील कोणत्याच भाषेत याविषयी इतका सविस्तर ग्रंथ दुसरा नाही, हे म्हणणे अतिशयोक्तीचे ठरणार नाही.

हा ग्रंथ मौलाना साहेबांच्या ग्रंथसंपदेतील पहिले पुष्प आहे. आज पासून ७०-७५ वर्षापूर्वी लिहिलेला हा ग्रंथ आजही संदर्भानुरुप उपयुक्त सिध्द होत आहे.

# प्रस्तावना

मागील काळात युरोपीय देशांनी आपल्या राजनैतिक फायद्यासाठी इस्लामवर आरोप प्रत्यारोप केले आहेत. त्यापैकी सर्वांत मोठा आरोप हा आहे की इस्लाम एक आतंकवादी धर्म आहे आणि आपल्या अनुयायींना हिंसेची शिक्षा देत असतो. या आरोपात काहीसुध्दा तथ्य असते तर स्वाभाविकत: जेव्हा इस्लामच्या शांती संदेशाद्वारे आणि प्रेमाच्या तलवारीने बहुसंख्य भूभागावर अधिराज्य स्थापित केले; काय त्या वेळी इस्लामच्या अनुयायींनी यासाठी हिंसेचा आधार घेतला होता? हा आरोप इस्लामच्या वैभवकाळात न लावता नंतरच्या काळात लावण्यात आला ही आश्चर्याची बाब आहे. ज्या वेळी इस्लामच्या तलवारीला गंज चढला त्या काळी हा आरोप पुढे आला. परंतु आरोप लावणारे युरोपियन व पाश्चात्यांची तलवार तर असहाय आणि नि:ष्पाप लोकांच्या रक्ताने त्या काळी माखून गेली होती, हे ऐतिहासिक सत्य आहे. त्या काळी जगातील लहान लहान अशक्त देशांना युरोपियन एखाद्या अजगरासारखे गिळंकृत करीत होते. जगाने त्या काळी अक्कल गहाण ठेवली नसती तर विचारणा केली असती की जे शांती आणि श्रध्दाशीलतेचे सर्वात मोठे शत्रू आहेत, ज्यांनी रक्तपात करून जमिनीचा रंग बदलून टाकला आहे, जे स्वत: दुसऱ्या देशांवर डाके टाकत आहेत, अशांनी कोणत्या तोंडाने शांतीप्रिय इस्लामवर हा खोटा आरोप करावा? हा आरोप तर त्यांना तंतोतंत लागू होतो. त्यांचा हा तर हेतु नाही ना की स्वत:च्या अत्याचाराचा आणि हिंसेचा दुष्परिणाम स्वत:ला भोगावा लागणार तो टाळण्यासाठी इस्लामला बदनाम करण्याची मोहीम त्यांनी सुरू केली असावी. हा मानवी स्वभाव आहे की जो मैदानात पराजित झाला तर त्याची मानसिकता बनते की विजयी जे शिकवतो त्याला ते प्रमाण मानू लागतात. विजयी तलावरीने पराजित झालेले विजयी लेखणीचासुध्दा मुकाबला करू शकत नाहीत. जगात अशा अत्याचारींचा बोलबाला याच कारणाने होतो. अशा स्थितीतच 'जिहाद' याविषयी पाश्चात्यांना जगात अपप्रचार करण्यास चांगलाच वाव मिळाला. पराजित मानसिकतेच्या जगाने पाश्चात्यांच्या या अपप्रचाराला न पारखता सत्य मानले. ईशवाणीलासुध्दा इतक्या सहजासहजी मान्य केले गेले नसते !

मागील शतकात आणि या २१ व्या शतकात 'जिहाद'च्या अपप्रचाराला समर्पक असे उत्तर देण्यात आलेले आहे आणि फार काही या विषयी लिहिण्यात आले आहे. परंतु त्याचे स्वरुप असे आहे की गुन्हेगाराच्या पिंजऱ्यात उभे राहून गुन्हेगाराने आपली बाजू मांडत राहावी. काही महाभागांनी तर आपली बाजू पक्की करण्यासाठी इस्लामी कायद्यातच

ढवळाढवळ सुरू केली. बाकीच्यांनी मात्र जिहादचे खरे स्वरुप मांडण्याचा प्रयत्न जरुर केला परंतु हातचे राखूनच! अपप्रचाराला सडेतोड उत्तर देण्यासाठी कुरआन आणि हदीसच्या प्रकाशात 'जिहाद'ची ओळख होणे गरजेचे आहे. हे अत्यंत चुकीचे आहे की आम्ही इतरांच्या दृष्टिकोनातून आपली श्रध्दाशीलता तपासून पाहावी. जगात कोणताच प्रश्न असा नाही की ज्यास तमाम मनुष्य एकाच नजरेने पाहतील. प्रत्येकजण आपला आपला दृष्टिकोन ठेवून आहे आणि त्यालाच सत्य समजतात. दुसऱ्यांना खूष करण्यासाठी त्यांच्या चश्म्यातून आपल्या प्रश्नांकडे पाहिले तरी आपण इतर सर्वांचे समाधान करू शकत नाही. यासाठी सर्वोत्कृष्ठ मार्ग हा आहे की आम्ही आपल्या धर्माच्या रूढीपरंपरांना आणि आदेशांना आणि शिकवणींना त्यांच्या मूळ स्वरुपात जगासमोर मांडत जावे आणि सत्य पुरावे देत जावेत आणि निर्णय घेणे लोकांवर सोडून द्यावे की त्यांनी मान्य अथवा अमान्य करावे. मान्य केले तर तो नशिबवान ठरेल. जर अमान्य केले तर त्याची आम्हाला काही पर्वा नाही. हाच नियम प्रचार–प्रसाराबद्दलचा खरा नियम आहे, ज्यास पैगंबरांनी अवलंबिले आहे.

मी दीर्घ काळापासून यास आत्मसात करण्याचा विचार करीत होतो परंतु फक्त विचारच! परंतु या महत कार्यासाठी वेळेची नितांत गरज आहे आणि मी पडलो एक पत्रकार!

परंतु डिसेंबर १९२६ साली एक घटना घडली ज्यामुळे मी विचारांना अंमलात आणण्यासाठी मजबूर झालो. शुध्दीकरण चळवळीचे प्रमुख श्रध्दानंद यांची हत्या झाली होती. हत्या एका मुस्लिमाने केली होती त्यामुळे 'जिहाद'ला आणखी बदनाम करण्यासाठी विरोधकांच्या हातात कोलीत सापडले होते. "स्वामीला इस्लामशत्रू मानून त्याने त्यांची हत्या केली त्यामुळे त्याला स्वर्गप्राप्ती होईल कारण त्याने स्वामींची हत्या करून एक पुण्य कर्म केले आहे," अशा प्रकारचा मजकूर वर्तमानपत्रात छापून येत होता. त्यांनी या कृत्यासाठी प्रत्यक्ष इस्लाम आणि इस्लामी शिकवणीला जबाबदार ठरविले होते. जाहीररित्या कुरआनला आरोपीच्या पिंजऱ्यात उभे करून आरोपित केले की कुरआन शिकवणींमुळेच मुस्लिमांमध्ये दहशतवाद आणि आतंकवाद फैलावला आहे. प्रत्येक काफीराला ठार करून स्वर्गप्राप्तीचा मार्ग मोकळा करण्याची शिकवण कुरआन देतो, असे आरोप ठेवण्यात आले. काही करंट्यांनी तर येथपावेतो मजल मारली की जगात जोपर्यंत कुरआन आहे तोपर्यंत शांती नांदू शकतच नाही. म्हणून सर्वांनी मिळून कुरआनच्या शिकवणुकीला संपविण्याचे प्रयत्न केले पाहिजे. हा अपप्रचार इतक्या प्रभावीपणे करण्यात आला की ज्ञानी लोकसुध्दा चक्रावून गेले. महात्मा गांधीसारख्या लोकांनासुध्दा त्या काळी दबावाखाली म्हणावे लागले की, "इस्लाम अशा स्थितीत उदयाला आला ज्याची निर्णायक ताकद पूर्वीही तलवार होती

आणि आताही तलवार आहे."

वरील सर्व अपप्रचार विचारांती आणि अभ्यासपूर्वक केलेला नव्हता तर पोपटाप्रमाणे पुन्हा पुन्हा सांगितला जात होता. परंतु वरील असामान्य परिस्थितीमुळे सत्यशोधन कार्य पुढे आले. इस्लामच्या प्रसारकार्यांत अशा घटना घडतच असतात आणि याचवेळी इस्लामची शिकवण देण्यास भरपूर वाव राहतो. म्हणूनच मी माझ्या कार्यबाहुल्यातून वेळ काढून 'जिहाद' या विषयावर सविस्तर लिहिण्यास प्रारंभ केला. हा ग्रंथ जरी विस्तृत असला तरी काही बाबींवर माझ्या मनासारखा खुलासा मी करू शकलो नाही, याची मला खंत आहे. या ग्रंथात समस्त चर्चा फक्त कुरआन आणि हदीसच्याच प्रकाश झोतात केली आहे. यात माझे मत अथवा इतरांच्या मतांना मुळीच वाव दिला नाही.

मी तमाम हिंदु व मुस्लिमेतर बांधवांना जे द्वेषभावनेतून इस्लामबद्दल आंधळे शत्रुत्व ठेवत नाहीत, अशांना विनंती करतो की या ग्रंथातून इस्लामच्या शिकवणीनुसार युध्दाबद्दल त्यांनी अभ्यास करावा. अभ्यासांति त्यांना काही आक्षेप असेल तर खुल्या दिलाने समोर ठेवावे. मी त्यांच्या शंका निरसन करण्याचा प्रामाणिक प्रयत्न करील.

**अबुल आला,**
दिल्ली १५ जून, १९२७.
प्रस्तावना द्वितीय आवृत्ती

हा ग्रंथ अल्पावधित प्रसिध्दीच्या शिखरावर पोहचला आहे. विश्व युध्दकाळात त्याची रचना फार कठीण होती. दुसऱ्या महायुध्दाच्या वेळी जे आंतरराष्ट्रीय नियम बनत गेले आणि त्यात बदल होत गेले त्यांचा येथे परामर्श घ्यावा हा उद्देश होता. परंतु माझ्या प्रकृती अस्वस्थामुळे मी ते करू शकलो नाही. आता हा ग्रंथ थोड्या काही सुधारणा करून प्रकाशित केला जात आहे. जर अल्लाहने मला कार्यशक्ती पुन्हा बहाल केली तर मी पुढील आवृत्तीत अपेक्षेप्रमाणे सुधारणा करीन.

**अबुल आला,**
३१ जुलै १९७४.

प्रकरण १

# इस्लामी जिहादची वास्तवता

**मनुष्यप्राणाचे महत्त्व :-** व्यक्तीस्वातंत्र्याचा पाया ज्या कायद्यावर अवलंबून आहे त्याचा पहिला कलम हा आहे की मनुष्यजीव आणि रक्त पवित्र आहे. मनुष्याच्या व्यक्तीस्वातंत्र्याचा सर्वप्रथम हक्क जिवंत राहण्याचा आहे. जगातील सर्व धर्मशास्त्रात या हक्कास प्राधान्यक्रम दिलेला आहे. ज्या धर्मात या हक्काला जागा नाही तो मानवी धर्मच नाही. अशा धर्माच्या आधीन राहून मानव समाज उदयाला येऊ शकत नाही की जगात शांतता नांदू शकत नाही. हे सर्वज्ञात आहे की जिथे मनुष्यजीवाची कदर नाही तसेच त्याच्या संरक्षणाची काही एक व्यवस्था नाही, अशा स्थितीत चार माणसं मिळून मिसळून गुण्यागोविंदाने राहूच शकत नाही. अशा स्थितीत समाजघडण व समाजाची प्रगती अशक्य ठरते. मानवी दृष्टिकोनातूनसुध्दा स्वार्थासाठी अथवा ऐहिक फायद्यासाठी आपल्या एखाद्या बंधुला ठार मारणे एक कठोरतम कृत्य आहे. मानवता अशा स्थितीत तग धरूच शकत नाही. जगातील राजकीय कायदे–कानूनमध्ये या मानवी स्वातंत्र्याच्या हक्काला शिक्षेच्या भीतीपोटी आणि सामर्थ्याच्या बळावर कायम ठेवले जाते. परंतु खऱ्या धर्माचे हे कर्तव्य आहे की मानवी स्वातंत्र्याबद्दल मानवांमध्ये आत्मियता निर्माण करणे आहे. मानवी शासनाची भीती अथवा पोलीस बळ नसले तरी तिथे मानवी जीव आणि रक्ताला आदर सन्मान प्राप्त असतो. इस्लाम मनुष्यजीवाला जो आदर सन्मान देतो तो इतर धर्मात सापडणे अशक्य आहे. कुरआनमध्ये याविषयी वारंवार उल्लेख आलेला आहे. 'मायदा' या अध्यायात आदम (अ) यांच्या दोन पुत्रांचा उल्लेख आला आहे. एकाने दुसऱ्याला निर्दयीपणे ठार केले. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"याच कारणास्तव बनी इस्राईलकरिता आम्ही हे फर्मान लिहिले होते की, ज्याने एखाद्या माणसाला खुनाबद्दल अथवा पृथ्वीतलावर उपद्रव पसरविण्याव्यतिरिक्त अन्य कारणाने ठार केले तर त्याने जणूकाही सर्व मानवांना ठार केले आणि ज्याने कोणाला जीवनदान दिले त्याने जणूकाही सर्व मानवजातीला जीवन प्रदान केले.परंतु त्यांची अवस्था अशी आहे की आमचे पैगंबर वरचेवर त्यांच्यापाशी उघड उघड आदेश घेऊन आले तरीसुध्दा त्यांच्यात मोठ्या संख्येने पृथ्वीवर अतिरेक करणारे लोक आहेत." *(दिव्य कुरआन, ५:३२)*

कुरआनमध्ये दुसऱ्या एका ठिकाणी अल्लाह आपल्या सदाचारी दासांची वैशिष्ट्ये वर्णन करत आहे की -

"जे अल्लाहशिवाय इतर कोणत्याही उपास्याचा धावा करीत नाहीत, अल्लाहने

निषिद्ध ठरविलेल्या कोणत्याही जिवाला हकनाक ठार करीत नाहीत आणि व्यभिचारही करीत नाहीत, हे कृत्य जो कोणी करील तो आपल्या गुन्ह्याचे फळ भोगील."

*(दिव्य कुरआन, २५:६८)*

दुसऱ्या एका ठिकाणी कुरआनस्पष्टोक्ती आहे,

"हे पैगंबर (स.) यांना सांगा की, या, मी तुम्हाला ऐकवितो की तुमच्या पालनकर्त्याने तुमच्यावर काय निषेध घातले आहेत. हे की त्यांच्यासमवेत कुणालाही भागीदार बनवू नका आणि आईवडिलांशी सद्‌वर्तन करा. आणि आपल्या संततीला दारिद्र्याच्या भीतीने ठार मारु नका, आम्ही तुम्हालादेखील उपजीविका देतो आणि त्यांनाही देतो व अश्लील गोष्टीच्या जवळपासदेखील फिरकु नका मग त्या उघड असोत अथवा गुपित आणि कोणत्याही जीवाला ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले आहे ठार करु नका परंतु न्यायसंगत (असेल तर)." *(दिव्य कुरआन, ६:१५१)*

या शिकवणींना आत्मसात करणारे प्रथमत: ते लोक होते ज्यांच्याजवळ मानवी जीवाची किंमत शून्य होती आणि जे आपल्या स्वार्थापोटी आपल्या मुलाबाळांना सहज ठार करत असत. या लोकांना अत्यंत प्रभावीपणे मानवी हक्कांबद्दल धडे दिले जात होते. या संदर्भात अनेक हदीसी उपलब्ध आहेत, त्यापैकी काही खालीलप्रमाणे आहेत,

"महाभयंकर गुन्हयामध्ये सर्वात भयंकर गुन्हा अल्लाहसमवेत कुणालाही भागीदार बनविणे तसेच कोणत्याही जीवाला ज्याला अल्लाहने आदरणीय ठरविले आहे. ठार करणे, आपल्या आईवडिलांचा अनादर करणे आणि खोटे बोलणे."

"श्रध्दावंत आपल्या धर्मकक्षेत तोपर्यंतच असतो जोपर्यंत तो अल्लाहने निषिध्द केलेले रक्त सांडत नाही (नाहक कुणाला ठार करीत नाही)."

"पुनरुत्थानाच्या दिवशी दासांकडून सर्वप्रथम नमाजचा हिशोब घेतला जाईल आणि लोकांच्या दरम्यान खुनाच्या दाव्यांचा निकाल लावला जाईल."

एकदा एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ येऊन म्हणाली, "सर्वात मोठा गुन्हा कोणता आहे?" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले, "अल्लाह समवेत कुणाला भागीदार ठरविणे जेव्हा की त्याने तुला निर्माण केले." त्या व्यक्तीने पुन्हा विचारले, "यानंतर मोठा भयंकर गुन्हा कोणता आहे?" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले "तू आपल्या संततीला उपजीविकेखातर ठार करणे." त्या व्यक्तीने पुन्हा विचारले, "यानंतर मोठा गुन्हा कोणता?" त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) म्हणाले, "तू तुझ्या मित्राच्या बायकोशी

व्यभिचार करणे.''

**इस्लामी शिकवणींचा जगावर झालेला परिणाम** - मानवी स्वातंत्र्य आणि मानवी जीवाचा आदर सन्मान हे काही एखाद्या तत्त्वज्ञानीचे ज्ञान पाजळणे नव्हे की जे फक्त पुस्तकाची शोभा वाढवते. ही शिकवण अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांची शिकवण आहे ज्याचा प्रत्ये शब्द श्रध्दावंतासाठी श्रध्देय आहे. त्यानुरुप आचरण करणे श्रध्दावंतासाठी अनिवार्य आहे. पाव शतकाच्या अल्पशा काळात या शिकवणींमुळे हिसांचारी आणि रानटी लोकांत मानवी स्वातंत्र्य आणि मानवी जीवाचा आदर–सन्मान श्रध्दाशीलतेचा एक अंग बनला. त्यामुळे पैगंबर मुहम्मद (स.) यांची भविष्यवाणी खरी ठरली की अरबस्तानच्या एका टोकापासून ते दुसऱ्या टोकापर्यंत एकटी स्त्री भीतीमुक्त प्रवास करील.

हा तोच प्रदेश होता ज्यात मोठमोठ्या टोळ्या प्रवास करू शकत नव्हत्या. जगातील मोठ्या भूभागावर इस्लामी शासन प्रस्तापित झाले आणि इस्लामी शिकवणींचा परिणाम चहुकडे दिसू लागला. मानवी जीवाची कदर जग करू लागले. आज जगातील ज्या काही धर्मात मानवी जीवाला आदर दिला जातो तो याच इस्लामी क्रांतीचा परिणाम आहे. ज्या काळात अल्लाहची शिकवण अवतरित झाली होती त्या काळी मानवी जीव कवडीमोल होते. अरबी लोकांप्रमाणे जगातील इतर देशांतसुध्दा हीच परिस्थिती होती. ही राष्ट्रे त्या काळी 'प्रगत' म्हणून गणली जात परंतु पशुपेक्षा हीन दर्जा मनुष्याचा या 'प्रगत देशांत' होता. कैदी, गुलाम आणि काळ्या निग्रोंवरील अत्याचार आणि त्यांना हालहाल करून ठार करणे हा युरोप आणि आशिया खंडाचा इतिहास आहे. रोममध्येसुध्दा हजारो लोकांना नाहक ठार केले गेले. बापाला आपल्या संततीला ठार करण्याचा अधिकार होता. या कायद्याचा रोमन लोकांना गर्व होता. एवढेच काय पण मनुष्याने स्वत:हून स्वत:ला ठार करणे हे वाईट कर्म समजले जात नसे. हे एक प्रतिष्ठापूर्ण व समाजमान्य कार्य होते. लोक उत्सव साजरे करुन सामूहिकरित्या आत्महत्या करीत होते. पतीने आपल्या पत्नीची हत्या करणे इतके सहज होते की जसे एखाद्या पाळीव प्राण्याची हत्या करणे. त्या देशांच्या कायद्यात कोणतीच शिक्षेची तरतूद नव्हती. भारतात तर यापेक्षाही भयंकर स्थिती होती. पतीच्या चितेवर पत्नीला जिवंत जाळली जात असे. ही 'सती' प्रथा धर्ममान्य आणि समाजमान्य होती. शूद्र मनुष्याचा जीव कवडीमोल होता. तो शूद्र मनुष्य ब्रम्हाच्या पायापासून निर्माण झाला आहे म्हणून त्याचे रक्त सांडणे (ठार मारणे) ब्राम्हणासाठी शिक्षापात्र गुन्हा नव्हता. वेद ऐकणे हा शूद्रांसाठी भयंकर मोठा गुन्हा होता, ज्याची शिक्षा त्यांच्या कानात गरम वितळलेले शिशे टाकून दिली जात असे. असे करणे आवश्यक समजले जात होते. 'जलार्पण' ही प्रथा सर्वमान्य होती, ज्यामध्ये मुलाचे आई-वडील आपल्या पहिल्या जिवंत मुलाला पाण्यात सोडून त्याची हत्या करणे पुण्य समजत होते.

अशा अंधारयुगात इस्लामने गर्जना केली की **"अल्लाहने निषिध्द केलेल्या कोणत्याही जीवाला हकनाक ठार करू नका."** मानवी जीवाला अल्लाहने निषिध्द ठरविले की त्याला नाहक ठार करू नका परंतु न्यायसंगतपणे. त्या गर्जनेत एक शक्ती होती. ती गर्जना सामर्थ्यशाली होती ज्यामुळे तो आवाज जगाच्या कानाकोपऱ्यात जाऊन पोहचला आणि जगाला मनुष्य जीवाचे महत्त्व पटवून देण्यात आले. जगातील प्रत्येक धर्माने या नैतिक परिणामाचा स्वीकार केला. मानवी इतिहासात या **"ईशगर्जनेचा"** न्यायप्रिय मनुष्य स्वीकार करू लागला. नैतिक शिकवणींपैकी मनुष्यजीवाचे रक्षण आणि आदर–सन्मान देण्यात इस्लामच्या या ईशगर्जनेचाच फक्त वाटा आहे. प्रदीर्घ व्याख्याने आणि अहिंसापरमोधर्म या घोषणा याकामी निकामी ठरल्या आहेत.

**न्यायसंगत हत्या** - थोडे थांबून विचार करा की अल्लाहने फक्त "कोणत्याही जीवाला हकनाक ठार करू नका" असाच आदेश दिला नाही तर त्याच वाक्यात पुढे स्पष्ट केले आहे की "परंतु न्यायसंगतपणे" म्हणजेच पृथ्वीवर उपद्रव पसरविण्याबद्दल आणि खुनाबद्दल. असे सांगितले गेले नाही की कोणत्याही जीवाला कोणत्याही परिस्थितीत ठार करू नका. अशी शिकवण ही सदोष ठरली असती, ते न्यायसंगत नसते तर अत्याचारी कृत्य असते. जगाला याची गरज नव्हती की मनुष्याला कायद्याच्या पकडीतून मुक्त करावे आणि त्याला पूर्ण स्वातंत्र्य दिले जावे की त्याने वाटेल तेवढे उपद्रव माजवावे, अशांती माजवावी आणि हिंसा व अत्याचार करावे. अशी दुष्कृत्यें करणारे अशा स्थितीत आदर–सन्मानाला पात्र ठरले असते. त्यांचा जीव घेणे (ठार करणे) निषिध्द ठरले असते. परंतु खरी गरज ही आहे की जगात शांती नांदावी, अत्याचार उपद्रव समूळ नष्ट व्हावे आणि असे कायदे बनवावे की प्रत्येकजण मर्यादित स्वतंत्र असेल आणि कोणीही दुसऱ्याच्या शांतीमय जीवनात ढवळाढवळ करणार नाही. याचसाठी अल्लाहने "कोणत्याही जीवाला हकनाक ठार करू नको" एवढाच फक्त आदेश दिला नाही तर "परंतु न्यायसंगतपणे" हा उल्लेख करून एक सामर्थ्य आणि शक्तीकेंद्र अपेक्षिले. अन्यथा न्यायाऐवजी अन्याय आणि शांतीऐवजी अत्याचार, हिंसा, अशांती जगात माजली असती.

जगाचा कोणाताही कायदा शक्तीहीन असेल तर त्याला सफलता प्राप्त होणार नाही. हा मानवी स्वभाव नाही की त्याला काही आदेश दिला तर स्वखुशीने त्याने त्याचे पालन करावे आणि ज्यापासून मनाई केली त्यापासून स्वखुशीने दूर राहावे. असे जर असते तर जगात अत्याचार आणि उपद्रव नावालासुध्दा सापडला नसता. मनुष्य सदाचार आणि दुराचार दोन्ही करत राहतो. म्हणूनच त्याला आदेशाचे पालन करण्यास भाग पाडले जाते आणि मनाईचा हुकूम बचावला नाही तर त्याला परिणामांना सामोरे जावे लागते. अल्लाहने फक्त असेच आदेश दिलेले नाहीत की "जगात सुधारणा झाली असल्याने त्यात आता उपद्रव माजवू नका" अथवा "ज्या जीवाला

अल्लाहने निषिध्द केले आहे त्याला ठार करू नका'' असे आदेश देणे परिपूर्ण ठरले नसते. अशा आदेशांचे पालन न केल्यास त्यात शिक्षेचे प्रावधान नसते. मानवनिर्मित कायद्यात या त्रुटी राहाणे स्वाभाविक आहे, परंतु अल्लाहने निर्माण केलेले कायदे हे दोष आणि त्रुटीविरहित आहेत. अल्लाहने स्पष्ट शब्दांत आदेश दिला आहे की मानवी जीव तोपर्यंतच निषिध्द आहे जोपर्यंत तो सत्याधिष्ठित आहे. मनुष्याला जगण्याचा हक्क हा मर्यादाहीन असा नाही. परंतु मनुष्य जेव्हा मर्यादा भंग करून जगात उपद्रव माजविण्याला सुरवात करतो आणि दुसऱ्याची नाहक हत्या करू लागतो तर अशा स्थितीत त्याचा जगण्याचा हक्कसुध्दा संपुष्टात येतो. अशा व्यक्तीला ठार करणे न्यायसंगत ठरते कारण त्याचा मृत्यू हा मानवतेसाठी जीवन ठरते. म्हणून अल्लाहने आदेश दिला, ''हत्या वाईट कृत्य आहे परंतु त्यापेक्षा जास्त वाईट कृत्य उपद्रव माजविणे आहे.'' म्हणून उपद्रवींना ठार करणे न्यायसंगत आहे. ज्याने दुसऱ्याचा जीव नाहक घेतला त्याला 'हत्यादंड' आहे. अशा रीतीने या बाबतीत उच्च–नीच लोकांतील भेदभावसुध्दा नाहीसा केला. श्रीमंताने गरीबाला अथवा मालकाने गुलाम, नोकराला ठार केले अथवा ब्राम्हणाने शूद्राला ठार केले तर क्षम्य आहे, ही अमानुष आणि रानटी प्रथा इस्लामने कायमचीच जगातून नष्ट केली. इस्लामने संदेश दिला की मनुष्य म्हणून सर्व सारखे आहेत. जीवाच्या बदल्यात जीव घेतला जाईल. अल्लाहने स्पष्ट केले आहे, ''हे अक्कल बाळगणाऱ्यांनो, या हत्यादंडास मृत्यू समजू नका, हे तर समाजाचे जीवन आणि समाज संजीवनी आहे''. शरीराच्या एका भागावरील गळूला कापून फेकल्यानंतर शरीर सशक्त बनते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी हत्यादंडाच्या महत्त्वाला स्पष्ट करताना सांगितले की ''आपल्या भावाची मदत करा तो अत्याचारी असो अथवा अत्याचारपीडित असो.'' ऐकणाऱ्यांना आश्चर्य वाटले की ''अत्याचारपीडिताची मदत करणे समजू शकतो, परंतु अत्याचारीची मदत करणे म्हणजे काय?'' पैगंबर मुहम्मद (स.) यांनी खुलासा केला, ''अत्याचारीचा हाथ अत्याचार करताना रोखून धरणे हीच अत्याचारीची मदत आहे.'' अन्यायी–अत्याचारी मनुष्याला अत्याचार करण्यापासून सक्तीने रोखणे ही सक्ती नाही तर त्याला मदत आहे. याचसाठी इस्लाममध्ये अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादांचे पालन करण्याची सक्तीने ताकीद केली आहे आणि त्यास दयेचा आणि कृपाशीलतेचा स्त्रोत सिद्ध केले आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे कथन आहे, ''अल्लाहच्या मर्यादांपैकी एक मर्यादेला प्रस्थापित करणे म्हणजे चाळीस दिवसांच्या पावसापेक्षा जास्त कृपा आहे.'' पावसाची कृपा ही आहे की त्यामुळे जमीन हिरवीगार होते, धान्य मुबलक येते आणि खुशाली येते. परंतु अल्लाहने घालून दिलेल्या मर्यादेला प्रस्थापित करणे यापेक्षा जास्त कृपेचे कार्य आहे. त्यामुळे अन्याय–अत्याचार आणि उपद्रवाचे समूळ उच्चाटन होते. अल्लाहच्या निर्मितीला जगात सुखशांतीपूर्वक जीवन जगता येते. शांती नांदू लागते जी प्रगतीची द्योतक आहे.

**न्यायसंगत हत्या आणि अन्यायपूर्वक हत्या** - अन्यायपूर्वक हत्येची सक्त मनाई आणि न्यायसंगत हत्येची सक्त ताकीद दिल्यामुळे अल्लाहने अफरातफरीच्या या अंधार युगात एक मध्य व सरळमार्ग दाखवून दिला. एकीकडे मर्यादाभंग करणारा समुदाय जो दुसऱ्यांच्या जीवास किंमत देत नाही आणि क्षुल्लक स्वार्थापोटी दुसऱ्याचा जीव घेतो आणि दुसरीकडे तो समुदाय जो रक्त सांडणे पाप समजतो आणि कोणत्याही स्थितीत हत्येला मान्यता देत नाही. इस्लामने या दोन्ही चुकीच्या विचारांचे उच्चाटन केले. इस्लामने दाखवून दिले की मानवी जीवाचा आदर–सन्मान काबागृहासारखा अथवा आई–बहिणीच्या नात्यासारखा शाश्वत नाही, तसेच इतका कवडीमोलसुध्दा नाही की क्षुल्लक वासनेपोटी मानवी जीवाला ठार केले जावे. मानवी जीव इतका स्वस्त नाही की मौजमजा म्हणून त्यास हालहाल करून मारावे अथवा आगीत झोकून जाळून टाकावे अथवा वासनापूर्तीच्या मार्गात अडथळा समजून काटा काढला जावा. तसेच खोटे आरोप–प्रत्यारोप करून त्यास बळी दिला जावा. अशा निष्ठूर आणि अमानवी तसेच अपवित्र कामासाठी मानवी जीवास ठार करणे निषिध्द आहे. इस्लामने दुसरीकडे हेसुध्दा दाखवून दिले की मानवी जीवापेक्षा श्रेष्ठ 'सत्य' आहे. जेव्हा सत्यप्रियता मानवी जीवाचा बलिदान मागेल तेव्हा बलिदान करणे योग्य नव्हे तर अनिवार्य ठरते आणि अशा सत्याधिष्ठित कारणासाठी स्वत:चे रक्त न सांडणे घोर अपराध आहे. मनुष्य जोपर्यंत सत्याधिष्ठित मूल्यांचा आदर करतो तोपर्यंत सत्यासाठी तनमन अर्पण करण्यास तो तत्पर राहातो. परंतु मनुष्य जेव्हा सत्याकडे पाठ फिरवून उपद्रव करू लागतो तेव्हा स्वत:च्या जीवाला जिवंत ठेवण्याचा हक्क गमावून बसतो. अशा स्थितीत त्याच्या रक्ताची किंमत पाण्याच्या किंमतीपेक्षा कमी होते.

**आवश्यक हत्या** - न्यायसंगत हत्या हे अन्यायपूर्ण हत्येप्रमाणेच खूनखराबा आहे परंतु वास्तविकपणे हा आवश्यक खूनखराबा आहे, ज्यापासून कोणत्याही परिस्थितीत सुटका नाही. याच्याव्यतिरिक्त जगात शांती नांदू शकत नाही की उपद्रव व अत्याचार समूळ नष्ट होऊ शकणार नाही. हकदाराला त्याचा हक्क मिळणार नाही की श्रध्दावंतांना श्रध्दाशीलतेवर चालता येणार नाही. अल्लाहनिर्मित पृथ्वीवर अल्लाहच्या दासांना सुखशांतीपूर्वक राहाता येणार नाही. इस्लामवर जर अशा खूनखराब्याचा (हिंसेचा) आरोप आहे तर त्याला हा आरोप मान्य आहे. परंतु प्रश्न हा उद्‌भवतो की जगात कोणता असा धर्म आहे जो आवश्यक हत्येने दागमुक्त आहे ? बौध्द धर्माची अंहिसा यास अमान्य करते, पण हा धर्मसुध्दा भिक्षु (सन्यास) आणि गृहस्थीमध्ये फरक दाखवतो व इतरांना गृहस्थी धर्म स्वीकारण्यासाठी आणि त्याद्वारे राजकारण, व्यापार आणि युध्द करण्यास परवानगी दिली आहे. त्याचप्रमाणे ईसाई धर्मातसुद्धा युद्ध निषिद्ध असले तरी शेवटी त्यांना युध्द करावेच लागले जे अतिरक्तरंजित ठरले आहे. हिंदु धर्मातसुध्दा 'अहिंसा परमोधर्म' हे तत्त्व आहे

आणि जीवहत्या पाप समजले जाते. मनूला एकदा विचारण्यात आले की जर कोणी आमच्या स्त्रियांची बेअब्रू करील, आमचा माल हडप करील आणि धर्माला नावें ठेऊ लागेल तेव्हा आम्ही काय करावे? तेव्हा मनूने उत्तर दिले, "अशा अत्याचारी माणसाला जरूर ठार केले पाहिजे मग तो गुरु का असेना किंवा ब्राम्हण अथवा म्हतारा."

येथे प्रत्येक धर्माची याविषयीची चर्चा तपशीलवार करणे अपेक्षित नाही. परंतु ज्या धर्मात युध्दाला वाईट समजले जाते तेसुध्दा प्रत्यक्षात युध्दाच्या रणभूमीत उतरलेले आहेत. कोणताही धर्म तत्त्वज्ञानाच्या आणि अध्यात्माच्या क्षेत्रात श्रेष्ठ वैचारिक तत्त्वज्ञान मांडत असला तरी व्यावहारिकतेत हे जग त्या धर्माला वास्तविकतेनुरूप आचरण करावयास भाग पाडते. कुरआनचे अवतरण करणाऱ्या अल्लाहसाठी हे काही अशक्य नव्हते की अहिंसासारखे आकर्षक आणि श्रेष्ठ तत्त्वज्ञान मांडून त्याने जगाला थक्क करून सोडले असते. त्या सृष्टीनिर्मात्याला विद्धत्तेचे आणि तत्त्वज्ञानाचे प्रदर्शन करावयाचे नव्हते. अल्लाहला आपल्या दासांसाठी एक परिपूर्ण आणि खरी घटना तयार करावयाची होती ज्यानुसार चालून दासाचे इहलोक आणि परलोक यशस्वी होतील. म्हणूनच सृष्टीनिर्मात्याने 'कोणत्याही जीवाला हकनाक ठार करू नका पण न्यायसंगतपणे हा आदेश दिला.' त्याने फक्त 'ठार करू नका' असा मूळीच आदेश दिलेला नाही. एकीकडे "अहिंसा परमधर्म" हा जप करावयाचा आणि दुसरीकडे जगात उपद्रव आणि अत्याचार–हिंसाचार माजवत राहायचे, हे पाप आपल्या दासाने करू नये म्हणून अल्लाह त्यांना बजावत आहे, "तुम्ही ते बोलता का जे करत नाही" अल्लाहने एकीकडे मानवी जीवाला निषिध्द ठरवून दुसरीकडे हत्यादंडसुध्दा निश्चित केले आहे. अल्लाहने मानवी जीवाचा आदर करण्यास आणि जिवंत राहण्याच्या हक्कासाठी सामर्थ्याचा उपयोग करण्यास परवानगी दिली आहे.

**सामुदायिक उपद्रव** - हत्यादंडाचा नियम ज्याप्रमाणे व्यक्तीसाठी आहे त्याचप्रमाणे समुदायासाठी सुद्धा आहे. ज्याप्रमाणे व्यक्ती दुराचारी असतात त्याचप्रमाणे समाज आणि राष्ट्रसुध्दा दुराचारी असतात. ज्याप्रमाणे द्वेष आणि लालसेपोटी व्यक्ती आपल्या मर्यादांचे उल्लंघन करते त्याचप्रमाणे समाज आणि राष्ट्रसुध्दा या रोगाने पछाडलेली असतात. व्यक्तीला यासाठी नियंत्रणाखाली ठेवणे आवश्यक आहे आणि त्याचप्रमाणे समाज आणि राष्ट्रांच्या दुराचाराला आळा घालण्यासाठी युध्द अटळ असते. परिणामाच्या दृष्टिकोनातून दोघांत काहीच फरक नाही, परंतु परिणामाच्या स्वरुपात फार मोठा फरक आहे. व्यक्तीचा उपद्रव सीमित असतो तर राष्ट्राचा अमर्यादित स्वरुपाचा असतो, ज्यामुळे अतोनात मनुष्यहानी होते आणि रक्ताचे पाट वाहू लागतात.

समाज जेव्हा दुराचार करू लागतो तर एकप्रकारचा उपद्रव माजत नाही तर अनेकविध उपद्रव होतात. धनसंपत्तीच्या लालसेपोटी गरीबांवर डाके टाकू लागतात, त्यांचा कारोबार नष्ट करतात, त्यांना असहाय करून सोडतात आणि त्यांच्या जीवावर स्वत:च्या तुंबड्या भरतात. त्यात काही लोक वासनांच्या आहारी जाऊन इतरांना बळी देतात. आपल्यासारख्या मनुष्यांचे ते देव बनून राहतात. न्याय आणि शांतीला नष्ट करून अन्याय व अत्याचार माजवतात. सदाचारी लोकांना दाबून दुराचारी लोकांना पुढे आणले जाते. त्यांच्या दुष्टत्तेमुळे राष्ट्रजीवन बरबाद होत जाते. दया आणि कृपेचे स्त्रोत बंद होतात आणि त्यांच्या जागी भ्रष्टाचार, अन्याय, अत्याचार, लैंगिकता, धोकाधडी, कठोरता ही दुष्ट प्रवृत्ती डोके वर काढते. या दुराचाराला पुढे राजमान्यता मिळून ते वैश्विक रूप धारण करते. परिणामत: गरीब आणि लहान राष्ट्रांचे स्वातंत्र्य हडप केले जाते. निष्पाप लोकांच्या रक्ताचे पाट वाहिले जातात. आपल्या स्वार्थापोटी पृथ्वीवर उपद्रव माजविला जातो. या सैतानी कामात धर्माचा आधार घेतला जाऊन इतरांचे धार्मिक स्वातंत्र्य हिरावून घेतले जाते. दुसऱ्यांवर अत्याचार आणि अन्याय अशासाठी केला जातो की ते स्वत:चा धर्म सोडून देऊन त्या नराधमांच्या धर्माप्रमाणे का चालत नाहीत? इतरांनी त्यांच्या धर्मावर आचरण करताना त्या नराधमांना पाहावत नाही आणि ते पुढे हिंसाचाराच्या आधारावर इतरांना भयभीत करण्याचा प्रयत्न करतात.

**युध्द हे एक नैतिक कर्तव्य आहे** - वरील स्थितीत युध्द योग्य ठरतच नाही तर ते अनिवार्य ठरते. अशा वेळी मानवतेची श्रेष्ठतम सेवा हीच ठरते की अशा उपद्रवींचा नायनाट केला जावा आणि अल्लाहच्या निष्पाप दासांना त्यांच्या उपद्रवांपासून मुक्त केले जावे. हे उपद्रवी लोक सैतानाचे अनुयायी बनून अल्लाहच्या दासांना नैतिक, आध्यात्मिक आणि भौतिक दृष्टीने कंगाल करतात. हे नराधम मानव नसतातच मुळी की ज्यांच्यावर दया केली जाईल. ते मनुष्याचे रूप धारण केलेले सैतान आणि मानवतेचे शत्रू असतात. अशांच्या बरोबर सहानुभूती हीच आहे की त्यांचा नायनाट केला जावा. हे आपल्या कुकर्मांनी आपला जगण्याचा हक्क गमावून बसतात. अशा नराधमांना आणि त्यांना मदत करणाऱ्यांना या जगात जिवंत राहण्याचा हक्क बाकी राहात नाही. ते शरीराचा सडलेला कुजलेला अवयव ठरतात ज्याला काढून फेकले जाते जेणेकरून पूर्ण शरीर स्वस्थ बनून राहाते. कुण्या अहिंसावादीला या अत्याचारींना ठार करणेसुध्दा पाप वाटत असेल आणि अशा रक्तपातापासून त्याचा थरकाप उडत असेल तर असला दयाळू अहिंसावादी जगात सुधारणा करण्यासाठी निकम्मा ठरतो. तो जंगलात जाऊन मानसिक आणि आध्यात्मिक शांती प्राप्त करण्याचा प्रयत्न करू शकतो, परंतु त्याच्या शिकवणीमुळे जगातून अत्याचार आणि उपद्रव नष्ट होऊ शकत नाही. अशा मानसिकतेचे लोक स्वत: इतरांबरोबर अत्याचार सहन करीत जातात, परंतु एक धैर्यशील आणि सामर्थ्यवान समाजनिर्मिती करू

शकत नाही. सामर्थ्यवान आणि धैर्यशील समाजाद्वारेच जगात सुखशांती नांदू शकते आणि मानवतेची खरी सेवा त्यांच्या हातूनच घडते.

व्यावहारिक नैतिकता ज्यामुळे स्वतंत्र व स्वस्थ समाजनिर्मिती होते, त्यासाठी एक अनुशासित आणि खरी व्यवस्था आवश्यक आहे. अन्यथा ते एक तत्त्वज्ञान आणि विचारापुरते मर्यादित राहाते. अशा वेळी त्या समाजात चांगुलपणा शोधत राहाणे बेकार आणि व्यर्थ आहे, ज्याप्रकारे वैद्यकीयशास्त्र हे फक्त वैचारिक समाधानाचे काम नाही तर त्यात शरीराच्या व्याधी दूर करून त्यास स्वस्थ करणे अपेक्षित आहे. कडू औषधाने अथवा गोड औषधाने स्वास्थ्य प्राप्ती होते, ती वेगळी गोष्ट आहे. त्याचप्रमाणे चारित्र्यनिर्माणसुध्दा फक्त काल्पनिक गोष्ट नाही तर त्यामुळे व्यक्ती आणि समाजात सुधार घडून येतो. तो सुधार सक्ती करून अथवा नरमाईने घडून येऊ शकतो. जोपर्यंत सुधारकार्य आणि तबलीग (धर्मप्रसार) समाजात चालू आहे तोपर्यंत त्या समाजाविरुध्द जिहाद करणे अवैध आणि निषिध्द आहे. परंतु एखाद्या समाजात अन्याय, अत्याचार अवाक्याबाहेर बोकाळला असेल आणि दुसऱ्यांची इज्जत–आबरूवर तसेच जीवित आणि वित्तावर आक्रमण होत असतील, त्या समाजात व्यक्तीस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य आबाधित नसेल तर अशा समाजाला अथवा देशाला उपदेश व प्रवचने करून काहीच उपयोग नाही. अशा उपद्रवी समाजाचा समाचार शस्त्र हातात घेऊन त्याविरुध्द युध्द करूनच घेतला जातो. हे युध्द (जिहाद) तोपर्यंत सुरुच असते जोपर्यंत त्या समाजातील, देशातील प्रत्येक व्यक्तीला सन्मानाने जिवंत राहण्याचा, विचार, आचारस्वातंत्र्याचा व धर्मस्वातंत्र्याच्या हक्क प्राप्त होत नाही.

**युध्दाची आवश्यकता** - युध्दाची आवश्यकता कशासाठी आहे यावर अल्लाहने कुरआनमध्ये स्पष्ट सांगितले आहे,

"जर अल्लाह लोकांना एक दुसऱ्याकरवी हटवीत नसता तर मठ, आणि चर्च व सिनेगॉग आणि मस्जिदी ज्यांत अल्लाहचे नाव मोठ्या प्रमाणात घेतले जाते, सर्व उद्धवस्त केली गेली असती." *(दिव्य कुरआन, २२:४०)*

वरील संकेतवचनात फक्त मुस्लिमांच्या मस्जिदीचा उल्लेख नाही तर आणखी तीन धर्मस्थळांचा उल्लेख अगोदर केल्यानंतर शेवटी मस्जिदीचा उल्लेख आला आहे. अल्लाह जर सदाचारी लोकांकरवी दुराचारी (उपद्रवी) लोकांना हटवीत नसता तर जगात अपार उपद्रव माजला असता ज्यामुळे प्रार्थनास्थळेसुध्दा शिल्लक राहिली नसती. अत्याचार आणि उपद्रवाची ही परिसीमा आहे की द्वेषाने पेटून एक दुसऱ्यांचे प्रार्थनास्थळसुध्दा उद्ध्वस्त केले जाते. अल्लाहने स्पष्ट शब्दांत संकेत दिला आहे, 'जर एखादा असा परिसीमा गाठलेला उपद्रवी

समाज जगात सीमोलंघन करतो तर अल्लाह दुसऱ्या समाजाला त्याच्या विरुध्द उभा करून त्या उपद्रवी अत्याचारी समुहाला हटवितो.'

युध्दाच्या दुसऱ्या कारणाचे स्पष्टीकरण देतांना अल्लाह कुरआनमध्ये दुसऱ्या ठिकाणी नमूद करतो की -

"जर अल्लाह अशा प्रकारे मानवाच्या एका समूहाला दुसऱ्या समुदायाच्या हस्ते हटवीत नसता तर पृथ्वीची व्यवस्था बिघडली असती. परंतु जगातील लोकांवर अल्लाहची मोठी कृपा आहे की (तो अशा तऱ्हेने हिंसाचाराच्या विनाशाची व्यवस्था करीत असतो.)"

*(दिव्य कुरआन, २:२५१)*

"जेव्हा कधी हे युध्दाच्या अग्नीं भडकावितात, अल्लाह त्या अग्नीला विझवून टाकतो. हे पृथ्वीवर हिंसाचार पसरविण्याचा प्रयत्न करीत आहेत पण अल्लाह हिंसाचार माजविणाऱ्यांना मुळीच पसंत करीत नाही." *(दिव्य कुरआन, ५:६४)*

**अल्लाहच्या मार्गात जिहाद** - हाच उपद्रव आणि हिंसाचार खरेतर द्वेष, मत्सर, शत्रुत्व व सदोष दृष्टी हा अनाचार व दुष्टतेचा परिणाम आहे आणि हीच ती जंग (युध्द) आहे ज्याविरुध्द अल्लाहने आपल्या सदाचारी दासांना शस्त्र हातात उचलण्यासाठी आदेश दिला आहे.

"परवानगी दिली गेली युध्द करण्याची त्या लोकांना ज्यांच्या विरुध्द युध्द सुरु आहे, कारण ते अत्याचारपीडित आहेत आणि अल्लाह निश्चितच त्यांच्या मदतीला समर्थ आहे. हे ते लोक आहेत जे आपल्या घरातून नाहक बाहेर काढले गेले, केवळ या अपराधापायी की ते सांगत होते, आमचा पालनकर्ता अल्लाह आहे."

*(दिव्य कुरआन, २२:३९-४०)*

कुरआनची ही पहिली आयत (संकेत) आहे जी युध्दासंबंधी अवतरित झाली आहे. त्यात ज्या लोकांच्या विरुध्द युध्द करण्याचा आदेश दिला आहे, त्यांचा दोष हा नाही की त्यांचा एक प्रबळ देश आहे किंवा ते भांडवलदार आहेत आणि परधर्मिय आहेत. त्यांचा दोष स्पष्ट शब्दांत हाच सांगण्यात आला की ते अत्याचारी आहेत. ते लोकांना जे बेकसूर आहेत आपल्या घरातून नाहक बाहेर काढतात. अल्लाह हाच आमचा पालनकर्ता आहे असे जे सांगतात म्हणून त्यांना त्रास देतात. अशा अत्याचारी, हिंसाचारी, उपद्रवी लोकांपासून स्वत:चेच रक्षण करण्यासाठी फक्त युध्द करून चालणार नाही तर इतर असहाय, विवश लोकांनासुध्दा त्या उपद्रवी लोकांच्या पकडीतून वाचविण्यासाठी त्यांच्याशी युध्द करावे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"मग काय कारण आहे की तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या असहाय पुरुष, स्त्रिया

आणि मुलांकरिता लढू नये ज्यांचे दुर्बल असल्याने दमन केले गेले आहे आणि धावा करत आहेत की, 'हे पालनकर्ता! आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ ज्याचे रहिवाशी अत्याचारी आहेत आणि तुझ्याकडून आमचा एखादा वाली व सहायक निर्माण कर.''

*(दिव्य कुरआन, ४:७५)*

अशा युध्दाला जे अत्याचारी आणि ईशद्रोहींच्या विरोधात त्या असहाय आणि दुर्बल स्त्री, पुरुष आणि मुलांकरिता लढले जाते त्यास अल्लाहने आपल्या मार्गातील युध्द (जिहाद फी सबिलिल्लाह) असे संबोधले आहे. यावरून असे युध्द हे माणसाकरिता लढले गेले नसून अल्लाहसाठी लढले गेले. यालाच अल्लाहसाठी युध्द करणे म्हणतात. मनुष्याच्या स्वार्थासाठी नसून हे युध्द अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी लढले जाते. या युध्दाला शेवटपर्यंत चालू ठेवण्याचा अल्लाहचा आदेश आहे जोपर्यंत अल्लाहची भूमी अत्याचार, हिंसाचार आणि ईशद्रोहाने मुक्त होत नाही. म्हणून कुरआनमध्ये अल्लाहने स्पष्ट आदेश दिला आहे, ''त्यांच्याशी युध्द करा येथपावेतो की उपद्रव नाहीसे होईल.'' उपद्रव समूळ नष्ट व्हावा ज्याच्या विरुध्द युध्द करण्याची गरज भासू नये. असे युध्द हे रक्तपाताचे नाही. किंवा वित्तजीव हानी करण्यासाठी ही मुळीच नाही. म्हणून या भीतीपोटी युध्द न थांबविण्याचा आदेश आहे.

**सत्य असत्याची सीमारेषा** - अल्लाहने सत्यासाठी युध्दाचा आदेश देताना श्रध्दावंतांना अस्वस्थ केले आहे,

''ज्या लोकांनी श्रध्देचा मार्ग अवलंबिला आहे ते अल्लाहच्या मार्गात लढतात आणि ज्यांनी अश्रध्देचा मार्ग अवलंबिला आहे ते तागूतच्या (विद्रोही लोकांच्या) मार्गात लढतात, तर सैतानांच्या साथीदारांशी लढा आणि खात्री बाळगा की सैतानाची कारस्थाने खरे पाहता अत्याधिक दुर्बल आहेत.'' *(दिव्य कुरआन, ४:७६)*

हे एक प्रमाणित सत्य आहे ज्याकरवी सदाचारी आणि दुराचारीच्यामध्ये एक सीमारेषा ओढली आहे. जे अत्याचारासाठी व उपद्रव माजविण्यासाठी लढतात ते सैतानाचे मित्र आहेत आणि जे उपद्रव समूळ नष्ट करण्यासाठी लढतात ते अल्लाहच्या मार्गातील लढवय्ये आहेत. प्रत्येक ते युध्द ज्यांचा उद्देश सत्याविरुध्द लढणे आहे तसेच लोकांवर अत्याचार करणे आणि अल्लाहचे नाव घेणाऱ्याना नाहक त्रास देणे हा आहे तर असे युध्द सैतानाच्या मार्गातील युध्द आहे. (सैतानी युध्द आहे) याविरुध्द जे अल्लाहच्या या भूमीत अल्लाहच्या दासांवर होणारा अत्याचार, अन्याय आणि उपद्रव समूळ नष्ट करण्यासाठी आणि जगात सुख, शांती आणि समृध्दी नांदावी यासाठी युध्द करतात (जिहाद) तर असे युध्द अल्लाहच्या मार्गातील युध्द आहे आणि अल्लाह अशा सदाचारींना मदत करतो.

**अल्लाहच्या मार्गातील युध्दाचे फायदे** - कुरआनमध्ये अल्लाहच्या मार्गातील युध्दासंबंधी अनेकदा उल्लेख आला आहे.

"हे लोकहो! ज्यांनी श्रध्दा ठेवली आहे, मी दाखवू तुम्हाला तो व्यापार जो तुम्हाला यातनादायक प्रकोपापासून वाचवील? श्रध्दा ठेवा अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर आणि प्रयत्नांची पराकाष्ठा (जिहाद) करा अल्लाहच्या मार्गात आपल्या द्रव्यांनिशी आणि आपल्या प्राणानिशी हेच तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही समजून घेतले."

*(दिव्य कुरआन, ६१:१०-११)*

अल्लाहने कुरआनमध्ये त्याच्या मार्गात लढणाऱ्यांची प्रशंसा केली आहे,

"अल्लाहला तर प्रिय ते लोक आहेत जे त्याच्या मार्गात अशा प्रकारे फळी बांधून एक दिलाने लढतात जणू काय ते शिसे पाजलेली भिंत असावेत." *(दिव्य कुरआन, ६१:४)*

अल्लाहने कुरआनमध्ये एके ठिकाणी अशा 'प्रिय' लोकांच्या प्रतिष्ठेबाबत म्हटले आहे,

"हज यात्रेकरूंना पाणी पाजणे आणि काबागृहाची सेवा करणे याला तुम्ही त्या व्यक्तीच्या कामाबरोबर ठरविले आहे काय ज्याने श्रध्दा ठेवली अल्लाहवर आणि मरणोत्तर जीवनावर व ज्याने प्राण वेचले अल्लाहच्या मार्गात, अल्लाहपाशी तर ते दोघे समान नाहीत, अल्लाह अत्याचारी लोकांना मार्ग दाखवित नाही. अल्लाहच्या येथे तर त्याच लोकांचा दर्जा मोठा आहे. ज्यांनी श्रध्दा ठेवली व ज्यांनी अल्लाहच्या मार्गात घरेदारे सोडली आणि जीवित व वित्तानिशी धर्मयुध्द (जिहाद) केले तेच यशस्वी आहेत." *(दिव्य कुरआन, ९:१९-२०)*

हे ते सत्याधिष्ठित युध्द आहे ज्यात एका रात्रीचे जागणे हे हजारो रात्री जागून भक्ती करण्यापेक्षा जास्त आहे. युध्दभूमीत उठून हिंमतीने उभे राहाणे हे घरबसल्या ६० वर्षांपर्यंत नमाज अदा करत राहाण्यापेक्षासुध्दा जास्त फायदेशीर आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे की,

" हे पैगम्बर (स.)! सांगून टाका की जर तुमचे वडील, तुमची मुले आणि तुमचे बंधु व तुमच्या पत्नीं व तुमचे आप्तेष्ट व नातेवाईक व तुमची ती धनदौलत जी तुम्ही कमाविली आहे व तुमचे ते व्यापार उदीमच्या मंदावण्याची तुम्हाला भीती वाटते आणि तुमची ती घरे जी तुम्हाला पसंत आहेत, तुम्हाला अल्लाह व त्याचे पैगम्बर (स.) आणि अल्लाहच्या मार्गात धर्मयुध्द (जिहाद) पेक्षा अधिक प्रिय असतील तर वाट पाहा इथपर्यंत की अल्लाहने आपला

निर्णय तुमच्या समक्ष आणावा, आणि अल्लाह अवज्ञाकारी लोकांना मार्ग दाखवित नसतो.''
*(दिव्य कुरआन, ९:२४)*

येथे थोडे थांबून विचार करा, चिंतन करा की ''अल्लाहच्या मार्गातील युध्द'' यासाठी एवढी प्रतिष्ठा आणि फायदे कशासाठी आहेत? जिहाद करणाऱ्यांना अनेकदा कुरआनमध्ये अस्वस्थ केले आहे की तुम्हीच यशस्वी आहात आणि तुमची प्रतिष्ठा उच्च आहे. याविरुध्द तोंड चुकवून घरात बसून राहणाऱ्यांना कठोर तंबी का दिली गेली आहे? यासाठी वरील कुरआनोक्तीवर पुन्हा विचारमंथन होणे आवश्यक आहे. वरील उक्तीमध्ये यश म्हणजे धनदौलत, प्रतिष्ठा, राज्यप्राप्ती इ. मुळीच नाही. श्रीकृष्ण गीतेमध्ये अर्जुनाला उपदेश करताना म्हणतो की,

''हे अर्जुन, तू या महाभारत युध्दात यशस्वी होशील तर जगाचे राज्य तू उपभोगशील.'' (गीता : २-३७)

परंतु कुरआनमध्ये कुठेच युध्दासंबंधी (जिहाद) असा आदेश आला नाही व असे मुळीच म्हटले गेलेले नाही की तुला युध्दाच्या मोबदल्यात धनसंपत्ती अथवा राज्यसत्ता उपभोगता येईल. त्याऐवजी प्रत्येक ठिकाणी युध्दासंबंधी आदेशांबरोबर अल्लाहची प्रसन्नता प्राप्त होईल हेच सांगितले गेले आहे. तसेच अल्लाहच्या जवळ प्रतिष्ठा मिळेल आणि अल्लाहच्या कोपापासून बचाव होईल असे म्हटलेले आहे. अल्लाहजवळ यांच्यासाठी उच्च प्रतिष्ठा आहे याशिवाय इतर कोणत्याच मोबदल्याबद्दल कुरआनमध्ये उल्लेख नाही. एके ठिकाणी 'व्यापार' हा शब्द वापरला आहे त्यावरून प्रथमदर्शनी धनदौलतच्या फायदा लक्षात येतो. परंतु आयत पूर्ण वाचल्यानंतर अल्लाहच्या मार्गात तन–मन–धन अर्पण करण्याचा आदेश आहे आणि त्याच्या मोबदल्यात अल्लाहच्या कोपापासून सुटका आहे, हा मोबदला देण्यात आला आहे. कुठेही जगावर राज्य करण्याचा मोबदला मिळेल असे म्हटलेले नाही. एके ठिकाणी युध्दापासून तोंड लपविणाऱ्यांना तंबी दिली आहे.

असे लोक आपल्या धनसंपत्ती, मुलंबाळ, पत्नीच्या प्रेमात अडकलेले असतात आणि त्यांना त्यांचे व्यापार–उदीम, घर यांचे आकर्षण अधिक असते. हे सर्व हातातून जाण्याची भीती त्यांना असते. परंतु युध्दामुळे प्राप्त धनसंपत्ती, घरंदारं आणि व्यापार–उदिम या सर्वात वृध्दी होते.

जिहाद करण्यामागे दुनियेची दौलत आणि राज्यसत्ता प्राप्तीचा उद्देश नाही. शेवटी लढाईतील रक्तपाताने अल्लाहला काय साध्य होते की ज्याबद्दल तो श्रेष्ठतम मोबदला देतो ? या अशा लढाईत मग विजय तो कोणता? या प्रश्नाचे उत्तर हे आहे की अल्लाह आपल्या गरीब,

असहाय आणि दुर्बल दासांना उपद्रवपीडित, अत्याचारपीडित पाहू शकत नाही. जगातून उपद्रव, अत्याचार, हिंसा समूळ नष्ट व्हावी व त्याच्या बेकसूर, दुर्बल, गरीब दासांना बरबाद केले जाऊ नये, बलवानांनी निर्बलांवर अत्याचार करू नये व त्यांच्या सुखशांतीवर डाका टाकू नये. त्यांच्या आध्यात्मिक, भौतिक जीवनाला बरबाद करू नये. अल्लाहला हे अजिबात पसंत नाही की जगात अत्याचार, रक्तपात, हिंसाचार, धोकेबाजी, अन्याय कायमचा वास करून राहावेत. अल्लाह हे मुळीच पसंत करीत नाही की त्याच्या दासांनी इतर दासांना गुलाम बनवून ठेवावे. म्हणूनच हा लोकसमुदाय एखाद्या भौतिक फायद्याव्यतिरिक्त फक्त आणि फक्त जगाला उपद्रवापासून अलिप्त करून त्याच्या जागी जगात सुखशांती स्थापित करण्यासाठी उभा राहतो आणि अशा पवित्र कार्यात आपले तन, मन, धन तसेच आपले सगे—संबंधी, घरदार आणि आपल्या ऐशआरामाला अर्पण करतो. ह्या व्यक्तीपेक्षा आणि लोकसमुदायापेक्षा जास्त अल्लाहच्या प्रेमाचा आणि प्रसन्नतेला पात्र कोण बरे ठरू शकतो? शाश्वत सफलता यांच्याचसाठी आहे हे निश्चित!

अल्लाहच्या मार्गात युध्द करण्याचा (जिहाद) हाच फायदा आहे. ह्याच कारणास्तव मानवी कृत्यांत सर्वात श्रेष्ठतम कृत्य श्रध्दाशीलते नंतरचे जिहाद आहेफ आणि चिंतन केल्यानंतर हेच सिध्द होते की जगातील सर्व प्रकारच्या सदाचाराचा मूळ स्त्रोत हेच आहे. दुराचाराला कोणत्याही स्थितीत नापसंत करणे ही मानवी भावना जर त्यासाठी कोणतेही बलिदान देण्यास सतत तयार असेल तर हीच श्रेष्ठतम मानवी भावना आहे. व्यावहारिक जीवनाची सफलता यावरच अवलंबून आहे. जी व्यक्ती दुसऱ्याच्या दुराचाराला सहन करत जाते त्याला शेवटी त्याच्या या नैतिक अध:पतनामुळे स्वत: दुराचाराला सामोरे जावे लागते. शेवटी तो पण दुराचार करू लागतो. एक वेळ अशी येते की नंतर अल्लाहचा धिक्कार त्यावर होतो. या स्थितीत मनुष्यात सदाचार, नैतिकता, मानवता इ. सद्गुणांची जाण शिल्लक राहात नाही. तो वासनेच्या आणि भौतिकतेच्याच गुलामीत फक्त अडकला न जाता मानसिक आणि आध्यात्मिक गुलामीत खितपत पडतो. अंतत: त्या व्यक्तीचा व समाजाचा विनाश होतो. याविरुध्द ज्या व्यक्ती आणि समाजात नैतिकता आहे तो दुराचाराला दुराचार समजतो आणि समाजाला त्यापासून मुक्ती प्राप्त करून देण्यासाठी अहोरात्र कार्यमग्न राहातो. अशी व्यक्ती आणि समाज हा सच्चा आणि श्रेष्ठ ठरतो आणि त्याचे अस्तित्व हे मानवतेसाठी वरदान ठरते. ह्यांना जगाच्या फायद्याची आशा नसते आणि जगात भल्याची जाण असणारे लोक अशा व्यक्तीला आपला नेता मानते. म्हणूनच अल्लाहने कुरआनमध्ये एके ठिकाणी स्पष्ट म्हटले आहे की जमिनीचे वारस हे सदाचारी लोकच असतील. यावरून हेच सिध्द होते की या जगातील आणि पारलौकिक जीवनातील यश हे अशाच सदाचारी लोकांसाठी आहे जे

भौतिकतेचा त्याग करून फक्त आणि फक्त अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी आणि अल्लाहच्या दासांच्या भलाईसाठी (कल्याणासाठी) जिहाद करतात.

**व्यक्तीस्वातंत्र्यात जिहादचे महत्त्व** - जिहादच्या या वास्तवतेला जाणून घेतल्यानंतर हे लक्षात येते की राष्ट्र जीवनांमध्ये जिहादला किती महत्त्व आहे. व्यक्तीस्वातंत्र्य आबाधित ठेवण्यासाठी त्याचे महत्त्व लक्षात येते. जगात अशी एक व्यवस्था असेल जी दुराचाराचा प्रबंध करीत असेल व दुष्टतेचा विरोध करीत असेल तर जगात व्यक्तीस्वातंत्र्य आबाधित राहण्यास मदत होते. दुराचाराला दुसऱ्यांपासून दूर करणे तर श्रेष्ठ कार्य आहे. परंतु दुराचाराला आपल्यातून दूर करण्यासाठी जर समाज प्रयत्नशील असेल आणि त्यासाठी स्वत:चे सर्वस्व पणाला लावण्यासाठी तो तयार असेल तर असा समाज कधीच धिक्कारित बनून रहात नाही आणि त्याच्या इज्जतीला आणि आबरूला कोणतीच शक्ती लुटू शकत नाही.

सत्यापुढे नतमस्तक होणे आणि असत्या पुढे नतमस्तक होण्याऐवजी आपला जीव देणे पसंत करणे एका सदाचारी राष्ट्राची कार्यप्रणाली बनली पाहिजे. ते असे जर करू शकत नाहीत तर कमीतकमी सत्यावर टिकून राहण्याची हिंमत दाखविली पाहिजे. हे सदाचारापेक्षा कमी दर्ज्याचे आहे. एखादे राष्ट्र सत्यावर टिकूनसुध्दा राहू शकत नाही आणि दुराचाराच्या आधिन राहण्यास विवश होते तर अशा राष्ट्रासाठी जगात कवडीमोल इज्जत रहाते. अशा राष्ट्राचे जीणे हे मरणे आहे. अल्लाहने आपल्या ग्रंथात असे अनेक दाखले दिले आहेत की ज्या राष्ट्रांनी दुराचाराविरुध्द जिहाद करण्यात स्वत:ची धनसंपत्ती, जीवाचा तोटा पाहिला आणि जिहादपासून पळ काढला ते धिक्कारित बनले. अशा धिक्कारित राष्ट्रांना अल्लाह अत्याचारी राष्ट्र म्हणून संबोधतो कारण त्यांनी आपल्या कुकृत्यांनी स्वत:वर अत्याचार केला आणि वस्तुत: ते स्वत:च्याच अत्याचाराने नाश पावले. कुराआनोक्ती आहे,

“या लोकांपर्यंत यांच्या पूर्वजांचा इतिहास पोहचला नाही काय? नूह (स.) चे लोक आद, समूद, इब्राहीम (अ.) चे लोक, मदयनचे लोक आणि त्या वस्त्या ज्यांना उलथून टाकले गेले, त्यांचे पैगंबर त्यांचे पाशी उघड उघड संकेत घेऊन आलेत, मग हे अल्लाहचे काम नव्हते की त्यांच्यावर अत्याचार करावा, तर ते स्वत:च आपल्यावर अत्याचार करणारे होते. श्रध्दावंत पुरुष व श्रध्दावंत स्त्रिया हे सर्व एक दुसऱ्याचे मित्र आहेत, भलेपणाचा आदेश देतात वाईट गोष्टींपासून रोखतात, नमाज कायम करतात, जकात देतात आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञाधारक आहेत, हे ते लोक आहेत ज्यांच्यावर अल्लाहचा कृपावर्षाव होणारच.”

*(दिव्य कुरआन, ९:७०-७१)*

वरील आयतमध्ये मागील राष्ट्रांचा उल्लेख आला आहे की त्यांनी स्वत:च स्वत:वर अत्याचार केला. सदाचारी श्रध्दावंतांचे हे वैशिष्ट्य सांगितले की ते एकमेकांचे मददगार असतात. ते सदाचाराला स्थापित करतात आणि दुराचाराचा प्रतिबंध करतात. यावरून हेच सिध्द होते की या विनाश पावलेल्या राष्ट्रांनी सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारापासून प्रतिबंध करणे सोडून दिले होते आणि हाच त्यांचा अत्याचार त्यांना बुडवून बसला.

एका जागी बनी इस्त्राईलचा भित्रेपणा आणि जिहादपासून तोंड लपविण्याच्या भयानक परिणामाचा उल्लेख आला आहे. मूसा (अ.) यांनी त्यांच्या राष्ट्राला अल्लाहच्या कृपेची आणि देणग्यांची आठवण करून देत आदेश दिला, ''तुम्ही पवित्र भूमित दाखल व्हा ज्याला अल्लाहने तुमच्याकरिता दिली आहे आणि कधीही पाठ फिरवून पळू नका. कारण असेच लोक अयशस्वी होतात.'' तरीपण बनी इस्त्राईलच्या लोकांनी मूसा (अ.) यांचे ऐकले नाही. ते घाबरलेले होते. कुरआनमध्ये त्यांच्या मानसिकतेचे वर्णन आले आहे,

''आठवा तो प्रसंग जेव्हा मूसा (अ.) यांनी आपल्या लोकांना सांगितले होते की 'हे माझ्या बांधवानो! अल्लाहची ती देणगी ध्यानात घ्या जी त्याने तुम्हाला प्रदान केली होती. त्याने तुमच्यात नबी (पैगंबर) निर्माण केले. तुम्हाला सत्ताधारी बनविले आणि तुम्हाला ते सर्वकाही दिले जे या जगात कोणालाच दिले नव्हते. हे माझ्या बांधवांनो! या पवित्र भूमीत दाखल व्हा जी अल्लाहने तुमच्याकरिता बहाल केली आहे. मागे फिरू नका नाही तर अयशस्वी आणि निराश परताल.त्यांनी उत्तर दिले, हे मूसा! तेथे तर मोठे शक्तिशाली लोक राहतात. आम्ही तेथे कदापि जाणार नाही जोपर्यंत ते तेथून निघून जात नाहीत. परंतु होय जर ते निघून गेले तर आम्ही दाखल होण्यास तयार आहोत.'' *(दिव्य कुरआन, ५:२०-२२)*

या उपर ते डरपोक राष्ट्र अल्लाहवर विश्वास न ठेवता माणसांच्या धाकाने थरथर कापू लागले आणि म्हणाले,

''हे मूसा! आम्ही तर तेथे कदापि जाणार नाही जो पर्यंत ते तेथे आहेत, तुम्ही आणि तुमचा पालनकर्ता दोघे जा आणि लढा, आम्ही येथेच बसलो आहोत.''

*(दिव्य कुरआन, ५:२४)*

शेवटी त्या डरपोक आणि भित्रेपणाच्या पोटी अल्लाहच्या निर्णय आला,

''अल्लाहने उत्तर दिले, बरे तर, तो प्रदेश चाळीस वर्षांपर्यंत यांच्याकरिता निषिध्द आहे. हे भूतलावर वणवण भटकत राहतील. या अवज्ञाकारींच्या स्थितीवर मुळीच दया दाखवू नका.'' *(दिव्य कुरआन, ५:२६)*

कुरआनमध्ये आणखी एका ठिकाणी बनीइस्त्राईलचा डरपोकपणा, संपत्तीप्रेमाबद्दल उल्लेख आला आहे. मृत्युच्या भीतीपोटी, संपत्ती प्रेमापोटी तसेच डरपोकपणामुळे त्यांनी जिहाद करणे सोडून दिले होते. परिणामत: बनी इस्त्राईलच्या राष्ट्राचा विनाश झाला. कुरआनोक्ती आहे,

"तुम्ही त्या लोकांच्या दशेचा विचारदेखील केला नाही काय की जे मृत्यूच्या भीतीने आपले घरदार सोडून निघाले होते आणि हजारोंच्या संख्येत ते होते? अल्लाहने त्यांना फरमाविले, मरा! नंतर त्याने त्यांना पुनरुज्जीवन दिले. वस्तुस्थिती अशी आहे की अल्लाह मानवावर मोठी कृपा करणारा आहे, परंतु बहुसंख्य लोक कृतज्ञता व्यक्त करीत नाहीत."

*(दिव्य कुरआन, २:२४३)*

यानंतर श्रध्दावंतांना युध्द करण्याचा आदेश अल्लाहने दिला. कुरआनमध्ये स्पष्ट आदेश आहे,

"मुस्लिमांनो! अल्लाहच्या मार्गात युध्द करा आणि चांगलेच समजून असा की अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे." *(दिव्य कुरआन, २:२४४)*

यानंतर दुसऱ्यांदा इस्त्राईलच्या एका गटाचा उल्लेख आला आहे की -

"मग तुम्ही या घटनेवर विचार केला नाही काय जी मूसा (अ.) नंतर बनी इस्त्राईलच्या सरदारांच्या बाबतीत घडली होती. त्यांनी आपल्या नबीला सांगितले, "आमच्यासाठी राजा नेमून टाका की ज्यामुळे आम्ही अल्लाहच्या मार्गात युध्द करावे." नबीने विचारले, "असे तर होणार नाही ना की तुम्हाला युध्दाचा आदेश देण्यात यावा आणि मग तुम्ही लढू नये " ते सांगू लागले, "बरे हे कसे होऊ शकते की आम्ही अल्लाहच्या मार्गात लढू नये जेव्हा आम्हाला आमच्या घरातून काढण्यात आले आहे आणि आमची मुलेबाळे आम्हापासून वेगळी केली गेली आहेत." परंतु जेव्हा त्यांना युध्दाचा आदेश देण्यात आला तेव्हा एक अल्पशा संख्येशिवाय इतर सर्वजणांनी पाठ फिरविली आणि अल्लाह त्यांच्यापैकी प्रत्येक अत्याचाऱ्याला चांगलेच ओळखतो." *(दिव्य कुरआन, २:२४६)*

अशा प्रकारे अनेक उदाहरणे दिली गेली आहेत की सदाचाराला स्थापित करण्यासाठी जिहाद आवश्यक आहे आणि ज्या राष्ट्र मनातून अथवा समाजमनातून जिहादचे महत्त्व नाहीसे झाले तर त्या राष्ट्रांत दुराचार माजतो आणि अंतत: त्या राष्ट्राचा विनाश हा निश्चित आहे. अल्लाहच्या मार्गात जिहाद करण्याला अनन्य साधारण महत्त्व आहे.

प्रकरण २

# बचावात्मक युध्द (जिहाद)

मागील चर्चेतून आपणास हे कळून चुकले आहे की कुरआन श्रध्दावंतांना सत्यप्रियतेवर अटळ राहण्यास भाग पाडतो, जेणेकरून त्यांनी उपद्रवापुढे, असत्यापुढे आणि दुराचारापुढे शरणागती पत्करू नये. कुरआनच्या शिकवणीनुसार मनुष्याची सर्वात मोठी कमजोरी ही आहे की तो स्वत:च्या ऐशआरामापोटी, जीवलगांच्या आणि संपत्तीच्या प्रेमापोटी सत्याची कास सोडून असत्याच्या, दुराचाऱ्यांच्या वाढत्या सामर्थ्यापुढे शरणागती पत्करतो. ही दुष्टतेची गुलामी करणे जेव्हा एखाद्या राष्ट्रात निर्माण होते तर इज्जतीचे, सदाचाराचे, सद्गुणांचे दुर्भीक्ष त्या देशात होते. त्या राष्ट्राला त्याच्या राष्ट्र विनाशाची जाणसुध्दा राहात नाही. शारीरिक गुलामीबद्दल लोकांचा हा गैरसमज आहे की ती वरवरची गुलामी असते. त्यामुळे मानसिक गुलामी उत्पन्न होत नाही. परंतु वस्तुस्थिती ही आहे की शरीर गुलाम होण्याअगोदर त्या मनुष्याला मानसिक गुलामी येते. म्हणून जे राष्ट्र स्वत:च्या भित्रेपणामुळे आणि निर्बलतेमुळे स्वत:च्या हक्कांचे रक्षण करू शकत नाही आणि दुराचाराला सामर्थ्यवान पाहून त्याचे अनुकरण करू लागते, असे राष्ट्र त्याच्या हक्कांचे आणि अधिकारांचे तसेच नैतिक मूल्यांचे रक्षण मुळीच करू शकत नाही. सदाचार आणि दुराचार हे एकमेकांविरुध्द आहेत आणि ते एकत्र कधीच येऊ शकत नाहीत. तर मग एक राष्ट्र दुसऱ्या एका असत्य आणि दुराचारी राष्ट्राची गुलामी पत्करून सत्य मार्गावर राहण्याचा दावा करू शकत नाही. एकी हा सत्याचा नैसर्गिक गुण आहे. अर्ध सत्य आणि अर्ध असत्य अशी सांगड अशक्य आहे. ज्याला सत्यापुढे शरणागती हवी आहे त्याने असत्याला, दुराचाराला लाथाडलेच पाहिजे.

कुरआन नैसर्गिक नियमांचा आदर करतो. नैसर्गिक नियमानुसार त्याने मानवापुढे दोनच मार्ग ठेवले आहे. एक मृत्यु आणि दुसरा जीवन प्रतिष्ठा! जीवन प्रतिष्ठेविना जगणं हा तिसरा मार्ग कुरआनला अमान्य आहे. दुर्दैवींनी आपल्या डरपोकपणामुळे आणि श्रध्दाशीलतेच्या उथळपणामुळे हा तिसरा मार्ग स्वत: अंगीकारलेला असतो. कुरआन अशा अप्रतिष्ठित जीवनाला धिक्कारलेले जीवन म्हणून संबोधतो आणि अल्लाहचा कोप अशा दुर्दैवीं लोकांवर अथवा राष्ट्रांवरच होतो. अशा धिक्कारित जीवनाला जगणं हे आपल्या स्वत:वर अत्याचार करणे आहे. जे अशा लांच्छित जीवनाला कवटाळून बसलेले असतात, अशांच्या दुर्भाग्याला कुरआन स्पष्ट करत आहे,

"जे लोक आपणच स्वत:वर अत्याचार करीत राहिले होते त्यांचे आत्मे जेव्हा दूतांनी कब्ज्यात घेतले तेव्हा त्यांना विचारले की तुम्ही या कसल्या दशेत गुरफटले होता? त्यांनी उत्तर दिले की, आम्ही पृथ्वीवर निर्बल व विवश होतो. दूतांनी सांगितले की अल्लाहची पृथ्वी विशाल नव्हती काय की तुम्ही देशांतर करून दुसरीकडे जावे? अशा लोकांचे ठिकाण

नरक आहे. आणि ते फारच वाईट ठिकाण आहे. परंतु जे पुरुष ज्या स्त्रिया व जी मुले खरोखरच विवश आहेत आणि देशातरांचा कोणताच मार्ग आणि साधन सापडत नाही, हे दूर नव्हे की अल्लाह त्यांना माफ करील. अल्लाह मोठा माफ करणारा व क्षमा करणारा आहे. जो कोणी अल्लाहच्या मार्गात देशांत्तर करील तो पृथ्वीवर आश्रय घेण्यासाठी मुबलक जागा व उदर निर्वाहासाठी मोठी सुबत्ता प्राप्त करील. आणि जो आपल्या घरातून अल्लाह व पैगंबराकडे देशांतरासाठी निघाला, नंतर त्याला वाटेतच मृत्यु आला, त्याचा मोबदला अल्लाहजवळ अनिवार्य ठरला. अल्लाह फार क्षमा करणारा व कृपाळू आहे."

*(दिव्य कुरआन, ४:९७-१००)*

(वरील आयत त्या मुस्लिमांसाठी (श्रध्दावंतांसाठी) अवतरित झाली होती जे पैगंबर मुहम्मद (स.) आणि मुस्लिमांच्या देशांतरानंतर मक्का शहरातच मागे राहिले होते. ज्यांनी त्यांचे घरदार आणि व्यापार–उदीम आणि त्यांच्या संपत्तीच्या प्रेमापोटी ईश द्रोह्यांबरोबर राहाणे पसंत केले होते. त्या अनेकेश्वरवादी परिस्थितीत त्यांना इस्लामी तत्त्वानुसार जीवन जगणं अशक्य होते. ते मुस्लिम त्या ईशद्रोहींच्या प्रभावाखाली असल्याने त्यांना अनेकेश्वरवादींच्या रीतीरिवाजाप्रमाणे चालावे लागत होते. त्या दबावामुळे शेवटी अनेकेश्वरवादींबरोबर त्यांना बदरच्या लढाईत मुस्लिमांबरोबर लढावे लागले होते.) थांबा आणि विचार करा की ही अनुयायीत्वाच्या प्रतिष्ठेची किती प्रकाशमान शिकवण आहे. स्वत:ला निर्बल समजून असत्य शक्तीपुढे लोटांगण घेणाऱ्यांना स्वत:वर स्वत:च अत्याचार करणारे म्हटले आहे. त्यांना विचारले जात आहे की तुम्ही या कसल्या दशेत (धिक्कारित) गुरफटलेले आहात? ते निर्बलतेचे आणि विवशतेचे कारण पुढे करतात परंतु ते अमान्य होते. उत्तर दिले जाते की तुम्ही निर्बल होता तर देशांतर का केले नाही? धिक्कारित बनून तिथेच का खितपत पडला? ऐशआरामासाठी, धनदौलतीसाठी तुम्ही असत्याची भक्ती का करू लागला? या कारणाने त्यांना नरकात फेकले जाते आणि ते फारच वाईट ठिकाण आहे.

**कर्तव्यदक्षता** - याच कारणामुळे कुरआनने धैर्याची आणि सहनशीलतेची शिकवण दिली आहे. परंतु अशा आक्रमणाला सहन करण्याची अजिबात शिकवण दिली नाही की ज्यामुळे इस्लामला क्षति पोहोचेल आणि मुस्लिमांना इस्लामव्यतिरिक्त इतर जीवनव्यवस्था लागू केली जाईल. कुरआनने सक्तीपूर्वक आदेश दिला आहे की तुमच्या मानवी हक्कांवर गदा येत असेल आणि व्यक्तीस्वातंत्र्याला तसेच धार्मिक स्वातंत्र्य, सामाजिक स्वातंत्र्य, विचारस्वातंत्र्याला हिसकावून घेत असेल तर त्याच्यापुढे निर्बलता दाखवू नका आणि पूर्ण शक्तीनिशी त्याचा प्रतिकार करा.

"आणि अल्लाहच्या मार्गामध्ये तुम्ही त्यांच्याशी युध्द करा ज्यांनी तुमच्यावर युध्द लादले आहे. परंतु अतिरेक करू नका. अल्लाहला अतिरेक करणारे आवडत नाहीत. आणि त्यांच्याशी युध्द करा जिथे कुठे तुमची त्यांच्याशी गाठ पडेल आणि त्यांना त्या

ठिकाणाहून हाकलून लावा जिथून त्यांनी तुम्हाला हाकलले होते. हे यासाठीच की जरी हत्या करणे वाईट असले तरी उपद्रव करणे हे त्यापेक्षाही वाईट आहे. आणि पवित्र काबागृहाच्या निकट जोपर्यंत ते तुमच्याशी युध्द करणार नाहीत तोपर्यंत तुम्हीही त्यांच्याशी युध्द करू नका. परंतु जेव्हा ते युध्द करतील तेव्हा तुम्हीही त्यांच्याशी युध्द करा. ह्याचप्रमाणे शिक्षा आहे द्रोह करणाऱ्यांसाठी नंतर जर ते (युध्दापासून) परावृत्त झाले तर अल्लाह क्षमावंत व कृपावंत आहे."

आणि त्यांच्याशी तोपर्यंत युध्द करा जोपर्यंत उपद्रव नष्ट होईल आणि अल्लाहसाठीच धर्म होईल. नंतर जर ते परावृत्त झाले तर लक्षात ठेवा की अत्याचाऱ्यांशिवाय कुणाशीही शत्रुत्व ठेऊ नका.प्रतिष्ठित महिने हे प्रतिबंधित महिने आहेत. त्यामुळे त्या प्रतिबंधाचे पालन सर्वांनी सारखेच केले पाहिजे. म्हणून (प्रतिबंधित महिन्यात) जे तुमच्यावर हात उगारतील त्यांच्या विरुध्द तुम्हीही हात उगारा आणि ईशकोपाचे भय बाळगा, आणि लक्षात ठेवा की अल्लाह धर्मपरायण लोकांसोबत आहे." *(दिव्य कुरआन, २:१९०-१९४)*

हा इस्लामच्या रक्षणासाठी अत्यंत कडक आदेश आहे. जर एखादी शक्ती इस्लामला संपविण्यासाठी आणि इस्लामी व्यवस्थेला मोडीत काढण्यासाठी प्रयत्नशील असेल तर त्या शक्तीविरुध्द जगातील तमाम मुस्लिमांनी एकत्र होऊन ह्या आक्रमणाचा मुकाबला करावा. जोपर्यंत इस्लामवरील धोका टळत नाही, तोपर्यंत मुस्लिमांनी शांत बसून राहू नये. स्वत:ला आणि आपल्या इस्लामी जीवनपध्दतीला सुरक्षित ठेवण्यासाठी प्रत्येक मुस्लिमास शत्रुचा मुकाबला करणे अनिवार्य ठरते. हदीसनुसार कथन आहे की,

"शत्रूजवळ असणाऱ्यांवर जिहाद एकूण अनिवार्य आहे आणि शत्रूपासून दूर असणाऱ्यांवर अनिवार्यत: आहे. दूर असणाऱ्यांची मदतीची गरज नसल्यास ते युध्दापासून दूर राहू शकतात. जर त्यांच्या मदतीची गरज भासली तर त्यांच्यावर जिहाद एकूण अनिवार्य ठरतो जसे नमाज रोजा अनिवार्य आहे."

इस्लाममध्ये बचावात्मक जिहादच्या या महत्वामुळे त्याला भक्तीचा दर्जा दिला आहे आणि त्याचे हे महत्त्व नमाज, रोजा पेक्षाही जास्त आहे. अशा वेळी जिहाद करणे श्रध्दाशीलतेचे लक्षण आणि कसोटी ठरते. परंतु त्या मुस्लिमांनी रोम साम्राज्याच्या विरोधात आणि त्यांच्या अफाट शक्तीला घाबरून युध्दात भाग घेतला नव्हता आणि त्यांच्या श्रध्दाशीलतेच्या दुर्बलतेला पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना घरी बसून राहण्याची परवानगी दिली होती. त्या घटनेला कुरआन विशद करीत आहे,

" हे पैगम्बर (स.) अल्लाह तुम्हाला क्षमा करो, तुम्ही त्यांना परवानगी का दिली? (तुम्ही खुद्द त्यांना परवानगी द्यावयास नको होती) जेणेकरून कोण खरे आहेत हे तुम्हावर उघड झाले असते व खोट्यांनादेखील तुम्ही ओळखले असते. जे लोक अल्लाहवर व अंतिम दिनावर

श्रध्दा ठेवतात ते तर कदापि तुमच्याकडे अशी विनंती करणार नाही की त्यांना आपल्या जीवित व वित्तानिशी युध्द करण्यापासून माफ केले जावे. अल्लाह ईशपरायण लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो. अशी विनवणी तर तेच लोक करतात जे अल्लाह आणि अंतिम दिनावर श्रध्दा ठेवत नाहीत, त्यांच्या हृदयात शंका आहे आणि ते आपल्या शंकेतच द्विधाग्रस्त झाले आहेत.''

*(दिव्य कुरआन, ९:४३-४५)*

**बचावात्मक युध्दाची स्थिती** - वरील आदेशावरून हे सिध्द होते की मुस्लिमांनी आपला धर्म इस्लाम आणि इस्लामी जीवनपध्दतीचा बचाव करण्यासाठी आपले सर्वस्व पणाला लावले पाहिजे. इस्लामचा ध्वज सतत उंचावत राहण्यासाठी आपल्या अनुयायींना फक्त युध्दाचीच परवानगी देण्यात आली नाही तर त्याची सक्त ताकिद दिली आहे. आक्रमणाचे स्वरुप हे वेगवेगळे आहेत. एक लष्करी आक्रमण तर आहेच परंतु अनेक प्रकारे मानवी स्वातंत्र्यावर आणि धार्मिक स्वातंत्र्यावर आक्रमण करून त्यांना संपविणाचा प्रयत्न होतो. कुरआनमध्ये बचावात्मक युध्दासंबंधी (जिहाद) अनेक संदर्भ आलेले आहेत. ते खालील प्रमाणे

**१) अत्याचारविरोधी प्रतिकार** - कुरआनमध्ये युध्दासंबंधी परवानगी देण्यासाठी सर्व प्रथम जो आदेश आला तो 'सूरह हज' या अध्यायात आला आहे. कुरआनोक्ती आहे,

''परवानगी दिली गेली युध्द करण्याची त्या लोकांना ज्यांच्याविरुध्द युध्द सुरु आहे कारण ते अत्याचारपीडित आहेत. आणि अल्लाह निश्चितपणे त्यांच्या मदतीला समर्थ आहे. हे ते लोक आहेत जे आपल्या घरातून नाहक बाहेर काढले गेले, केवळ या अपराधापायी की ते म्हणत होते, आमचा पालनकर्ता अल्लाह आहे.'' *(दिव्य कुरआन, २२:३९-४०)*

दुसरा आदेश 'सूरह बकरा' या अध्यायात आलेला आहे, कुरआनोक्ती आहे,

''आणि तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या लोकांशी लढा जे तुमच्याशी लढतात परंतु अतिरेक करु नका. अल्लाहला अतिरेक करणारे आवडत नाहीत. आणि त्यांच्याशी युद्ध करा जिथे कुठे तुमचा त्यांच्याशी सामना होईल. आणि त्यांना त्या ठिकाणाहून हाकलून लावा जिथून त्यांनी तुम्हाला हाकलेले होते. हे यासाठीच की जरी हत्या करणे वाईट असले तरी उपद्रव करणे हे त्यापेक्षाही वाईट आहे.'' *(दिव्य कुरआन, २:१९०-१९१)*

वरील दोन्ही संकेत वचनांवरून (आयती) खालील आदेश प्राप्त होतात-

१) जेव्हा श्रध्दावंतांशी (मुस्लिमांशी) युध्द केले जाईल आणि त्यांच्यावर अत्याचार होत असेल तर त्यांनी बचावात्मक युध्द (जिहाद) करणे योग्य आहे.

२) जे लोक मुस्लिमांची घरंदारं, धनसंपत्ती लूटतात आणि त्यांच्या व्यक्तीस्वातंत्र्यावर डाका टाकतात, त्यांना देशोधडीला लावतात अशा उपद्रवी व अत्याचारी

लोकांविरुध्द युध्द केले पाहिजे.

३) मुस्लिमांचे धार्मिक हक्क हिरावून घेतले जातात आणि त्यांना फक्त या कारणांसाठी त्रास दिला जातो की ते मुस्लिम आहेत. तर धार्मिक स्वातंत्र्य पुन्हा प्राप्त करण्यासाठी त्यांना युध्द करण्याची परवानगी आहे.

४) शत्रू ज्या देशातून मुस्लिमांना जबरदस्तीने बाहेर काढतो आणि मुस्लिमांना सत्ताहीन करून सोडतो अशा वेळी सत्तेला पुन्हा प्राप्त करण्यासाठी सामर्थ्यप्राप्तीनंतर मुसलमानांनी शत्रूला त्यांच्या भूमीतून हाकलून दिले पाहिजे जेथून शत्रूने त्यांना बाहेर काढले होते.

**२) सत्यमार्गाचे रक्षण** - 'सूरह अन्फाल' या अध्यायात ईशद्रोहींच्या विरोधात युध्द करण्याचा आणि त्यांचा समूळ नायनाट करण्याचा आदेश खालीलप्रमाणे आला आहे.

"ज्या लोकांनी सत्य स्वीकारण्यास नकार दिला ते मालमत्ता अल्लाहच्या मार्गापासून लोकांना रोखण्यासाठी खर्च करीत आहेत व आता आणखीही खर्च करीत राहतील. परंतु सरतेशेवटी हेच प्रयत्न त्यांच्यासाठी पश्चात्तापाचे कारण बनतील मग पराभूत होतील, मग हे अश्रध्दावंत नरकाकडे घेरून आणले जातील." *(दिव्य कुरआन, ८:३६)*

कुरैशच्या अश्रध्दावंतांच्या लष्कराविरूध्द बदर या ठिकाणी युध्द लढण्यासाठी अल्लाहने श्रध्दावंतांसाठी आपली मदत पाठविली जेणेकरून सत्य हे असत्यापासून वेगळे व्हावे. कुरआनोक्ती आहे,

"आणि त्या लोकांसमान रंगढंग अंगीकारू नका जे आपल्या घरातून ऐटीत आणि लोकांना आपली शान दाखवीत निघाले व ज्यांचे वर्तन असे आहे की अल्लाहच्या मार्गापासून रोखतात, जे काही ते करत आहेत ते अल्लाहच्या पकडीच्या बाहेर नाही."

*(दिव्य कुरआन, ८:४७)*

'सूरह तौबा' या अध्यायात या अनेकेश्वरवादींच्या अत्याचारांचा खुलासा करतांना कुरआनोक्ती आहे,

"त्यांनी अल्लाहच्या वचनांच्या बदल्यात थोडीशी किंमत स्वीकारली मग अल्लाहच्या मार्गात अडथळा बनून उभे राहिले. फारच वाईट कृत्ये आहेत जी हे करीत राहिले आहेत." *(दिव्य कुरआन, ९:९)*

पुढे ग्रंथधारकांशी युध्द करण्याचा आदेश आला. त्यांच्या अत्याचाराचे वर्णन खालीलप्रमाणे आले आहे,

"हे श्रध्दावंतांनो! या ग्रंथधारकांच्या बहुतेक धर्मपंडितांची व साधुसंतांची स्थिती अशी आहे की ते लोकांचा माल लबाडीने खातात आणि त्यांना अल्लाहच्या मार्गापासून

रोखतात." *(दिव्य कुरआन, ९:३४)*

या मुद्याला 'सूरह मुहम्मद' या अध्यायात तपशीलवार समजावून देण्यात आले आहे,

"ज्या लोकांनी द्रोह केला आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखले, अल्लाहने त्यांची कृत्यें वाया घालविली म्हणून जेव्हा या अश्रध्दावंतांशी तुमचा सामना होईल तेव्हा पहिले काम मानेवर प्रहार करणे आणि जेव्हा तुम्ही त्यांच्यावर मात कराल तेव्हा त्यांना बंदी करून ठेवा. नंतर त्यांच्यावर अनुग्रह करा किंवा अर्थदंड घ्या." *(दिव्य कुरआन, ४७:१-४)*

वरील सर्व संकेतवचनांनुसार कळून येते की 'अल्लाहच्या मार्गापासून रोखणे' हासुध्दा असा अत्याचार आहे ज्याविरुध्द युध्द अटळ आहे. 'अल्लाहच्या मार्गापासून रोखणे' म्हणजे अल्लाहच्या सरळमार्गापासून-सत्य मार्गापासून-रोखणे. अल्लाहने आपल्या सत्यधर्माला (इस्लाम) मार्गाची (सरळमार्ग) उपमा दिली आहे. इस्लामधर्म जणूकाही एक मार्ग आहे जो सरळ ध्येयाकडे नेतो म्हणजेच अल्लाकडे नेतो. सरळमार्ग (इस्लाम) हा श्रध्दाशीलतेचा मार्ग आहे आणि त्याच्या विरुध्द श्रध्दाहीनता व द्रोहाचा मार्ग आहे. सडक दुर्घटनेत अपघाती मरण पावलेल्यांना कुरआनने जिंवत म्हटले नाही, परंतु अल्लाहच्या मार्गात जो मारला जातो त्याला कुरआनने जिवंत असल्याचा दाखला दिला आहे. म्हणून सरळमार्गापासून रोखणे म्हणजे इस्लामपासून रोखणे आहे.

आता आपण विचार करू या की इस्लामपासून रोखणे (अल्लाहच्या मार्गापासून रोखणे) म्हणजे नेमके काय? इस्लामला मार्गाची उपमा दिली यावरून त्याला रोखण्याची स्थितीसुध्दा त्या वाटसरू सारखीच असणार. एखाद्या मार्गाला रोखून धरण्याचे तीन प्रकार आहेत. एकतर ते लोक (प्रवासी) दुसऱ्या मार्गाने जात आहेत त्यांना या मार्गावर येण्यास रोखणे. दुसरा प्रकार ते लोक जे या सरळमार्गावर चालत आहेत त्यांना या मार्गापासून जबरदस्तीने रोखणे. तिसरा प्रकार या सरळ मार्गावर चालणाऱ्यांना मार्गक्रमण करणे असह्य व्हावे म्हणून मार्गावर काटेकुटे टाकून लोकांना रोखणे, हे ते तीन अडथळे आहेत. इस्लाम स्वीकारण्यापासून रोखून धरणे. दुसरा प्रकार म्हणजे मुस्लिमांना (श्रध्दावंतांना) बळजबरीने श्रध्दाहीन अथवा द्रोही बनविणे आणि तिसरा प्रकार मुस्लिमांना इस्लामी जीवन जगण्यापासून रोखणे. कुरआनमध्ये या तिन्ही प्रकारच्या अडथळ्यांची अनेक उदाहरणे आलेली आहेत. जे कोणी अशा प्रकारे इस्लामच्या मार्गात अडथळे निर्माण करत असेल त्याला मार्गातून दूर करणे आणि त्याला निर्बळ करून सोडणे हे काम मुस्लिमांचे नैतिक जबाबदारीचे आणि धार्मिक अनिवार्यतेचे आहे.

**३) धोकेबाजी आणि विश्वासघाताची शिक्षा** - 'सूरह अन्फाल' या अध्यायात एका आणखीन अत्याचाराबद्दल युध्द करण्याचा आदेश आला आहे,

"खचितच अल्लाहजवळ जमिनीवर चालणाऱ्या निर्मितीपैकी सर्वात जास्त वाईट ते लोक आहेत ज्यांनी सत्य मानण्यास नकार दिला मग कोणत्याही प्रकारे ते स्वीकारण्यास ते तयार नाहीत. (विशेषत:) त्यांच्यापैकी ते लोक ज्यांच्याशी तू करार केला मग ते प्रत्येक प्रसंगी तो भंग करतात आणि त्यांना जरादेखील ईश्वराच्या कोपचे भय वाटत नाही. म्हणून जर हे लोक तुम्हाला युध्दात सापडले तर त्यांचा असा समाचार घ्या की त्यांच्यानंतर जे लोक असले वर्तन अंगीकारणारे असतील त्यांचे भान हरपले जाईल. अपेक्षा आहे की करार भंग करणाऱ्यांच्या या अशा शेवटाने ते धडा घेतील. आणि जर तुम्हाला एखाद्या लोकसमुदायाकडून दगलबाजीची भीती असेल तर त्यांचे करार जाहीरपणे त्यांच्या तोंडावर फेकून द्या. निश्चितच अल्लाह विश्वासघातकी लोकांना पसंत करीत नाही. सत्याचा इन्कार करणाऱ्यांनी या भ्रमात पडू नये की त्यांनी विजय मिळविला खचितच ते आम्हाला हरवू शकत नाही." *(दिव्य कुरआन, ८:५५-५९)*

याचप्रमाणे 'सूरह तौबा' या अध्यायात मुस्लिमांशी करार भंग करणाऱ्या श्रध्दाहीन लोकांविरुध्द कडक शब्दात आदेश दिला गेला की,

"मुक्तीची घोषणा आहे, अल्लाह व त्याचे पैगम्बर (स.) कडून त्या अनेकेश्वरवादी लोकांसाठी ज्यांच्याशी तुम्ही करार केले होते. जर तुम्ही देशात आणखी चार महिने संचार करून घ्या आणि जाणून असा की तुम्ही अल्लाहला असफल करणारे नाहीत आणि अल्लाह सत्याचा इन्कार करणाऱ्यांना अपमानित करणारा आहे."

*(दिव्य कुरआन, ९:१-२)*

ज्या अनेकेश्वरवादींनी करार भंग केला नाही त्यांच्या बरोबर करार मुदतीपर्यंत पाबंदी करा आणि आदेश दिला,

"मग जेव्हा निषिध्द महिने लोटले तेव्हा त्या अनेकेश्वरवादींना ठार करा, जेथे सापडतील तेथे त्यांची नाकेबंदी करा व प्रत्येक पातळीवर त्यांचा समाचार घेण्यासाठी सज्ज राहा. मग जर त्यांनी पश्चात्ताप केला व नमाज कायम केली आणि जकात दिली तर त्यांना सोडून द्या. अल्लाह क्षमाशील आणि दया दाखविणारा आहे." *(दिव्य कुरआन, ९:५)*

पुढे जाऊन विश्वासघातकी अनेकेश्वरवादींबद्दल आदेश आला आहे,

"या अनेकेश्वरवादींसाठी अल्लाह व त्याच्या पैगंबराजवळ कोणताही करार कसा बरे असु शकतो? त्या लोकांखेरीज ज्यांच्याशी काबागृहापाशी तुम्ही करार केला होता. म्हणून जोपर्यंत तुमच्याशी ते सरळ रहातील तोपर्यंत तुम्हीदेखील त्यांच्याशी सरळ राहा, कारण अल्लाह ईशपरायण लोकांना पसंत करतो. परंतु यांच्याशिवाय इतर अनेकेश्वरवादींशी कोणताही करार कसा बरे होऊ शकतो, जेव्हा त्यांची स्थिती अशी आहे की तुमच्यावर ताबा मिळविला तर ते तुमच्यासंबंधी नात्यागोत्याचाही विचार करणार नाहीत की एखाद्या कराराच्या जबाबदारीचा? ते आपल्या संभाषणाने तुम्हाला प्रसन्न करू पाहतात परंतु हृदये त्यांची नाकारतात व

त्यांच्यापैकी बरेच जण अवज्ञाकारी आहेत." *(दिव्य कुरआन, ९:७-८)*

यानंतर पुन्हा या दुराचारी लोकांबद्दल सांगितले गेले आहे,

"कोणत्याही श्रद्धावंताच्या बाबतीत हे नात्या–गोत्याचाही विचार करीत नाहीत किंवा एखाद्या कराराच्या जबाबदारीचादेखील नाही. आणि अतिरेक नेहमी यांच्याकडूनच झालेला आहे. पण जर यांनी पश्चाताप केला व नमाज कायम केली व जकात दिली तर हे तुमचे धर्मबंधु आहेत आणि जाणणाऱ्या लोकांसाठी आम्ही आमचे आदेश स्पष्ट करीत आहोत. आणि जर प्रतिज्ञा घेतल्यानंतर यांनी पुन्हा आपल्या शपथा मोडल्या आणि तुमच्या धर्मावर हल्ले करण्यास सुरवात केली तर द्रोहाच्या ध्वजधारकांशी युद्ध करा कारण त्यांच्या शपथा विश्वासपात्र नाहीत." *(दिव्य कुरआन, ९:१०-१२)*

वरील संकेतवचनांवरून कळून येते की जे लोक मुस्लिमांशी करार करून त्याला नंतर तोडून देतात, अशांशी युध्द केले पाहिजे. या आदेशात ते अनेकेश्वरवादींसुध्दा येतात जे मुस्लिमांशी करार करतात आणि पुन्हा इस्लामी शासनाविरुध्द बंड पुकारतात. तसेच करार करूनसुध्दा त्यांच्या मुळे इस्लाम आणि मुस्लिमांना प्रत्येक वेळी नुकसान होत असेल आणि जे वारंवार करार करून तोडतात, अशांच्यावर विश्वास न ठेवता त्यांच्याशी युध्द केले पाहिजे, त्यांनी क्षमा मागितली तर त्यांना क्षमा केली जावी.

**४) आंतरिक शत्रूंचा मुकाबला** - बाह्य शत्रूंपेक्षा हे आंतरिक शत्रू जास्त खतरनाक असतात. ते बाहेरून मित्र असतात परंतु आतून मात्र इस्लामच्या मुळावर कुठाराघात करणारे असतात. हे दांभिक लोक आहेत. कुरआनने त्यांना 'मुनाफिक' असे संबोधले आहे आणि त्यांच्याबाबत आदेश दिला आहे,

"हे नबी (स.)! अश्रध्दावंत आणि दांभिक दोघांचा सर्व शक्तीनिशी सामना करा आणि त्यांच्याशी कठोर व्यवहार करा सरतेशेवटी यांचे ठिकाण नरक आहे."

*(दिव्य कुरआन, ९:७३)*

"जर दांभिक आणि ते लोक ज्यांच्या हृदयात रोग आहे आणि ते मदिनेत प्रक्षोभक अफवा पसरविणारे आहेत, आपल्या कारवायापासून परावृत्त झाले नाही तर आम्ही त्यांच्या विरुध्द कारवाई करण्यासाठी तुम्हाला उभे करू मग ते या शहरात तुमच्या समवेत मुश्कीलीनेच राहू शकतील त्यांच्यावर चोहोकडून धिक्काराचा मारा होईल, जेथे कोठे ते सापडतील पकडले जातील आणि भयंकररित्या ठार मारले जातील. हा अल्लाहचा शिरस्ता आहे जो अशा लोकांच्या बाबतीत पूर्वापार चालत आलेला आहे आणि तुम्हाला अल्लाहच्या परिपाठात कोणताही बदल आढळणार नाही." *(दिव्य कुरआन, ३३:६०-६२)*

"ते तर हे इच्छितात की ज्याप्रमाणे ते स्वत: अश्रध्दावंत आहेत त्याचप्रमाणे तुम्हीही अश्रध्दावंत बनावे, म्हणजे तुम्ही व ते सर्वजण एकसारखेच व्हावे. म्हणून त्यांच्यापैकी कोणालाही

आपला मित्र बनवू नका जोपर्यंत ते अल्लाहच्या मार्गात देशांतर करून येत नाहीत आणि जर ते स्थलांतरापासून पराङ्मुख राहतील तर जेथे आढळतील तेथे त्यांना पकडा व ठार करा आणि त्यांच्यापैकी कोणासही आपला मित्र व सहायक बनवू नका." *(दिव्य कुरआन, ४:८९)*

"आणखी एका प्रकारचे दांभिक तुम्हाला असे आढळतील जे इच्छितात की तुमच्याकडूनदेखील अभय लाभावे व आपल्या लोकांकडूनसुध्दा पण जेव्हा कधी त्यांना उपद्रवाची संधी लाभेल तेव्हा ते त्यात उडी घेतील, असले लोक जर तुमच्याशी दोन हात करण्यापासून दूर राहत नसतील आणि समेट व सुरक्षा तुम्हा पुढे सादर करत नसतील व आपले हात आवरत नसतील तर जेथे ते सापडतील त्यांना धरा व मारा, त्यांच्यावर हात टाकण्यासाठी आम्ही तुम्हाला उघड अधिकार देऊन टाकला आहे." *(दिव्य कुरआन,४:९१)*

वरील संकेतवचनांत दांभिकांचा तो अपराधसुध्दा वर्णन केला आहे ज्यामुळे त्यांना ठार करणे आवश्यक बनते. आणखी खुलाशासाठी आपण कुरआनमध्ये या दांभिक लोकांबद्दल इतरत्र आलेला उल्लेखसुध्दा पाहू या,

"ते तोंडावर म्हणतात की, आम्ही आज्ञाधारक आहोत. पण जेव्हा ते तुमच्यापासून निघून जातात तेव्हा त्यांच्यापैकी एक गट रात्री एकत्र होऊन तुमच्याविरुध्द सल्लामसलत करतो. अल्लाह त्यांच्या या सर्व कुजबुजींची नोंद घेत आहे.

*(दिव्य कुरआन, ४:८१)*

'सूरह तौबा' या अध्यायात सांगितले गेले आहे,

"जर ते तुमच्याबरोबर निघाले असते तर तुमच्यात वाईटपणा वाढविण्या पलीकडे त्यांनी काहीही केले नसते. त्यांनी तुमच्यादरम्यान उपद्रव माजविण्यासाठी धावपळ केली असती आणि तुमच्या जमातीची (लोकसमुदाय) स्थिती तर अशी आहे की त्यात अद्याप पुष्कळशे असे लोक आहेत जे त्यांच्या गोष्टी कान लावून ऐकतात, अल्लाह अत्याचाऱ्यांना चांगलेच जाणतो. यापूर्वीसुध्दा या लोकांनी उपद्रव पसरविण्याचे प्रयत्न केले आहेत आणि तुम्हाला अपयशी बनविण्यासाठी सर्व प्रकारच्या क्लृप्त्यांची उलाढाल केली आहे." *(दिव्य कुरआन, ९:४७-४८)*

"ते अल्लाहची शपथ घेऊन घेऊन सांगतात की आम्ही तुमच्यापैकीच आहोत, वास्तविक पाहतात ते मुळीच तुमच्यापैकी नाहीत. खरे तर ते असे लोक आहेत जे तुम्हापासून भयभीत आहेत. जर त्यांना एखादे आश्रयस्थान मिळाले अथवा एखादी गुहा किंवा लपून बसण्यासाठी एखादी जागा, तर पळत जावून त्यांत लपतील." *(दिव्य कुरआन, ९:५६-५७)*

"दांभिक पुरुष आणि दांभिक स्त्रिया सर्व एकमेकांशी सारखेच आहेत. दुष्कर्माचा आदेश देतात आणि सत्कर्मापासून परावृत्त करतात आणि आपले हात सत्कर्मापासून रोखतात, हे अल्लाहला विसरले म्हणून अल्लाहदेखील यांना विसरला निश्चितपणे

हे दांभिकच अवज्ञाकारी व दुराचारी आहेत."  *(दिव्य कुरआन, ९:६७)*

'सूरह अहजाब' या अध्यायात सांगितले गेले,

"स्मरण करा ती वेळ जेव्हा दांभिक आणि ते सर्व लोक ज्यांच्या हृदयात रोग होता, स्पष्टपणे सांगत होते की अल्लाह आणि त्याचे पैगंबर (स.) यांनी जे वचन आम्हाला दिले होते ते फसवणुकीशिवाय अन्य काहीच नव्हते, जेव्हा त्यांच्यापैकी एका गटाने सांगितले की, हे मदिनावासियांनो, तुमच्यासाठी आता थांबण्याचा कोणताही प्रसंग नाही, परत फिरा, "जेव्हा त्यांचा एक गट असे म्हणून नबी (स.) यांच्याकडून परवानगी मागत होता की आमची घरे धोक्यात आहेत." वस्तुत: ते धोक्यात नव्हते, खरे तर ते (युध्दापासुन) पळ काढू इच्छित होते. जर शहराच्या भोवतीने शत्रु घुसून आले असते आणि त्या वेळी यांना उपद्रवाकडे आमंत्रित केले गेले असते तर हे त्यात सामील झाले असते. आणि मुश्कीलीनेच यांना उपद्रवात सामील होण्याचा संकोच वाटला असता. या लोकांनी यापूर्वी अल्लाहशी करार केला होता की हे पाठ दाखविणार नाहीत आणि अल्लाहशी केलेल्या कराराची विचारपूस तर होणारच होती."  *(दिव्य कुरआन, ३३:१२-१५)*

'सूरह मुनाफिकीन' या अध्यायात दांभिकांना आणखी उघडे केले गेले आहे,

"हे पैगंम्बर (स.) जेव्हा हे दांभिक तुमच्यापाशी येतात तेव्हा म्हणतात, "आम्ही ग्वाही देतो की आपण खरोखर अल्लाहचे पैगंबर आहात." होय, अल्लाह जाणतो की तुम्ही निश्चितच त्याचे पैगंम्बर आहात. परंतु अल्लाह ग्वाही देतो की हे दांभिक पूर्णत: खोटे आहेत. यांनी आपल्या शपथांना ढाल बनवून घेतले आहे आणि अशा प्रकारे हे अल्लाहच्या मार्गापासून स्वत: दूर राहतात व दुनियेला रोखतात. कशी वाईट कृत्ये आहेत जी हे लोक करीत आहेत."  *(दिव्य कुरआन, ६३:१-२)*

वरील संकेत वचनांद्वारे हे कळते की दांभिकांपैकी एक गट असा आहे की ज्यांच्याशी श्रध्दावंतासारखा व्यवहार केलाच जाऊ शकत नाही. ते मुस्लिम (श्रध्दावंत) होण्याचा दावा जरी करतात तरी त्यांच्याकडून ईशद्रोहाचे आणि श्रध्दाहीनतेचे समर्थन केले जाते. तोंडाने इस्लामचा स्वीकार मात्र व्यवहार श्रध्दावंतांना नुकसान करण्याचे असते. श्रध्दावंतांच्या शत्रूंशी अशांची साठ गाठ असते. शत्रूला गुप्तपणे माहिती पुरवितात आणि श्रध्दावंतांच्या ईशपरायणतेला आणि श्रध्दाशीलतेला मार्गभ्रष्ट करण्यास सतत कार्यरत राहतात. हे दांभिक श्रध्दावंतांमध्ये फूट पाडण्याचे प्रयत्न करतात आणि शत्रूला मदत करतात. हा दांभिक लोकांचा गट ज्यावेळी इस्लाम वर काही संकट आले तर त्याच्या रक्षणार्थ काहीही न करता इस्लामच्या विनाशासाठी, प्रयत्नरत राहातो. हा गट इस्लामच्या बाह्य शत्रुंपेक्षासुध्दा अत्यंत धोकेदायक शत्रू आहे. म्हणून या गटाला इस्लामच्या शरीरापासून फोड्यासारखे कापून फेकून दिले गेले पाहिजे. असा गट हा दर्शनी कितीही श्रध्दावंतासारखा वाटत असेल अथवा दिसत असेल तरी त्याची गय करता कामा नये.

**५) शांतीरक्षण** - शत्रूचा आणखी एक प्रकार म्हणजे मुस्लिमांमध्ये राहून अथवा बाहेरून येऊन त्यांच्यात फूट पाडून उपद्रव माजवितो व हिंसाचार माजवितो जेणेकरून इस्लामी शासनाची दुर्दशा व्हावी. अशा प्रकारे इस्लामी शासनाला उलथून पाडण्याचे कट रचतो. कुरआन अशा प्रकारच्या शत्रूविषयी आदेश देत आहे,

"जे लोक अल्लाह आणि त्यांच्या पैगंबराशी युध्द करतात आणि भूमीवर याकरिता धावपळ करतात की हिंसाचार माजवावा, त्यांची शिक्षा ही आहे की ते ठार मारले जातील अथवा सुळावर चढविले जातील अथवा परस्परविरुध्द दिशेने त्यांचे हातपाय कापले जातील, अथवा त्यांना देशांतर करावयाला लावले जाईल. हा अपमान व नामुष्की तर त्यांच्यासाठी दुनियेत आहे आणि मरणोत्तर जीवनामध्ये त्यांच्याकरिता याहून मोठी शिक्षा आहे. परंतु जे लोक पश्चाताप करतील यापूर्वी की तुम्ही त्यांच्यावर प्रभुत्व स्थापित करावे तुम्हाला माहीत असावयास हवे की अल्लाह माफ करणारा व दया करणारा आहे." *(दिव्य कुरआन, ५:३३-३४)*

येथे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी युध्द करतात म्हणजे वर नमुद केल्याप्रमाणे इस्लाम आणि इस्लामी शासनाविरुध्द कटकारस्थानं करणे आहे. शांती भंग करणाऱ्यांसाठी आणि उपद्रव माजविणाऱ्यांसाठी व इस्लामी शासनाविरुध्द विद्रोह करणाऱ्यांना शिक्षा कशा प्रकारची आहे हे वरील आयत मध्ये आलेले आहे.

**६) अत्याचारपीडित मुस्लिमांचे रक्षण** - बचावात्मक युध्दाच्या उद्देशांपैकी एक म्हणजे मुस्लिमांना तलवार हातात घेण्याची परवानगी यासाठी देण्यात आली की त्यांनी आपल्या निर्बलतेमुळे शत्रुपुढे हात टेकवु नये. त्यांच्या या असहाय आणि निर्बलतेच्या स्थितीमुळे इतर मुस्लिम देशांनी त्यांच्या मदतीसाठी धाऊन येणे आवश्यक आहे. कुरआनोक्ती आहे,

"मग काय कारण आहे की तुम्ही अल्लाहच्या मार्गात त्या असहाय पुरुष स्त्रिया आणि मुलांकरिता लढू नये ज्यांचे दुर्बल असल्यामुळे दमन केले गेले आहे आणि धावा करीत आहेत की, हे पालनकर्त्या स्वामी! आम्हाला या वस्तीतून बाहेर काढ ज्याचे रहिवाशी अत्याचारी आहेत, आणि तुझ्याकडून आमचा एखादा वाली व सहायक निर्माण कर, ज्या लोकांनी श्रध्देचा मार्ग अवलंबिला आहे ते अल्लाहच्या मार्गात लढतात आणि ज्यांनी अश्रध्देचा मार्ग अवलंबिला आहे ते तागूतच्या मार्गात (विद्रोही लोकांच्या) लढतात. तर सैतानाच्या साथीदारांशी लढा आणि खात्री बाळगा की सैतानाची कारस्थाने खरे पाहता अत्याधिक दुर्बल आहेत."

*(दिव्य कुरआन, ४:७५-७६)*

'सूरह अन्फाल' या अध्यायात अगदी स्पष्ट आदेश दिला गेला आहे,

"उरले ते लोक ज्यांनी श्रध्दा तर ठेवली परंतु स्थलांतर करून इस्लामी राज्यामध्ये आले नाहीत तर तोपर्यंत तुमचे त्यांच्याशी पालकत्वाचे काहीही संबंध नाही जोपर्यंत स्थलांतर करून येत नाहीत. परंतु जर ते धर्माच्या बाबतीत तुमच्याकडून मदत

मागतील तर त्यांना मदत करणे तुमचे कर्तव्य होय. परंतु अशा कोणत्याही जन समुदायाविरुध्द नव्हे की ज्यांच्याशी तुमचा करार झालेला आहे. जे काही तुम्ही करता ते अल्लाह पाहतो आणि जे सत्याचा इन्कार करणारे आहेत ते एकमेकांचे सहाय्य करीत असतात. जर तुम्ही हे केले नाही तर पृथ्वीवर हिंसाचार आणि भयंकर बिघाड उद्‌भवेल."

*(दिव्य कुरआन, ८:७२-७३)*

वरील संकेतवचनांत स्वतंत्र मुस्लिम आणि गुलाम मुस्लिम यांच्या संबंधांना अगदी स्पष्ट करून सांगण्यात आले आहे. हे मदतीचे कार्य धार्मिक अनिवार्यता आहे. एखादा मुस्लिम जगाच्या कानाकोपऱ्यात का असेना त्याच्याशी इतर मुस्लिमांचे नाते हे मदतनीसाचे आणि सहाय्यकाचे कायम राहते. जर त्या मुस्लिमाच्या धर्माला धोका निर्माण झाला किंवा त्याच्यावर अत्याचार होत असेल आणि तो धर्माचा हवाला देऊन मदत मागत असेल तर दुसऱ्या मुस्लिमाला हे अनिवार्य ठरते की त्याने त्याची मदत करावी. अट हीच की मदत करणाऱ्याचा करार त्यांच्याशी (शत्रूपक्ष) झालेला नसावा. कारण करार पाळणे हे आपल्या धर्मबंधुला मदत करण्यापेक्षासुध्दा जास्त महत्वाचे आहे. इस्लामला क्षति पोहचविण्यासाठी अश्रध्दावंत एक दुसऱ्याची मदत करतात. आपल्या आपसातील मतभेदांना आणि शत्रुत्वाला विसरून ते या कामी एकत्र येतात. म्हणून तुम्हीसुध्दा आपापसातील धार्मिक नाते मजबूत करून एकदुसऱ्याला शत्रूविरुध्द मदत केली नाही तर पृथ्वीवर हिंसाचार आणि भयंकर बिघाड माजेल याची चेतावणी देण्यात आली आहे. 'उपद्रव' हा कुरआनमध्ये 'फितना' या शब्दाला मराठीत पर्यायी शब्द म्हणून आपण येथे वापरत आहोत त्याचे सविस्तर स्पष्टिकरण पुढे येईलच. कुरआनने मात्र हा शब्द (फितना) अश्रध्दावंतांचे वर्चस्व माजणे आणि सत्यधर्म संकटात सापडण्यासाठी वापरला आहे. तसेच फसाद (हिंसाचार) हा शब्द दुराचारासाठी म्हणजेच सदाचारावर दुराचाराचे वर्चस्व स्थापित होण्यासाठी वापरला जातो. मुस्लिम समाजाला सत्य मार्गापासून मार्ग भ्रष्ट करण्यासाठीसुध्दा उपद्रव (फितना) हा शब्दप्रयोग होतो. उपद्रवी स्थितीत मुस्लिमांनी एक दुसऱ्याची मदत करणे अनिवार्य आहे.

**बचावात्मक युध्दाची गरज** - या युध्दाचा महत्त्वाचा उद्देश श्रध्दावंत (मुस्लिम) स्वत:च्या इस्लामधर्माला आणि स्वत:च्या अस्तित्वाला कोणत्याही स्थितीत दुराचाराच्या संकटात सापडून न देणे आणि दुराचाराचा नायनाट करण्यासाठी नेहमीच प्रयत्नशील राहणे आहे. इस्लामच्या अनुयायींनी उपद्रव (फितना) आणि दुराचाराला जगातून नष्ट करणे अल्लाहला आवडते जेणे करून मुस्लिमांचे अस्तित्व (राजकीय सामाजिक) बलवान व्हावे. जर ते स्वत: त्यांच्या नाशाला कारणीभूत ठरत असतील आणि त्यांच्या आंतरबाह्य शत्रूंपुढे हात टेकत असतील तर त्यांच्यावर अल्लाहचा कोप होईल यात मुळीच शंका नाही. त्यांचा स्वत:चाच ते विनाश करून घेतील असे नाही तर मानवतेचा विनाश घडून येईल. अल्लाहने तर मानवतेच्या भल्यासाठी त्यांना जगात पाठविले होते. हा अत्याचार त्यांच्यावरच नाही तर समस्त

मानवजातीवर होईल म्हणून मुस्लिमांना अगदी स्पष्टपणे त्यांच्या शत्रुंची ओळख करून देण्यात आली आहे आणि एकेकांचे शीर धडापासून वेगळे करून टाकण्याची ताकीद दिली आहे जेणेकरून मानवतेचे शत्रू आणि सत्यामार्गाच्या अडथळ्याला कायमचेच नष्ट केले जावे. या शत्रूविरुध्द सतत सतर्क राहण्याचा आदेश देण्यात आला आहे ज्यामुळे शत्रू आपले डोके वर काढू शकणार नाही आणि त्याला सत्याचा धाक अशा पध्दतीने बसावा की आतून तो पोखरला जावून त्याचा या स्थितीत नाश व्हावा. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

''आणि तुम्ही लोक, यथाशक्ती जास्तीत जास्त सामर्थ्य आणि तयार बांधून ठेवलेले जाणारे घोडे सज्ज ठेवा. जेणेकरून त्यायोगे अल्लाहच्या व आपल्या शत्रूंना आणि त्या इतर वैऱ्यांना भयभीत करावे ज्यांना तुम्ही जाणत नाही परंतु अल्लाह जाणतो. अल्लाहच्या मार्गात जे काही तुम्ही खर्च कराल त्याची पुरेपूर तुम्हाला परत फेड केली जाईल व तुमच्यावर कदापि अन्याय होणार नाही.'' *(दिव्य कुरआन, ८:६०)*

या संकेतवचनावरून कळून येते की मुस्लिमांच्या रक्षणासाठी तात्पुरती सैन्यव्यवस्था योग्य नाही जी फक्त युध्दाच्या वेळीच निर्माण केली जाते आणि नंतर नाही. संरक्षणव्यवस्था ही कायमस्वरुपी आवश्यक आहे जी माणुसकीच्या शत्रूसंगे युध्द करण्यासाठी आहे. सामर्थ्यवान संरक्षण व्यवस्थेमुळे शत्रुवर धाक बसून जातो आणि इतरांना त्याच्याशी शत्रुत्व ठेवण्याचा विचारसुध्दा मनात येत नाही. त्याचे शत्रूनंतर त्यांचे मित्र बनतात. संरक्षणावर खर्च हा व्यर्थ नसून आवश्यक आहे. सामर्थ्यवान संरक्षण व्यवस्थेमुळे तुमच्यावर अत्याचार केला जात नाही. अत्याचारापासून सुरक्षित राहिल्याने तुम्हाला शांती सुरक्षितेचे फायदे मिळू लागतात. या जगात आणि पारलौकिक जीवनात दोन्हीकडे ह्याने फायदा होतो आणि दोन्ही जगात अत्याचार विरहित जीवन उपलब्ध होते. एका मुस्लिमाचे भौतिक आणि आध्यात्मिक यश यावर अवलंबून आहे. जगाच्या यशाने धर्माची कार्यसिध्दी प्राप्त होते.

प्रकरण ३

# जिहाद (सकारात्मक युध्द)

बचावात्मक युध्दाव्दारे (जिहाद) श्रध्दावंतांच्या सामूहिक आणि राष्ट्रीय सामर्थ्याला टिकवून ठेवण्याचे जे कार्य होते त्याचा उद्देश काय? काय फक्त श्रध्दावंतांचे सामर्थ्य टिकवून ठेवून आबाधित राखावे इतकेच त्या जिहादचे उद्देश आहे? जगातील उपद्रवांपासून आणि असत्य ताकदीपासून त्यांचा बचाव करणे एवढाच उद्देश त्या जिहादचा नाही. मुस्लिम त्यांच्या सामाजिक आणि राष्ट्रीय सामर्थ्याला आबाधित न राखता त्यांच्या 'खऱ्या सेवेला' न्याय देवूच शकणार नाहीत. या बद्दल मागील प्रकरणात उल्लेख झाला आहे. मुस्लिमांना ज्या उद्देशासाठी या जगात अल्लाहने धाडले आहे तो उद्देश प्राप्त करणे हे त्यांच्या अस्तित्वाचे गमक आहे. कुरआन हा ईशग्रंथ इस्लामी शिकवणीच्या प्रत्येक पैलूवर मार्गदर्शन करतो. ज्यासाठी मुस्लिमांना निर्माण केले त्या उद्देशाला कुरआन स्पष्टपणे मांडत आहे आणि ती 'खरी सेवा' याचा उल्लेखसुध्दा कुरआनमध्ये आला आहे. त्या 'खऱ्या सेवेसाठी' सामर्थ्य आणि बळाची आवश्यकता आहे. त्या विना उद्देश प्राप्ती अशक्य आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"आता जगात तो सर्वोत्तम जनसमुदाय तुम्ही आहात ज्याला मानवांच्या मार्गदर्शन व सुधारणेकरिता मैदानात आणले गेले आहे. तुम्ही सदाचाराचा आदेश देता व दुराचारापासून प्रतिबंध करता आणि अल्लाहवर श्रध्दा बाळगता." *(दिव्य कुरआन, ३:११०)*

वरील संकेतवचनावरून हे स्पष्ट होते की मुस्लिम हे फक्त काही खास देशांकरिता अथवा जाती वंशाकरिता निर्माण केले गेले नाहीत. तर त्यांना या जगात समस्त मानवतेची सेवा करण्यासाठी अल्लाहने नियुक्त केले आहे. मानवतेची सेवा (खरी सेवा) ही आहे की ते सदाचाराचा आदेश देतात व दुराचारापासून मानवांना प्रतिबंध करतात. एका जनसमुदायाचा (राष्ट्राचा) जीवनउद्देश समस्त मानवतेची सेवा करणे आहे. या गोष्टीला तो राष्ट्रीयतेचा कट्टर जनसमुदाय आपल्या पचनी पाडू शकत नाही. अशांची दृष्टी ही मर्यादित स्वरुपाची आणि पूर्वग्रहदुषित असते. राष्ट्रभिमान व राष्ट्रभक्तीच्या मोठमोठ्या वल्गणा केल्या जातात. राष्ट्रभक्तीच्या दिखाव्यात 'कोण पुढे पळे तो' अशी शर्यतच जणू काही अशा राष्ट्रभक्तांमध्ये सुरु असते. अशांना भौगोलिक आणि वर्णभेदाच्या सीमा पार करून समस्त मानव जातीची सेवा करणे आणि या कार्याला स्वत:च्या जनसमुदायाचे (राष्ट्र) जीवनउद्देश सिध्द करून दाखविणे कसे बरे शक्य आहे? ही 'खरी सेवा' तर त्यांच्या आवाक्याबाहेरचीच! समस्त मानवतेची सेवा म्हणजे काय हे आता आपण पाहू या.

**सामुदायिक कर्तव्य व त्यांचे महत्त्व** - मनुष्याच्या मनोविश्वाचा ठाव घेतला तर तुम्हाला समजेल की इच्छा आकांक्षानी भरभरून गेलेले हे विश्व आहे. जशा प्रकारे एक मनुष्य उत्तम प्रकारच्या चवीष्ट भोजनाची इच्छा करतो तसेच एक घोडासुध्दा हिरवेगार घास खाण्याचा इच्छुक असतो. ज्या प्रकारे एक मनुष्य स्वत:च्या जीवाचे रक्षण करण्यासाठी बचावात्मक पवित्रा घेतो त्याचप्रमाणे एखाद्या लहानशा किड्यामध्येसुध्दा ही इच्छा असते. मनोकामनेच्या दृष्टीने पशु आणि मानव साधारणत: एक सारखेच आहेत. या दोघांत म्हणजे पशु आणि मानवात फरक होतो तो याचमुळे की पशुचे जीणे हे त्यांच्या इच्छा आकांक्षांना पूर्ण करण्यासाठीच असते परंतु मनुष्याच्या जीवनाचा उद्देश फक्त इच्छा आकांक्षांना पूर्ण करणे नाही. मानवी जीवनउद्देश एका महान कार्य प्राप्तीसाठी आहे. जर मनुष्याचे जीवनध्येय पशुच्या जीवनध्येयापेक्षा वेगळे आणि श्रेष्ठ नसेल तर अल्लाहने प्रदान केलेल्या अकलेचा आणि सामर्थ्याचा उपयोग मनुष्य फक्त भौतिक सुख–सुविधा प्राप्त करण्यासाठी आणि स्वत:च्या पाशवी इच्छा आकांक्षांची पूर्ती करण्यासाठीच करेल. असा मनुष्य तर एक श्रेष्ठ 'पाशवी मानव' जरूर बनेल पण मनुष्य बनू शकणारच नाही.

मनुष्य स्वत:ला जिवंत ठेवण्यासाठी उपजीविका कमावण्यासाठी मजबूर आहे. प्रयत्न केले नाही तर उपासमार होईल. रोटी, कपडा, मकान हे त्याची जीवनावश्यकता आहे. या विना त्याचे अस्तित्व नाही. याचप्रमाणे त्याला आपल्या शत्रूंपासून रक्षण करणे आवश्यक ठरते. या प्रयत्नांत ढील दिली तर शत्रुचे वर्चस्व होऊन मनुष्य अपमानित व धिक्कारित बनून राहतो. परंतु या गरजा पूर्ण करणे म्हणजे जीवनध्येय नव्हे तर जीवनध्येय प्राप्त करण्याची साधने आहेत. मानवीजीवनाच्या श्रेष्ठतम अशा जीवनध्येयाला प्राप्त करण्याचे हे साधन मात्र आहे. खरा मनुष्य तो आहे जो आपले हक्क यासाठी बजावतो की आपल्या कुटुंबाचे, शहराचे, राष्ट्राचे आणि त्याच्या निर्माणकर्ता अल्लाहचे हक्क अदा करता यावेत. तसेच स्वत:च्या जबाबदाऱ्यांची पूर्तता सक्षमरीतीने करता यावी. त्याच्या पालनकर्ता अल्लाहने त्याच्यावर काय जबाबदारी सूपुर्द केलेली आहे त्याला जाणून घेऊन त्या जबाबदारीला अदा करणे, पार पाडणे मनुष्याचे जीवनध्येय आहे. स्वत:चे स्वत:वर स्वत:चेच हक्क नाहीत तर स्वत:वर इतरांचेसुध्दा हक्क आहेत. मनुष्य स्वत:चे हक्क पार पाडणार नाही तर तो दुसऱ्याचे हक्क कसे पार पाडणार? म्हणून दोन्ही प्रकारचे हक्क मनुष्यावर अनिवार्य केले आहेत.

जेव्हा हे तत्त्व एका व्यक्तीसाठी लागू आहे तर ते समाजासाठी आणि राष्ट्रांसाठी सुध्दा लागू पडणे हे स्वाभाविक आहे. समाज गठन (जमात) झाल्याने मानवतेत काहीही कमी जास्त होत नाही. म्हणूनच एका समाजाच्या प्रतिष्ठेचे प्रमाण तेच असणार जे एका व्यक्तीचे आहे. असा मनुष्य ज्याच्या आयुष्याचे ध्येय मनोकामनांची पूर्तीशिवाय दुसरे नाही

तर तो पशुपेक्षा जास्त कमी दर्जाचा आहे. अशा मनुष्याच्या प्रयत्नांचा आणि स्वत:च्या आयुष्याचे ध्येय पहाणे व स्वत:चा सुधार करणे, प्रगती करणे इतका सीमित बनून राहतो. मानवतेच्या भल्यासाठी तो काही एक करू शकत नाही. दुसऱ्याचे घर जळत आहे, त्याच्या इज्जतीवर डाका पडत आहे. दुसऱ्याचे जीव धोक्यात आहे याची त्याला काहीच तमा नसते. असा मनुष्य 'मनुष्य' म्हणण्याच्या लायक राहत नाही. तर मग असा समाज अथवा राष्ट्राला आपण श्रेष्ठ का म्हणावे जो स्वत:चे भले करण्यासाठी, स्वरक्षणासाठी आणि स्वत:ला दूराचारापासून दूर ठेवण्यासाठी तर भरपूर प्रयत्न करतो परंतु दुसऱ्या समाजात अथवा राष्ट्रात दुराचार, हिंसाचार, अत्याचार बोकाळलेला आहे, त्याची नैतिकता खालावली आहे, अनेक उपद्रव माजलेले आहेत अशा स्थितीत त्यांच्या मदतीला धावून जाऊन त्यांच्यात सुधार घडून आणण्याचे कार्य होत नाही. ज्याप्रमाणे मनुष्यावर त्याच्या स्वत:चेच हक्क नसतात तर मानवतेचे हक्क सुध्दा त्याला बजवावे लागतात. त्याचप्रमाणे एका राष्ट्रावर मानवतेचे हक्क आहेत. ते राष्ट्र श्रेष्ठ आणि सुसंस्कृत राष्ट्र गणले जाऊ शकत नाही, जोपर्यंत राष्ट्राकडून मानवतेच्या हक्कांची पायमल्ली होत असेल. मानवतेचे हक्क अदा करण्यासाठी स्वत:च्या तन, मन, धनाची आहुती दोघांनाही द्यावीच लागते. जिहाद करावेच लागते. जिहादचे हेच एकमेव उद्दिष्ट आहे. स्वत:च्या स्वातंत्र्याचे रक्षण करणे व स्वत:च्या संस्कृतीचे संवर्धन तसेच दुराचारापासून रोखणे हे प्रत्येक राष्ट्राचे प्रथम कर्तव्य आहे. परंतु हेच एक कर्तव्य नाही तर असे करताना ती व्यक्ती अथवा राष्ट्र समस्त मानवजातीचे कल्याण करण्यासाठी प्रयत्नशील राहणे श्रेष्ठतम कर्तव्य आहे. मानवतेच्या मार्गातील नैतिक, आध्यात्मिक, भौतिक सर्व अडथळ्यांना दूर केले जावेत. तसेच हिंसाचार, अत्याचार, अन्यायाविरुध्द तसेच उपद्रवाला समूळ नष्ट करण्यासाठी सतत प्रयत्नशील राहाणे अनिवार्य आहे. हेच मनुष्याचे आणि एका राष्ट्राचे श्रेष्ठतम कर्तव्य आहे आणि त्यांच्या जीवनाचेसुध्दा श्रेष्ठतम ध्येय आहे. मनुष्याला पशुपासून वेगळे करण्याचा हाच एकमेव पर्याय आहे.

**सामाजिक जबाबदारी आणि इस्लाम** - हेच दुर्दैव आहे की जगाच्या तथाकथित विद्वानांनी सामुदायिक संस्कृती, सुसंस्कृतपणाला, या श्रेष्ठतम दर्जाला आणि श्रेष्ठतम उद्देशाला समजून घेण्याच्या प्रयत्नसुध्दा केला नाही. एखाद्याने प्रयत्न केला तरी त्याची दृष्टी दूरवर गेलीच नाही. असे हे विद्वान जेव्हा व्यक्तीच्या नैतिक अधिकारांची चर्चा करतात तेव्हा मानवतेसाठी त्यांची दृष्टी मर्यादित बनते आणि सामुदायिक कर्तव्यांना राष्ट्रीय अथवा देश पातळीवर सीमित करून राष्ट्रभक्ती अथवा देशभक्तीवर आणून ठेवतात. कालांतराने ही मानसिकता (दूषित) राष्ट्रद्वेषा (इतरांचा) कडे आमंत्रित करते. हा एक संकुचित दृष्टिकोन आहे आणि एक दुषित मानसिकता आहे ज्यामुळे एक मानवता अनेकानेक वर्ण, वंश, जात, भाषा, देश, प्रदेश यांच्या भेदाभेदात अडकून दुसऱ्यांना

मानवतेच्या हक्कांपासून वंचित ठेवते. दुसऱ्यां समाजाच्या अथवा राष्ट्रांच्या हक्कांना समजून घेणे तर दूरच परंतु त्यांना मान्यता न देता त्यांना पायदळी तुडविणे मानवतेविरुध्द कृत्य समजले जात नाही.

दिव्य कुरआनने आपल्या आदेशाने या मानवतेच्या अनैसर्गिक विभाजनाला (भेदाभेद) रद्द केले आहे. कुरआनने सामुदायिक सुसंस्कृतपणाच्या या श्रेष्ठतम गुणाला प्रदर्शित करून वैश्विक मानवतेच्या सेवेच्या (खरी सेवा) ध्येय प्राप्तीसाठी मुस्लिमांना मार्गदर्शन केले आहे. कुरआनचे हे मार्गदर्शन माणसामाणसातील भेदाभेदच्या भिंती जमीनदोस्त (नष्ट) करून सोडते. कुरआनचा स्पष्ट आदेश आहे की सत्याधिष्ठित समाजासाठी व राष्ट्रासाठी देशभक्तीचे अथवा राष्ट्रभक्तीचे क्षेत्र अत्यंत संकुचित आहे. अशा प्रकारची राष्ट्रीयता दुसऱ्याचे वंश, जात, भाषा अथवा देश यांना सहन करुच शकत नाही. कुरआनच्या नजरेत सर्व मानव हे आदम (अ.) चे मुलं आणि मुली एकसारखेच आहेत. म्हणून त्या सर्वांची सेवा करणे (खरी सेवा) म्हणजे सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारापासून त्यांना प्रतिबंधित करणे कुरआनच्या नजरेत प्रत्येकाचे कर्तव्य आहे. कुरआनने मनुष्याच्या या संकुचितपणाच्या भींतीना तोडून श्रेष्ठतम कर्तव्यासाठी एक "वैश्विक मार्ग" उपलब्ध केला आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"आणि अशा प्रकारे तर आम्ही तुम्हाला उत्तम समाज बनविले आहे. जेणे करून जगातील लोकांवर तुम्ही साक्ष व्हा. आणि पैगंबर तुमच्यावर साक्षी राहतील."

*(दिव्य कुरआन, २:१४३)*

याबद्दलचा आणखी खुलासा 'सूरह अलहज्ज' या अध्यायात आलेला आहे.

"हे श्रध्दावंतांनो, झुका व नतमस्तक व्हा, आपल्या पालनकर्त्याची भक्ती करा आणि सत्कृत्यें करा, यामुळेच अपेक्षा केली जाऊ शकते की तुम्हाला यश लाभेल, अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्टा करा जशी ती करायला हवी. त्याने तुम्हाला आपल्या कार्यासाठी निवडले आहे आणि धर्मामध्ये तुमच्यावर कोणतीही अडचण ठेवली नाही. दृढ व्हा आपल्या पिता इब्राहीम (अ.) च्या परंपरे (मिल्लत) वर, अल्लाहने पूर्वीसुध्दा तुमचे नाव मुस्लिम ठेवले होते आणि या कुरआनमध्ये सुध्दा (तुमचे नाव असेच आहे) जेणेकरून पैगंबराने तुमच्यावर साक्षी राहावे आणि तुम्ही लोकांवर साक्षीदार, म्हणून नमाज कायम करा, जकात द्या आणि अल्लाहशी दृढनिष्ठ व्हा. तो आहे तुमचावाली, फारच चांगला आहे तो वाली आणि फारच चांगला आहे तो सहाय्यक." *(दिव्य कुरआन, २२:७७)*

या दोन्ही संकेतवचनांना एकत्र करून अभ्यासले तर माहीत होते की मुस्लिमानांच्या जीवनाचा उद्देश त्या वैश्विक सेवेचा म्हणजे समस्त मानवजातीच्या सेवेचा आहे. तुम्ही एक उत्तम

जन समुदाय आहात ज्याला भेदाभेदाच्या भींतीमधे अडकून न ठेवता वैश्विक न्यायिक व्यवस्थेसाठी आणि मानवतेच्या कल्याणासाठी नियुक्त केले गेले आहे. तुम्हाला तुमच्या कथनी व करनीद्वारे सत्याची साक्ष देणे आहे. जगात सत्याधिष्टित बनून राहा आणि जीवनव्यवहारात तुमची कथनी आणि करनीद्वारे जगाला दाखवून द्या की सत्य काय आहे आणि सदाचार कोणाला म्हणतात. न्याय आणि कल्याण कशात आहे. हीच सत्याची साक्ष तुमच्या जीवनाचा एकमेव उद्देश आहे. याचसाठी तुमचे नाव मुस्लिम (आज्ञाधारक) ठेवण्यात आले आहे. यानंतर सांगण्यात आले की तुमच्या जीवनपध्दतीत (इस्लाम) काही एक संकुचितपणा नाही. त्याचे क्षेत्र अमर्यादित आहे की रंगभेद, वंशभेद, जातीभेद, भाषा आणि राष्ट्रभेद या अनैसर्गिक अनाचारांना त्यात मुळीच वाव देण्यात आलेला नाही. ह्यात स्पृश्य–अस्पृश्य अथवा वर्णाश्रमाची अट नाही. प्रत्येक मनुष्य मग तो कोणत्याही वंशाचा, जातीचा, रंगाचा, भाषेचा अथवा देशाचा असो त्याने इस्लाम स्वीकारल्यानंतर तुमच्या बरोबरीचा, तुमच्या समान, तुमचा धर्मबंधु बनतो. त्याच्या जीवनाचे तेच उद्देश ठरते जे तुमच्या जीवनाचे आहे. सत्याची ग्वाही देणे त्याच्यासाठीही अनिवार्य आहे. कुरआनोक्ती आहे,

"हे ते लोक आहेत ज्यांना आम्ही जर पृथ्वीवर सत्ता बहाल केली तर ते नमाज कायम करतील, जकात देतील, सत्कर्माचा आदेश देतील आणि वाईटाला प्रतिबंध करतील आणि सर्व बाबींचा अंतिम परिणाम अल्लाहजवळ आहे." *(दिव्य कुरआन, २२:४१)*

जगात मुस्लिमांना सामर्थ्य प्राप्त झाल्यावर व सत्ता हाती आल्यावर ते जगात अल्लाहची भक्ती करण्याकडे लोकांना आमंत्रित करतील, सत्याचा प्रचार करतील आणि असत्याला, दुराचाराला नष्ट करतील. येथेसुध्दा हेच दाखविणे अपेक्षित आहे की मुस्लिमांचे कार्य हे वैश्विक कार्य आहे. अरबांसाठी फक्त अथवा युरोपसाठी फक्त अथवा भारतासाठी फक्त त्यांचे कार्य सीमित नाही तर ते वैश्विक स्वरुपाचे समस्त मानवजातीसाठी आहे. त्यांना पृथ्वीच्या कानाकोपऱ्यात पोहचले पाहिजे. सर्व दूर जगात पसरून हातात सदाचाराचा, सत्याचा ध्वज उंचावून तसेच दुराचाराच्या आणि असत्याच्या लष्कराला नामोहरण करण्याचे काम त्यांचेच आहे. जगात जिथे जिथे दुराचार फोफावलेला आहे तिथे तिथे जाऊन त्याला नष्ट करण्याचे काम दुसरे तिसरे कुणाचे नसून मुस्लिमांचे आहे. दुराचाराला नष्ट करून त्या जागी सदाचाराला स्थापित करणे मुस्लिमांचे वैशिष्ट्यपूर्ण काम आहे. अल्लाहचा संबंध कुण्या खास वंशाशी, देशाशी मुळीच नाही. तो समस्त सृष्टीचा एकमेव निर्माता, मालक, पालक आणि शासक आहे. सर्वांबरोबर मालक म्हणून त्याचे सारखेच संबंध आहेत. म्हणून जमिनीवर कुठेही उपद्रव माजत असेल तर अल्लाहच्या नजरेत ते वाईट आहे आणि अल्लाहचा कोप होण्याचे ते कारण बनते. म्हणून अल्लाहने आपल्या सत्याच्या लष्कराला (मुस्लिमांना) आणि

त्यांच्या मानवतेच्या सेवेला कुण्या वंशाच्या, जातीच्या, रंगाच्या व देशाच्या हद्दीत कैदी बनवून ठेवले नाही. अल्लाहने त्याच्या या आज्ञाधारक लष्कराच्या सेवेला वैश्विक स्वरुप प्रदान केले आहे. समस्त मानवतेच्या कल्याणासाठी ते सतत झटत आहेत.

**सदाचाराचा आदेश आणि दुराचाराचा प्रतिबंध** - वरील विवेचना वरून आपणास माहिती मिळते की मुस्लिम (अल्लाहचा आज्ञाधारक) होण्यामुळे ते फक्त त्यांच्या स्वत:च्या सेवेसाठी फक्त निर्माण केले गेले नाही तर समस्त मानवजातीची सेवा करणे त्यांचे जीवनध्येय आहे किंबहुना एका मुस्लिमाचे अस्तित्व त्यावरच अवलंबून आहे. त्यांना राष्ट्रभक्ती अथवा वंशभक्तीसाठी मैदानात आणले नाही तर इस्लामने त्यांना मानवतेचा सेवक बनवून अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याचा जीवनध्येय दिला आहे. आता आपण पाहू या की ही मानवतेची सेवा कोणत्या प्रकारची आहे आणि त्याचे स्वरुप काय आहे?

कुरआनमध्ये सदाचारासाठी 'मारुफ' आणि त्याविरुध्द दुराचारासाठी 'मुनकर' हा शब्दप्रयोग आला आहे. माणसाचे मन सदाचाराकडे आकृष्ट होते आणि दुराचाराचा तिरस्कार करत श्रध्दाशीलता, सत्य, प्रामाणिकता, धर्मनिष्ठता, कर्तव्यनिष्ठता, अनाथांची, दुर्बलांची, असहाय्य लोकांची मदत करणे, संकटात सापडलेल्यांना मदतीचा हात देणे, अत्याचारित लोकांना मदत करणे, न्याय व्यवस्थेची स्थापना करण्यास प्रयत्न करणे, अल्लाहचे, अल्लाहच्या दासांचे आणि स्वत:चे हक्क जाणून त्यांना अदा करणे हे आणि यांच्यासारखे आणखी सद्‌व्यवहार 'सदाचारात' मोडतात. त्यांना स्वत: अंमलात आणणे आणि दुसऱ्यांना अंमलात आणण्यासाठी तसा आदेश देणे यालाच 'सदाचाराचा आदेश देणे' (अमर बील मारुफ) असे म्हटले आहे. या विरुध्द धोकाधडी, अत्याचार, अन्याय, व्यभिचार, हिंसाचार, असत्यांची बाजू घेणे आणि सत्याला दाबून ठेवणे, दुर्बळ, अनाथ तसेच असहाय लोकांना त्रास देणे अशा प्रकारचे इतर सर्व अमानवीय कृत्य व अनैसर्गिक कृत्यापासून स्वत: दूर राहणे आणि इतरांना दूर ठेवणे यालाच 'दुराचाराला प्रतिबंध करणे' (नही अनील मुनकर) असे संबोधले गेले आहे. स्वत: सदाचारी बनणे व दुराचारापासून दूर राहणे व त्याचप्रमाणे सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचाराला, प्रतिबंध करणे मानवतेची सेवा आहे. दुसऱ्याला सदाचारी बनविण्याऐवजी प्रथम स्वत: सदाचारी बनणे अत्यावश्यक आहे, ज्याप्रमाणे स्वत: पोट भरून खाण्यापेक्षा दुसऱ्या उपाशी माणसाला जेवू घालणे अधिक चांगले आहे. त्याचप्रमाणे सदाचाराचा फैलाव करणे आणि दुराचाराला रोखणे ह्याचे श्रेष्ठत्व आहे. स्वत:ला सदाचारी बनविणे आणि दुराचारापासून स्वत:ला दूर ठेवणे ही स्वत:चा सेवा झाली परंतु नेकीचा (सदाचाराचा) सामुदायिकरित्या फैलाव करणे, प्रचार, प्रसार करणे आणि दुराचाराला प्रतिबंध करणे ही समस्त मानवतेची सेवा आहे. मनुष्य स्वभाव आहे की त्याला जे आवडत नाही त्याला टाकून देतो. तसेच ज्याचा द्वेष करतो त्याला ऐकणे व

पाहाणेसुध्दा पसंत करीत नाही. त्याहून ही पुढे ज्याच्याशी शत्रुत्व होते त्याला तो नष्ट करण्यासाठी प्रयत्न करतो आणि शत्रुत्वाच्या पुढे जावून जर एखाद्याबद्दल त्याच्या मनात घृणा, तिरस्कार शिगेला पोहचतो तर त्याला नष्ट करण्याचा तो आपले जीवनध्येय बनवतो. त्यासाठी त्याच्या मागे तो हात धुवून लागतो. तो सतत बेचैन राहतो जोपर्यंत त्या तिरस्करणीयाचा नाश होत नाही. ह्याच्या विरोधात मनुष्य ज्याला पसंद करतो तर स्वत: त्याला स्वीकारतो. परंतु पुढे जाऊन जेव्हा प्रेम करु लागतो तर डोळ्यांनी त्याला पाहण्यात आणि कानाने ऐकण्यात आनंदीत होतो. जेव्हा प्रेमानंतर पुढे जाऊन आशिक (मजनू) बनतो तर जगातील प्रत्येक वस्तूत प्रियतमाला पाहण्यास आतूर होतो. या आशिकीच्या पुढे जाऊन तो नंतर त्या स्थितीला पोहचतो जेव्हा त्याचे आयुष्यसुध्दा पणाला लावतो. हे निखळ प्रेम आहे. सदाचारासाठी हे आवश्यक आहे आणि तिटकारा आणि घृणा ही दुराचारासाठी आवश्यक आहे. सदाचाराचा आदेश देणारा फक्त सदाचारीच नसतो तर सदाचाराचा 'वेडा' असतो आणि दुराचारापासून रोखणारा तो दुराचाराचा शत्रू आणि त्याचा रक्तपिपासू बनतो. दुराचाराचा अतितिटकारा करतो.

एक दुसऱ्या प्रकारची आसक्ती आणि ओढ 'सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारापासून रोखणे' साठी आहे ती म्हणजे मानवते बद्दलचे नितांत प्रेम आणि सहानुभूती! स्वार्थी मनुष्याला अल्लाहकडून जे काही प्राप्त होते त्यात तो एकटा फायदा घेतो आणि दुसऱ्यांना फायदा घेऊ देत नाही. तसेच स्वत: वर आलेल्या संकटाला स्वत:च निकराने तोंड देतो परंतु दुसऱ्याचे संकट दूर करीत नाही. परंतु मानवतेचे प्रेम ज्याला आहे तो स्वत:च्या सुखात सर्वांना सहभागी करतो आणि दुसऱ्यांच्या दु:खात मदत करतो. दुसऱ्यांच्या कामी येतो. मनुष्याची भौतिक प्रगती अथवा अधोगती ही त्याच्या नैतिकतेवर व चारित्र संपन्नतेवर अवलंबून असते. म्हणून स्वत: सदाचारी बनून राहाणे मानवतेच्या प्रेमीला अशक्य आहे. तो समाजातील दुसऱ्यांनासुध्दा दुराचाराच्या पंज्यातून सोडवतो आणि त्यांना सदाचारावर आणल्याशिवाय त्याला चैन पडत नाही. आपल्या दुसऱ्या भावाला दुराचारात फसलेला पाहून ह्याचे मन बेचैन होते. आपल्या भावाला आपल्यासारखा सदाचारी बनल्यावर पाहतांना त्याला अत्यानंद होतो. जसा आईला तिच्या आजारी बाळाला बरा होताना पाहिल्यावर अत्यानंद होतो. एखाद्या वाईट गोष्टीकडे कोणीही फटकू नये असे त्याला वाटते. एखादी चांगली गोष्ट फक्त स्वत:साठी नाही तर सर्वांसाठी आहे आणि तो त्या चांगल्या गोष्टीला सर्वांपर्यंत पोहचविण्याचा प्रामाणिक प्रयत्न करतो. तसेच एखादी गोष्ट वाईट आहे तर ती फक्त माझ्यासाठीच वाईट आहे असे नाही तर सर्वांसाठी वाईट आहे आणि त्या वाईट गोष्टीपासून सर्वांचे रक्षण करणे तो त्याचे कर्तव्य समजतो. सदाचाराला त्याच्या स्वत:पर्यंतच मर्यादित ठेवणे आणि दुसऱ्यांसाठी सदाचाराचा

प्रयत्न न करणे तसेच स्वत:पासून दुराचाराला दूर करणे आणि दुसऱ्यांना त्या दुराचारापासून रोखून न धरणे सर्वात मोठे स्वार्थ आहे आणि अहंम्वाद आहे.

परंतु हे फक्त स्वार्थ आणि अहंमवाद नाही तर स्वत:ची आत्महत्या करून घेणे आहे. मनुष्य हा सामाजिक प्राणी आहे. तो समाजाशिवाय राहूच शकत नाही. त्याची भलाई आणि बुराई ही एक सामाजिकता आहे. समाजवाईट असेल तर व्यक्तीसुध्दा वाईटापासून अलिप्त राहू शकत नाही. जर एखाद्या वस्तीमध्ये घाणीचे साम्राज्य पसरलेले आहे आणि त्याच्या दुष्परिणामाला सर्वांबरोबर ती व्यक्ती ज्याचे घर आरशासारखे स्वच्छ असते, बळी पडणार यात शंका नाही. ह्याच प्रमाणे जर एखादा समाज चारित्र्यहीन असेल आणि त्यातील लोक दुराचारी असतील तर त्या वस्तीवर जी बरबादी (विनाश) ओढवेल त्यात एखादा सदाचरणीसुध्दा ओढळा जाईल. म्हणून एखाद्या वस्तीच्या विनाशात फक्त दुराचारीच नाश पावतात असे नाही तर त्या वस्तीतील सदाचारी लोकसुध्दा विनाशाच्या खाईत ओढले जातात. या सत्यतेला पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या एका हदीसमध्ये अगदी स्पष्ट करुन सांगितले आहे,

"अल्लाह सर्वसामान्य लोकांवर खास लोकांच्यासाठी तोपर्यंत कोप होऊ देत नाही जोपर्यंत त्यांच्यात हा दोष निर्माण होत नाही की समोर दुराचार होताना पाहतात आणि त्याला रोखण्याचे सामर्थ्य असूनसुध्दा रोखले जात नाही. जेव्हा ते असे करू लागतात तेव्हाच सर्व सामान्य आणि खास या सर्व लोकांवर अल्लाहचा कोप होतो. म्हणून "सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारापासून रोखणे" ही फक्त दुसऱ्याचीच सेवा नाही तर स्वत:चीसुध्दा सेवा आणि मदत करणे आहे. वास्तविकत: सामाजिक कल्याणामध्ये स्वत:चे कल्याणसुध्दा दडलेले आहे."

**सामाजिक जीवनात सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचारापासून प्रतिबंध करणे** - हीच ती संजीवनी आहे ज्याने सामाजिक कल्याण साध्य करता येते. याचमुळे एक समाज आणि राष्ट्र विनाशाच्या खाईत पडण्यापासून सुरक्षित राहू शकते. मानवतेची सेवा सदाचाराचा आदेश देऊन आणि दूराचारापासून प्रतिबंध करूनच होऊ शकते. जोपर्यंत एका समाजात अथवा राष्ट्रांत हे स्पीरीट (सद्‌भावना) शिलक राहाते अथवा कमीतकमी त्या समाजात एक गट (जमात) असा असावा की जो सदाचाराचा आदेश देतो आणि दुराचारापासून प्रतिबंध करतो, तर असे राष्ट्र लयास जात नाही. परंतु जर ही सद्‌भावना त्या समाजातून नष्ट झाली आणि त्यात हे काम करण्यासाठी एखादा असा गटसुध्दा या मानवतेच्या सेवाकार्यात कार्यरत नाही तर हळू हळू दुराचाराचा सम्राट (सैतान) त्या राष्ट्रावर आणि समाजावर विराजमान होतो. त्या राष्ट्राचे नैतिक, भौतिक आणि राष्ट्रीय चारित्र्य लयास जाते. विनाशाच्या खाईत शेवटी ते राष्ट्र ढकलले जाते. या सत्यतेला कुरआन स्पष्ट करून सांगत आहे,

"त्या लोकांत जे तुमच्यापूर्वी होऊन गेले आहेत, असली भली माणसे का शिल्लक राहिली नाहीत ज्यांनी लोकांना जमिनीत हिंसाचार माजविण्यापासून प्रतिबंधित केले असते? असले लोक निघाले तरी फारच थोडे ज्यांना आम्ही त्या लोकांमधून वाचविले, एरव्ही अत्याचारी लोक तर त्याच मौजमजेच्या नादी लागले ज्याची सामग्री त्यांना विपुल प्रमाणात दिली गेली होती आणि ते अपराधी बनून राहिले. तुझा पालनकर्ता असा नाही की वस्त्यांना नाहक उध्वस्त करील ज्याअर्थी त्यांचे निवासी सुधारणा करणारे असतील." *(दिव्य कुरआन, ११:११६-११७)*

कुरआनमध्ये एकेठिकाणी आठवण देण्यात आली आहे की बनी इस्त्राईल राष्ट्रांत ईशद्रोही लोकांवर दाऊद (अ.) आणि ईसा (अ.) यांच्या तोंडून धिक्कार करण्यात आला कारण त्यांनी इन्कार केला आणि ते मर्यादा भंग करणारे लोक होते. ते एक दुसऱ्याला वाईटापासून रोखत नसत. त्यांच्या डोळ्यांसमोर दुराचार सर्रास होत असे आणि हे वाईट कृत्य होते जे त्या लोकांनी स्वीकारले होते. अशा प्रकारे बनी इस्त्राईल लोकांमध्ये पहिली वाईट गोष्ट प्रचलित झाली ती म्हणजे वाईटाला वाईट म्हणण्याची जाणं आणि हिम्मत त्यांच्यात शिल्लक राहिली नव्हती. वाईटाचा तिटकारा त्यांच्या मनामध्ये शिल्लक राहिला नव्हता. वाईटाला सहन करणे आणि त्याची प्रशंसा करीत राहाणे हे त्या समाजाचे वैशिष्टय बनले होते. दुराचाराला सहन करता करता सर्व समाज दुराचारी बनला होता. समाज मन मृत झाले होते. याबाबत आदरणीय पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लोकांना सावध केले आहे,

"त्याची शपथ ज्याच्या हातात माझा जीव आहे, तुम्हाला हे आवश्यक आहे की सदाचाराचा आदेश द्या आणि दुराचारापासून प्रतिबंध करा आणि दुराचारीचा हाथ धरा आणि त्याला सदाचाराकडे वळवा, अन्यथा अल्लाह तुमच्या मनावर एक दुसऱ्याचा परिणाम करील अथवा तुमच्यावरसुध्दा धिक्कार करील जसा धिक्कार त्या लोकांचा केला होता."

वरील उदाहरणावर संपूर्ण जगाने चिंतन करणे अत्यावश्यक आहे. ज्याप्रमाणे एका राष्ट्राचे कल्याण सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचाराचा प्रतिबंध करणे यावर अवलंबून आहे. त्याचप्रमाणे समस्त मानवतेचे कल्याणसुध्दा यावरच अवलंबून आहे. जगात कमीतकमी एक गट अथवा जनसमुदाय असा अवश्य असला पाहिजे जो दुराचाऱ्यांचा हाथ धरणारा, दुराचाराला प्रतिबंध करणारा आणि सदाचाराचा आदेश देणारा असेल. अल्लाहतर्फे त्याच्या जमिनीवर साक्षी बनून राहावा आणि लोकांची देखभाल करीत राहणारा असावा की जो दुष्टतेला काबूत ठेवून न्याय स्थापित करेल. अल्लाहच्या निर्मितीला विनाशापासून वाचवू शकेल. तसेच अल्लाहच्या जमिनीला उपद्रव मुक्त करणारा जनसमुदाय जगात उपलब्ध असणे अत्यावश्यक आहे अन्यथा जगबूडी होणारच यात शंका नाही. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"सद्वर्तनाचा आवाहन करणारा व चांगुलपणाचा आदेश देणारा तसेच दुराचाराचा प्रतिबंध करणारा एक गट (जनसमुदाय) तुमच्यात अवश्य असला पाहिजे."

*(दिव्य कुरआन, ३:१०४)*

वरील संकेतवचनावरून हेच सिध्द होते की जगातील सुसंस्कृत व्यवस्थेला उपद्रवापासून मुक्त ठेवण्यासाठी एक अनिवार्य अट आहे. ही एक सेवा आहे जी जगात शांती स्थापित करेल आणि जग हे सुसंस्कृत लोकांच्या राहण्याचे ठिकाण बनेल. आणि अल्लाहने अशा प्रकारे मानवांना सैतानाच्या दुष्टते पासून मुक्ती देऊन मानवतेच्या उच्च शिखरापर्यंत पोहचण्यासाठी एक वैश्विक अशी 'मानवतेची सेवा' जगाला उपलब्ध करून दिली आहे. मानवतेची यापेक्षा श्रेष्ठ सेवा कोणतीच असू शकत नाही. अल्लाहचे समस्त मानव जातीवर उपकार आहेत.

**सदाचाराचा आदेश आणि दुराचाराचा प्रतिबंध यातील फरक** - ही वैश्विक अशी मानवतेची सेवा वैश्विक मुस्लिम जन समुदायाच्या सुपूर्द करण्यात आली आहे. या सेवेचे दोन भाग आहेत. एक सदाचाराचा आदेश देणे आणि दुसरा भाग दुराचारापासून प्रतिबंध करणे. या दोघांचा उद्देश आणि हेतु जरी एकच म्हणजे मानवाला मनुष्य बनविणे आहे तरी पण दोघांच्या कार्यप्रणालीत फरक आहे आणि त्यास आता आपण जाणून घेऊ या.

मनुष्याच्या जबाबदाऱ्या दोन प्रकारच्या आहेत. पहिला प्रकार त्या जबाबदाऱ्या ज्यांना मनुष्याला पार पाडणे आवश्यक आहे. दुसरी ती जबाबदारी जी मनुष्याच्या मर्जीनुसार पार पाडली जाते. समाजाचा एक चांगला नागरिक बनण्यासाठी व्यक्तीला दुराचारापासून अलिप्त राहावे लागते. दुसऱ्यांचे हक्क न मारता त्यांच्यावर अत्याचार केला जाऊ नये. दुसऱ्यांच्या सुंदर समाधानी जीवनात व्यत्यय आणू नये. त्याने अशा दुराचारापासून दूर राहिले पाहिजे ज्यामुळे समाजाला नुकसान होईल. या कर्तव्यांना पार पाडण्याचा प्रत्येक समाज आपल्या व्यक्तीघटकाला आग्रह करतो. एखादी व्यक्ती ही कर्तव्ये पाळत नसेल तर त्याला समाज कर्तव्य पार पाडण्यास भाग पाडतो. मनुष्याच्या जबाबदारी (कर्तव्य) चा दूसरा प्रकार हा सदाचरणा वर अवलंबून आहे ज्याला केल्याने समाजात ती व्यक्ती प्रतिष्ठीत बनते. उदा. अल्लाह आणि दासांचे हक्क जाणणे आणि त्यांना अदा करणे स्वत: सदाचारी बनने आणि दुसऱ्यांना सदाचारी बनविणे, आपल्या कुटुंबाची, आपल्या समाजाची आणि आपल्या राष्ट्राची सेवा करणे इ. दुसऱ्या प्रकारच्या कर्तव्यांना पूर्ण समजून घेतल्याशिवाय त्यांना अदा करणे अशक्य होते. म्हणून हे ऐच्छिक कर्तव्यें आहेत. एक व्यक्ती प्रतिष्ठित बनून राहील अथवा नाही. परंतु समाजात चारित्र्यशीलता अशी हवी की त्या समाजाचा प्रत्येक व्यक्ती हा चारित्र्यसंवर्धन करून प्रतिष्ठित बनून रहावा. सदाचाराचा आदेश

आणि दुराचाराचा प्रतिबंध करणे या दोघांत याच प्रकारचा फरक आहे. माणसाला पशुच्या तथा सैतानाच्या पंज्यातून हिसकावून मानवतेच्या पातळीवर आणणे आणि त्यास मानवी समाजाचा विनाश करण्यापासून प्रतिबंध करणे हा 'दुराचाराचा प्रतिबंध' आहे. तसेच त्याला मानवतेच्या पातळी वरून उचलून श्रेष्ठ पातळीवर नेऊन बसवणे आणि समाजाचा एक प्रतिष्ठित नागरिक बनविणे हा 'सदाचाराचा आदेश' शी संबंधीत आहे. सदाचाराचा आदेश देणे हे कृत्य दुराचारापासून रोखण्यापासूनच्या कृत्यापेक्षा चांगले आहे. परंतु कार्यप्रणालीत दुराचाराचा प्रतिबंध करणे प्रथम आहे आणि सदाचाराचा आदेश नंतरचे कृत्य आहे. ज्या प्रकारे एका शेतकऱ्याचा उद्देश शेतीत धान्य तयार करणे आहे. परंतु त्याच्यासाठी त्याला पेरणी करण्याअगोदर नांगरून जमिनीला नरम करावे लागते. इस्लामचा उद्देशसुध्दा मनुष्याला एक उत्तम मनुष्य बनविणे आहे. परंतु सदाचाराचे बीजारोपण करण्याअगोदर मानवी स्वभावातून दुराचाराचे तन काढणे आवश्यक आहे. इस्लाम प्रत्येकाला सदाचाराकडे आवाहन करीत आहे. परंतु दुराचार एक आड आहे ज्याने सदाचाराकडे मनुष्य आत्कृष्ट होत नाही. म्हणून सर्वात प्रथम दुराचाराने गंजलेल्या मानवी मनाला प्रथम खरडून काढणे आणि त्या पडद्याची चीरफाड करणे अत्यावश्यक आहे. यानंतर जर सदाचाराला आत्मसात केले तर व्यक्ती चारित्र्याच्या उच्च शिखरावर विराजमान होतो. तसेच एखादा मनुष्य सदाचाराला यानंतरसुध्दा स्वीकारत नसेल तर इस्लाम अशा व्यक्तीला त्याच्या सद्‌विवेक बुध्दीच्या हवाली करतो.

इस्लाम एका दृष्टीने समस्त मानवतेला एक आवाहन आहे सदाचार आणि ईशपरायणतेसाठीचे! आणि दुसऱ्या अवस्थेत इस्लाम हे सर्व जगासाठी अल्लाहचा आदेश (विधीविधान) आहे. जेव्हा कोणी इस्लामचा स्वीकार करतो तेव्हा त्याच्यासाठी या दोन्ही अवस्था एक होतात आणि आवाहन हे त्याच्यासाठी आदेश बनून जाते. परंतु इस्लामचा स्वीकार न करण्याच्या स्थितीत आवाहन स्वतंत्र राहाते आणि विधीविधान वेगळे राहते. आवाहनाचा उद्देश हा आहे की मनुष्य जगात अल्लाहचा उत्तरदायी बनून राहावा. मनुष्याच्या निर्माणकर्त्याने त्याला पृथ्वीवर पाठविताना हे कार्य त्याच्या स्वाधीन केले होते आणि त्या उत्तरदायित्वाच्या जबाबदारीला पार पाडावे. विधीविधानाचा हेतु हा आहे की मनुष्य जर अल्लाहच्या उत्तरदायित्वाला पार पाडण्यास असमर्थ असेल तर त्याने कमीतकमी जगात अत्याचार, हिंसाचार आणि उपद्रव माजवू नये. देवदूतांनी मनुष्याविषयी ईश्वरासमोर हा आरोप केला होता. जर मनुष्य अल्लाहच्या भूमीत उत्तम जनसमुदाय बनत नसेल तर कमीतकमी माणुसकीचा शत्रू बनून राहू नये. जगाला तो जर सदाचाराने आणि ईशपरायणतेने आभूषित करत नसेल तर कमीतकमी दुराचाराने आणि दुष्टतेने विश्वशांतीला संपविण्याचे काम करू नये. यासाठी सामर्थ्याचासुध्दा उपयोग करावा लागतो.

**दुराचारापासून प्रतिबंध करण्याची प्रणाली** - इस्लामने मुस्लिमेतर जगाला सदाचाराचे आवाहन करण्यासाठी प्रसार–प्रचाराची (तबलीग) पध्दत सांगितली आहे. परंतु दुराचारापासून प्रतिबंध करण्यासाठी अनिवार्यता न ठेवता वेगवेगळे मार्ग त्यासाठी सांगितले आहेत. मनातील दुष्टतेला विचाराच्या विकारांना दूर करण्यासाठी व्याख्यान व प्रवचनचा उपयोग करावा असा आदेश दिला आहे. कुरआनोक्ती आहे,

"है पैगंबर (स.) आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे आमंत्रित करा मुत्सद्देगिरीने व उत्तम उपदेशासहित आणि लोकांशी विवाद करा अशा पध्दतीने जी उत्तम असेल. तुमचा पालनकर्ता अधिक उत्तम जाणतो की कोण त्याच्या मार्गापासून भ्रष्ट झाला आहे आणि कोण सरळ मार्गावर आहे." *(दिव्य कुरआन, १६:१२५)*

"आणि ग्रंथधारकांशी वाद घालू नका परंतु उत्तमरीतीने, त्या लोकांखेरीज जे त्यांच्यापैकी अन्यायी असतील." *(दिव्य कुरआन, २९:४६)*

"त्यांच्याशी नरमाईने बोला, कदाचित ते उपदेश स्वीकारतील अथवा भीती बाळगतील." *(दिव्य कुरआन, २०:४४)*

आचरणातील दुष्टतेला आणि दुराचाराला बळाने प्रतिबंध करण्याचा आदेश दिला. वरील एका हदीसमध्ये स्पष्ट सांगितले गेले की तुमच्यावर अनिवार्य आहे की दुराचारीचा हात धरा आणि त्याला सदाचाराकडे वळवा. एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तुमच्यापैकी जो कोणी दुराचाराला पाहील तर त्याने त्यास हाताने रोखावे. असे करण्याचे त्याच्याकडे सामर्थ्य नसले तर वाचेने रोखावे. पण याचीसुध्दा हिंमत नसेल तर त्याने मनातल्या मनात त्याला वाईट समजावे आणि ही श्रध्दाशीलतेची शेवटची पातळी आहे." (हदीस : मुस्लिम)

वरील हदीसमध्ये 'हाताने रोखणे' हा शब्दप्रयोग बळाचा वापर करण्यासाठी आला आहे. दुराचारीचा हात पकडणे म्हणजे अशी स्थिती निर्माण करणे की तो त्यापासून दूर राहील. तुम्ही बळाचा वापर करून दुराचाराला नष्ट करणे, दुराचाराचा प्रतिबंध करणे आणि दुराचाराला सदाचारात परिवर्तीत करण्यासाठी 'दुराचारीचा हात पकडावा' लागेल. आणखी एका हदीसमध्ये सांगितले गेले की-

"अल्लाह सर्व सामान्यांना विशेष लोकांच्या वर्तनाची शिक्षा तोपर्यंत देत नाही जोपर्यंत लोक आपल्यासमोर दुराचार होताना पाहतील आणि त्याला प्रतिबंध करण्याचे सामर्थ्य बाळगूनसुध्दा दुराचाराला प्रतिबंध करणार नाहीत."

पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हे कथन अल्लाहच्या आदेशाचे स्पष्टीकरण आहे. या हदीसीनुसार अल्लाहचा आदेश "दुराचाराचा प्रतिबंध करणे"चा स्पष्ट खुलासा होतो. दुराचारींना फक्त व्याख्यान आणि प्रवचने देऊनच भागणार नाही तर बळाने त्यांचा समाचार घेणे आवश्यक आहे. अल्लाहची जमीन तेव्हाच उपद्रवमुक्त होईल. हे श्रध्दावंतांच्या (मुस्लिम) सामर्थ्यावर आणि बळावर अवलंबून आहे. मुस्लिमांमध्ये जर इतके सामर्थ्य आणि बळ असेल की ते जगाला उपद्रवमुक्त करून शांती व समृध्दी प्रदान करू शकतील तर हे कार्य त्यांच्यासाठी अनिवार्य ठरते. श्रध्दावंत जर इतके बलवान आणि सामर्थ्यवान नसतील तर त्यांच्या कुवतीप्रमाणे त्यांना हे काम करावेच लागेल आणि यासाठी की हे कार्य निरंतर चालत राहावे म्हणून सामर्थ्य प्राप्त केले पाहिजे.

**उपद्रवविरोधी युध्द** - अल्लाहने कुरआनमध्ये उपद्रव नष्ट करण्यासाठी युध्दाचा आदेश देताना 'मुनकर' हा शब्द न वापरता 'फितना-फसाद' हा शब्दप्रयोग केला आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"त्यांच्याशी युध्द करा येथपावेतो की उपद्रव (फितना) शिल्लक राहणार नाही."

"अल्लाह यांना एकदुसऱ्यांकरवी हटवित नसता तर जमीन उपद्रवग्रस्त झाली असती."

"जर तुम्ही असे केले नाही तर जमिनीत उपद्रव (फितना) आणि दंगे (फसाद) माजतील."

"आणि उपद्रव हत्येपेक्षा वाईट गोष्ट आहे."

"त्यांनी उपद्रव (फितना) माजविण्याचे ठरविले होते."

"जेव्हा कधी फितना (उपद्रव) कडे लक्ष देतात तर त्यात सामील होतात."

दुराचारामध्ये सर्वात भयंकर दुराचार हा अल्लाहच्या जमिनीत (जगात) उपद्रव माजविणे आहे. उपद्रव हा हत्येपेक्षासुध्दा जास्त वाईट कृत्य आहे. म्हणून त्याचा मुकाबला करण्यासाठी आणि संपविण्यासाठी हातात श्रध्दावंतांना तलवार घेणे भाग पडते. युध्दाशिवाय उपद्रव नष्ट होणार नाही हे स्वाभाविक आहे.

**उपद्रव (फितना) ची वास्तवता** - सर्व साधारणपणे उपद्रव (फितना) म्हणजे दोन लोकसमूहात आपापसांत भांडणतंटा होणे, शिवीगाळ करणे, हाणामारी करणे इ. परंतु

कुरआनमध्ये या शब्दाचा वापर इतका मर्यादित स्वरुपाचा नाही. माणसाच्या कसोटीचा हा प्रसंग आहे. कुरआनमध्ये धनसंपत्ती आणि मुलबाळं, पत्नी इ. ना फितना (उपद्रव) म्हटले आहे. कारण यामुळे मनुष्याची परीक्षा होते की तो सत्याला जास्त प्राधान्य देतो की यांना! सुखसमृध्दीला आणि आपत्तीलासुध्दा फितना म्हटले आहे, कारण या दोन्ही स्थितीत मनुष्याची पारख होत असते. अशा प्रकारे कुरआनमध्ये 'फितना' या शब्दाची व्याप्ती विस्तृत आहे.

जगातील क्रांती आणि ऐतिहासिक घटनांना कुरआनमध्ये 'फितना' (उपद्रव) म्हणून संबोधले आहे, कारण राष्ट्राची कसोटी त्यावर होत असते. एखाद्याच्या शक्तीपेक्षा जास्त त्याच्यावर ओझे लादणे याससुध्दा 'फितना' (उपद्रव) म्हटले आहे कारण त्याच्या सहनशक्तीवर तो अत्याचार आहे. यावरून हे सिध्द होते की 'फितना' या शब्दाचा अर्थ परीक्षा घेणे, कसोटी घेणे, पारख करणे असा होतो. मग ही परीक्षा अल्लाहकडून असेल तर ती सत्य आहे कारण अल्लाह मानवांचा निर्माणकर्ता आणि मालक, पालक व शासक आहे. तो आपल्या दासांची परीक्षा घेण्याचा अधिकार बाळगून आहे. त्याच्या परीक्षेचा हेतु मानवांना उच्चतर स्थान आणि स्थिती बहाल करणे आहे. परंतु हीच परीक्षा मनुष्याकडून असेल तर तो अत्याचार आहे कारण मनुष्याला त्याचा हक्क नाही. जेव्हा कधी मनुष्य दुसऱ्या माणसाला उपद्रवात टाकतो तेव्हा त्याचा उद्देश त्याचे व्यक्तीस्वातंत्र्य हिसकावून घेऊन त्याला आपला दास बनून ठेवणे असतो. तो अत्याचार अनैतिक व अनाचार ठरतो. इंग्रजी शब्द (Persecution) जवळपास वापरला जातो. परंतु 'फितना' या शब्दाची व्याप्ती त्यापेक्षाही जास्त आहे. कुरआनमध्ये जे स्पष्टीकरण आले आहे ते आपण पाहू या.

१) "जेव्हा ते छळले गेले तेव्हा त्यांनी घरेदारे सोडली, स्थलांतर केले अल्लाहच्या मार्गात कष्ट सोसले आणि धैर्य दाखविले, त्यांच्यासाठी खचितच तुझा पालनकर्ता क्षमाशील व कृपाळू आहे." *(दिव्य कुरआन, १६:११०)*

२) "अल्लाहच्या मार्गापासून अडविणे आणि अल्लाहला नाकारणे आणि काबागृहाचा मार्ग अडविणे आणि काबागृहाच्या परिसरातील लोकांना तेथून बाहेर काढणे अल्लाहच्या निकट यापेक्षाही वाईट आहे आणि उपद्रव (फितना) हा हत्येपेक्षाही वाईट आहे."

*(दिव्य कुरआन, २:२१७)*

३) "मूसा (अ.) यांना त्यांच्या लोकांपैकी काही तरूणांखेरीज कोणीही मानले नाही, फिरऔनच्या भीतीने आणि आपल्या लोकांतील श्रेष्ठजनांच्या भीतीपायी (ज्यांना भय होते) फिरऔन त्यांचा छळ करील." *(दिव्य कुरआन, १०:८३)*

४) “हे पैगम्बर (स.) या लोकांनी या प्रयत्नांत कोणतीही उणीव राहू दिली नाही की तुम्हाला उपद्रवात (फितना) टाकून त्या दिव्य प्रकटनापासून परावृत्त करावे, जे आम्ही तुमच्याकडे पाठविले आहे. जेणेकरून तुम्ही आमच्या नावाने स्वत:हून एखादी गोष्ट रचावी जर तुम्ही असे केले असते तर त्यांनी जरुर तुम्हाला आपले मित्र बनवले असते.” *(दिव्य कुरआन, १७:७३)*

५) “सावध राहा की या लोकांनी तुम्हाला संकटात गुंतवून (फितना) त्या मार्गदर्शनापासून यत्किंचितही पराङ:मुख करता कामा नये.”

*(दिव्य कुरआन, ५:४९)*

६) “जर शहराच्या भोवती शत्रु घुसून आले असते आणि त्या वेळी यांना उपद्रवाकडे (फितना) आमंत्रित केले गेले असते तर ते त्यात सामील झाले असते आणि मुश्कीलीनेच यांना उपद्रवात (फितना) सामील होण्यात संकोच वाटला असता.”

*(दिव्य कुरआन, ३३:१४)*

७) “आणखी एका प्रकारचे दांभिक तुम्हाला असे आढळतील जे इच्छितात की तुमच्याकडूनदेखील अभय लाभावे व आपल्या लोकांकडूनसुध्दा, पण जेव्हा कधी त्यांना उपद्रवाची संधी लाभेल तेव्हा ते त्यात उडी घेतील.” *(दिव्य कुरआन, ४:९१)*

८) “आणि जे सत्याचा इन्कार करणारे आहेत ते एकमेकांचे सहाय्य करीत असतात जर तुम्ही हे केले नाही तर पृथ्वीवर उपद्रव (फितना) आणि भंयकर बिघाड उद्‌भवेल.”

*(दिव्य कुरआन, ८:७३)*

**फसाद (भांडणतंटा) वास्तवता** - ‘फसाद’ हा शब्द कुरआनमध्ये कोणकोणत्या अर्थाने वापरला आहे, ते आपण आता पाहू या. शब्दकोशात फसाद त्याला म्हणतात ज्यामुळे शांती भंग पावते. भांडणतंटा विरुध्द समेट आहे. म्हणजेच समेटाच्या विरुध्द कृत्य भांडणतंटा आहे. परंतु कुरआनमध्ये हा शब्द सामाजिक स्वरुपात आला आहे. राजकीय अस्थिरतेलासुध्दा ‘फसाद’ म्हटले आहे. ‘अराजकता’ हा शब्दसुध्दा आपण वापरू शकता.

“तुम्ही पाहिले नाही की तुमच्या पालनकर्त्याने काय व्यवहार केला, उंच स्तंभावाल्या आदेइरमशी ज्यांच्या समान कोणते ही राष्ट्र जगाच्या मुलुखात निर्माण केले गेले नव्हते? आणि समूदशी ज्यांनी खोऱ्यात खडक खोदले होते? आणि मेखावाल्या फिरऔनशी, हे ते लोक होते ज्यांनी जगातल्या मुलुखात मोठा दुराचार (फसाद) केला होता आणि त्यांच्यात खूप उपद्रव (फसाद) माजविला होता. सरतेशेवटी तुमच्या पालनकर्त्याने त्यांच्यावर कोपचा कोरडा

ओढला.'' *(दिव्य कुरआन, ८९:६-१३)*

कुरआनने वेगवेगळ्या ठिकाणी त्यांच्या दुराचारांना स्पष्ट सांगितले ज्यांच्यामुळे ते फसादी (दुराचारी) ठरले.

१) फिरऔनच्या बाबतीत सांगितले की तो गर्विष्ठ होता. आपल्या प्रजेमध्ये त्याने वर्णभेद निर्माण केला आणि तो निर्बलांना नाहक ठार करत असे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

''हकीकत अशी आहे की फिरऔनने पृथ्वीत दुर्वतन केले आणि तिच्या निवासियांना गटागटांत (वर्णभेद) विभागले. त्यांच्यापैकी एका गटाला तो अपमानित करीत असे त्यांच्या मुलांना ठार करीत असे व त्यांच्या मुलींना जीवंत ठेवीत असे, खरोखरच तो हिंसाचारी (फसादी) लोकांपैकी होता.'' *(दिव्य कुरआन, २८:४)*

तो लोकांना सत्य स्वीकारण्यापासून बळाने दूर ठेवीत होता. जेव्हा पैगंबर मूसा (अ.) यांचा चमत्कार पाहून जादूगार श्रध्दावंत बनले तेव्हा तो म्हणाला,

''फिरऔनने सांगितले, ''तुम्ही त्याच्यावर श्रध्दा ठेवली यापूर्वी की मी तुम्हाला तशी परवानगी द्यावी हे कळून चुकले की हा तुमचा गुरू आहे ज्याने तुम्हाला जादूगिरी शिकविली होती. बरे, आता मी तुमचे हातपाय विरुध्द दिशेने कापावयास लावतो आणि खजुराच्या खोडावर तुम्हाला सुळी देतो, मग तुम्हाला कळेल की आम्हा दोघांपैकी कोणाचा प्रकोप अधिक कठोर आणि प्रदीर्घ आहे.'' *(दिव्य कुरआन, २०:७१)*

त्याने एका राष्ट्राला दुबळे पाहून आपले गुलाम बनविले होते. जेव्हा त्याने पैगंबर मूसा (अ.) यांच्यावर उपकार सांगितले तेव्हा मूसा (अ.) यांनी त्याला उत्तर दिले,

''उरले तुझे उपकार ज्यांचा ठपका तू माझ्यावर ठेवला आहेस, तर त्याची वस्तुस्थिती अशी आहे की तु बनी इस्त्राईलंना गुलाम बनविले होते.''

*(दिव्य कुरआन, २६:२२)*

फिरऔन आपल्या सामर्थ्यावर आणि बळावर आपल्यासारख्या माणसांचा ईश्वर बनला होता.

''आणि फिरऔनने सांगितले, हे दरबारी लोकहो, मी तर स्वत:खेरीज तुमच्या कोणत्याही उपास्याला जाणत नाही.'' *(दिव्य कुरआन, २८:३८)*

त्याने आपल्या प्रजेला नैतिक आणि मानसिकरित्या संपवून त्यांना असहाय बनविले होते.

"त्याने आपल्या राष्ट्राला हलके बनवून सोडले (नैतिक आणि मानसिक बिघाड केला) आणि त्यांनी त्याचे म्हणणे मान्य केले ते होतेच अवज्ञाकारी लोक."

*(दिव्य कुरआन, ४३:५४)*

त्याच्या शासनाचा पाया असत्यावर आणि अत्याचारावर आधारित होता.

"त्यांनी फिरऔनच्या हुकूमाचे अनुसरण केले. वस्तुत: फिरऔनचा हुकूम सत्याधिष्ठित नव्हता." *(दिव्य कुरआन, ११:९७)*

२) याचप्रमाणे आद जनसमुदायाचा हा दोष दाखविला की ते अत्याचारी शासनाध्यक्षाचे अनुसरण करीत होते.

"हे आहेत आद, आपल्या पालनकर्त्याच्या वचनांचा त्यांनी इन्कार केला, त्यांच्या पैगंबराचे ऐकले नाही, आणि सत्याच्या प्रत्येक जबरदस्त शत्रूचे अनुकरण करीत राहिले." *(दिव्य कुरआन, ११:५९)*

ते अत्याचारी होते त्यांना न्याय माहीत नव्हता त्यांना हुद (अ.) नावे ठेवीत असत.

"आणि जेव्हा तुम्ही एखाद्यावर हात टाकता कठोर बनून टाकता."

*(दिव्य कुरआन, २६:१३०)*

ते आपल्या ताकदीच्या घमेंडीत निर्बल राष्ट्रांना गुलाम बनवीत असत.

"आदची स्थिती अशी होती की ते पृथ्वीमध्ये कोणत्याही अधिकाराशिवाय मोठे बनून बसले, आणि म्हणू लागले, कोण आहे आमच्यापेक्षा बलवान."

*(दिव्य कुरआन ४१:१५)*

३) समूदच्या राष्ट्राची स्थितीसुध्दा अशीच होती. ते अत्याचारी आणि दुराचारी होते. पैगंबर स्वालेह (अ.) त्यांना उपदेश करीत असत,

"त्या मोकाट लोकांचे आज्ञापालन करू नका, जे पृथ्वीतलावर उपद्रव (फसाद) माजवितात आणि कोणतीही सुधारणा करीत नाहीत." *(दिव्य कुरआन, २६:१५१-१५२)*

ते असे अत्याचारी होते की ते एका सत्याधिष्ठित मनुष्याला यासाठी ठार

करायला तयार झाले जो सदाचाराचा आदेश देत होता आणि दुराचाराचा प्रतिबंध करीत होता.

"त्या शहरात नऊ जथेदार होते जे देशात उपद्रव माजवित होते आणि कोणते ही सुधारणेचे काम करीत नसत. त्यांनी आपापसात सांगितले की, अल्लाहची शपथ घेऊन प्रतिज्ञा करा की आम्ही स्वालेह (अ.) आणि त्याच्या कुटुंबियांवर छापा मारू आणि त्यांच्या सरदाराला सांगू की आम्ही त्याच्या कुटुंबियाच्या हत्येच्या वेळी हजर नव्हतो." *(दिव्य कुरआन, २७:४८-४९)*

४) कुरआनामध्ये लुतच्या राष्ट्रालासुध्दा फसादी (उपद्रवी) राष्ट्र म्हणून संबोधले आहे. त्याच्या उपद्रवाचा तपशील खालीलप्रमाणे कुरआन विशद करीत आहे.

"तुम्ही तर ते अश्लील कृत्य करता जे तुमच्यापूर्वी जगातील लोकांपैकी कोणीच केलेले नाही, काय तुमची ही अवस्था आहे की पुरुषाजवळ जाता आणि वाटमारी करता व आपल्या सभेत वाईट कृत्य करता ?" *(दिव्य कुरआन, २९:२८-२९)*

हे होते त्या राष्ट्राचे उपद्रव (फसाद) की जे अनैसर्गिक होते. ते बाहेरच्या आलेल्या व्यापारी लोकांनासुध्दा या दुष्कृत्याचा शिकार बनवित असत. हे त्यांच्याजवळ सर्वमान्य झाले होते. ते हे दुष्कृत्य सर्वांसमोर सभेतसुध्दा करीत असत आणि प्रतिबंध करणारा कोणी नव्हता.

"वजन व मापे प्रामाणिकपणे करा, लोकांना त्यांच्या वस्तूत कमी देऊ नका आणि सुधारणा झालेल्या या भूतलावर हिंसाचार माजवू नका (फसाद) यातच तुमचे भले आहे जर खरोखरच तुम्ही श्रध्दावंत असाल. प्रत्येक मार्गावर वाटमारे बनून बसू नका की तुम्ही लोकांना भयग्रस्त करावे आणि श्रध्दा ठेवणाऱ्या लोकांना अल्लाहच्या मार्गापासून तुम्ही प्रतिबंध करावा आणि सरळमार्गाला वाकडे बनविण्यास तुम्ही उत्सुक व्हावे."

*(दिव्य कुरआन, ७:८५-८६)*

५) मग जेव्हा पैगंबर शुऐब (अ.) यांनी त्यांना सदाचाराचा आदेश दिला तर ते म्हणाले होते,

"त्यांनी उत्तर दिले, "हे शुऐब (अ.)! तुझ्या पुष्कळशा गोष्टी तर आम्हाला कळतच नाहीत आणि आम्ही पाहातो की तू आमच्यादरम्यान एक दुर्बल मनुष्य आहेस, तुझी जातबिरादरी नसती तर आम्ही तुला केव्हाच दगडांनी ठेचून मारले असते. तुझे सामर्थ्य इतके नाही की तू आम्हाला जड जावास." *(दिव्य कुरआन, ११:९१)*

यावरून हे स्पष्ट होते की मदयन या राष्ट्राचा उपद्रव (फसाद) हा होता की ते बेईमान, धोकेबाज होते. व्यापारात लोकांना धोका देत असत. व्यापारी टोळ्यांवर हल्ला करीत असत. श्रध्दावंतांना अल्लाहच्या मार्गापासून रोखत असत. त्यांना सत्याचा इतका तिटकारा होता की जेव्हा एका श्रध्दावंतांने त्यांना सदाचाराकडे आमंत्रित केले तेव्हा त्याला दगड मारून ठार करण्यास तयार झाले होते.

६) चोरीलासुध्दा फसाद (उपद्रव) म्हटले गेले आहे. पैगंबर यूसुफ (अ.) यांच्या बंधुवर जेव्हा ग्लास चोरीचा आरोप ठेवला गेला तेव्हा त्यांनी सांगितले होते,

"त्याच्या भावांनी सांगितले की, अल्लाहची शपथ तुम्हाला चांगलेच माहीत आहे की आम्ही या देशात उपद्रव (फसाद) माजविण्यासाठी आलेलो नाही आणि आम्ही चोऱ्या करणारे लोक नाही." *(दिव्य कुरआन, १२:७३)*

७) राजाच्या राज्यात जो विनाश होतो आणि त्यामुळे प्रजेच्या चारित्र्यात बिघाड निर्माण होतो त्याससुध्दा 'फसाद' म्हटले गेले आहे. म्हणून पैगंबर सुलेमान (अ.) यांचे पत्र मिळाल्यानंतर सबा नावाची सम्राज्ञी म्हणते,

"राणी म्हणाली, राजे जेव्हा एखाद्या देशात घुसून येतात तेव्हा ते वाटोळे करतात (फसाद) आणि त्यातील प्रतिष्ठितांना अपमानित करतात. असेच काही ते करीत असतात." *(दिव्य कुरआन, २७:३४)*

८) कुरआनमध्ये 'फसाद'ची एक व्याख्या ती आली आहे की मानवतेच्या अधिकारांना, हक्कांना पायदळी तुडविणे म्हणजे जगात 'फसाद' उपद्रव माजविण्यासारखे आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"जे अल्लाहच्या वचनाशी बांधीलकी पक्की केल्यानंतर तोडून टाकतात, जे त्या संबंधाना तोडतात ज्याना अल्लाहने जोडण्याची आज्ञा दिली आहे आणि जे पृथ्वीवर उपद्रव (फसाद) माजवितात, ते धिक्कारास पात्र आहेत, त्यांच्यासाठी परलोकात अत्यंत वाईट ठिकाण आहे." *(दिव्य कुरआन, १३:२५)*

मानवी स्वातंत्र्याच्या हक्कांवरच जगात शांतता, स्थिरता येते. यात व्यक्ती, समाज, राष्ट्र आणि आंतराष्ट्रीय स्वातंत्र्याचा समावेश आहे. या हक्कांना पायदळी तुडविल्याने जगात अशांतता आणि अस्थिरता येते व फसाद (उपद्रव) माजतो. म्हणून अल्लाहने मानवी हक्कांना पायदळी तुडविण्यास फसाद (उपद्रव) माजविणे असे संबोधले आहे आणि अशा उपद्रवी (फसादी) शक्तींचा धिक्कार केला आहे.

९) अशा शासन व्यवस्थेला की जी आपल्या सामर्थ्याचा उपयोग सदाचाराचा आदेश देण्यासाठी करीत नाही तर अत्याचार, दुराचार पसरविण्यासाठी करते. अशा शासन व्यवस्थेला फसादी शासन व्यवस्था म्हटले आहे. कुरआनोक्ती आहे,

"जेव्हा त्याला सत्ता प्राप्त होते, तेव्हा पृथ्वीतलावर त्याची सारी धावपळ केवळ याचकरिता असते की उपद्रव (फसाद) माजवावे, शेतीचा विध्वंस करावा व मानवजात नष्ट करावी. वास्तविक पहाता अल्लाहला उपद्रव मुळीच आवडत नाही."

*(दिव्य कुरआन, २:२०५)*

१०) अल्लाहच्या मार्गापासून रोखण्याससुध्दा फसाद (उपद्रव) म्हणून संबोधले आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"ज्या लोकांनी स्वत: द्रोहाचा मार्ग अवलंबिला आणि इतरांना अल्लाहच्या मार्गापासून रोखले, त्यांना आम्ही यातनेवर यातना देऊ, त्या उपद्रवाबद्दल (फसाद) जे ते जगात माजवित होते." *(दिव्य कुरआन, १६:८८)*

११) 'सूरहमायदा' या अध्यायात फसादी (उपद्रवी) लोकांचे वैशिष्ट्य सांगितले गेले आहे,

"तुम्ही पाहता की त्यांच्यापैकी पुष्कळसे लोक पाप व जुलूम आणि अत्याचाराच्या कृत्यांत धावपळ करीत हिंडतात आणि निषिद्ध माल खातात. अत्यंत वाईट कृत्ये आहेत जी ते करीत आहेत." *(दिव्य कुरआन, ५:६२)*

"आणि आम्ही त्यांच्यादरम्यान पुनरूत्थान घडेपर्यंत वैर व शत्रुत्व घातले आहे जेव्हा कधी हे युध्दाचा अग्नी भडकवितात, अल्लाह त्याला विझवून टाकतो. हे पृथ्वीवर हिंसाचार (फसाद) पसरविण्याचा प्रयत्न करीत आहेत पण अल्लाह हिंसाचार माजविण्याऱ्यांना मुळीच पसंत करीत नाही." *(दिव्य कुरआन, ५:६४)*

यावरून हे सिध्द होते की गुन्हेगारी कृत्यें, हिंसाचार, भ्रष्टाचार, व्याजखोरी, मत्सर, द्वेष आणि द्वेषापोटी युध्दाची आग भडकविणे हे सर्व कृत्य फसाद (उपद्रव) आहे.

उपद्रव (फितना व फसाद) नष्ट करण्यासाठी अल्लाहच्या शासनाची गरज - वरील विवेचनावरून हे अगदी स्पष्ट झाले आहे की कुरआन 'फितना आणि फसाद' (उपद्रव) ला किती व्यापक स्वरुपात घेत आहे. हे सर्व उपद्रव असत्यप्रियता, ईशद्रोह आणि ईशद्रोही शासन व्यवस्थेमुळे निर्माण होतात. दुराचारात व ते फैलावण्यात आजकाल शासन आघाडीवर असते. अशा प्रकारची शासन व्यवस्था ही मुळात उपद्रवी अत्याचारी शासन आहे कारण ते शासनाच्या ध्येयापासून दूर आहे. शासन पुरस्कृत दुराचार सर्व दुराचारांचा आणि उपद्रवांचा हिंसाचाराचा,

अत्याचाराचा मूळ ठरते. त्याने सत्य आणि न्याय पायदळी तुडविले जाते. दुराचारी आणि अत्याचारींना ह्यामुळे आणखी बळ मिळते. चारित्र्य आणि सामाजिक न्याय यांना नष्ट करण्यासाठी तसे कायदे-कानून शासन बनवते. अशा शासनव्यवस्थेमुळे जगात अशांतता, हिंसाचार आणि युध्दाची आग भडकू लागते. या शासनामुळे राष्ट्रावर आस्मानी संकट येते. ही शासन व्यवस्था (ईशद्रोही) जगातील सर्व दुष्टतेचे प्रेरणास्त्रोत आहे. याच कारणाने इस्लामने या अशा उपद्रवी शासनाविरुध्द प्रयत्नांची पराकाष्ठा करण्यासाठी आणि वेळ पडल्यास युध्द करून असे शासन संपविण्यासाठी श्रध्दावंतांना युध्दाची परवानगी दिली आहे. त्या जागी सदाचारी आणि न्यायप्रिय शासन स्थापण केले जावे ज्याचा आधार ईशपरायणता आणि ईशादेश असेल. हे शासन फक्त आपल्या जाती धर्माचेच नव्हे तर मानुसकीच्या भल्यासाठी असेल. मानवतेची सेवा शासनाचा मूळ उद्देश असेल आणि दुराचाराला मिटविणे आणि सदाचाराला राष्ट्रात आणि जगात प्रोत्साहन देणे आणि सदाचाराचा आदेश देणे हे मुख्य कार्य असेल. जे सदाचाराचा आदेश देणे आणि दुराचाराला प्रतिबंध करणे हे आपले जीवन ध्येय मानत असतील, अशानांच शासन व्यवस्था कार्यान्वित करण्यास दिली जाईल. ही मंडळी शासनाधिकार स्वत:च्या मोठेपणासाठी नव्हे तर माणुसकीची सेवा करण्यासाठी आणि अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी हातात घेतील.

कुरआन उघडून पाहा प्रत्येक ठिकाणी तुम्हाला हेच पहावयास मिळेल. अत्याचारी आणि हुकुमशाहीच्या आज्ञाधारकतेपासून रोखले आहे. मनुष्याला सावध केले आहे की असत्याची आज्ञाधारकता करून स्वत:चा विनाश करून घेऊ नका. कुरआन आदेश देत आहे,

"त्या अनिर्बंध मोकाट लोकांचे आज्ञापालन करू नका, जे पृथ्वीतलावर उपद्रव माजवितात आणि कोणतीही सुधारणा करीत नाहीत." *(दिव्य कुरआन, २६:१५१-१५२)*

"कोणत्याही अशा व्यक्तीची आज्ञा पाळू नका ज्याच्या हृदयाला आम्ही आमच्या स्मरणापासून बेसावध केले आहे आणि ज्याने मनमानी अनुसरण अंगीकारले आहे आणि ज्याची कार्यपध्दती न्युनाधिक्यावर आधारलेली आहे." *(दिव्य कुरआन, १८:२८)*

एका राष्ट्राचा विनाशाचे कारण स्पष्ट करताना कुरआनोक्ती आहे,

"सत्याच्या प्रत्येक जबरदस्त शत्रूचे अनुकरण करीत राहिले, सरतेशेवटी या जगातदेखील त्यांचा धिक्कार केला गेला आणि पुनरुत्थानाच्या दिवशीसुध्दा."

*(दिव्य कुरआन, ११:५९-६०)*

कुरआनने स्पष्ट करून सांगितले आहे की राष्ट्राची संपत्ती आणि शासनाधिकार जेव्हा दुराचारी आणि ईशद्रोही लोकांच्या हातात जाते तेव्हा राष्ट्राचा नाश होतो. राष्ट्र लयास

जाते. कुरआनोक्ती आहे,

"जेव्हा आम्ही एखाद्या वस्तीला नष्ट करण्याचा इरादा करतो तेव्हा तिच्या सुखवस्तु लोकांना हुकूम देतो आणि ते (तिच्यात) अवज्ञा करू लागतात. तेव्हा कोप होण्याचा निर्णय त्या वस्तीवर लागू होतो. आणि आम्ही तिला उद्ध्वस्त करून टाकतो."

*(दिव्य कुरआन, १७:१६)*

कारण प्रजेच्या चारित्र्यहीनतेला आणि दुराचाराला शासन मुख्यत्वे जबाबदार असते. शासन व्यवस्था चुकीची असेल आणि शासन सत्ता अशा लोकांच्या हातात असेल जे मानवतेची सेवा (सदाचाराचा आदेश आणि दुराचाराचा प्रतिबंध) न करता सत्ता उपद्रव माजविण्यासाठी वापरत असतील तर त्या शासन व्यवस्थेपासून भल्याची अपेक्षा करूच शकत नाही. ती उपद्रवी शासन पध्दती असते. याविरुध्द जर एकशासन व्यवस्था सदाचारी आणि न्यायी असेल आणि शासनकर्ते सदाचारी आणि ईशपरायण असतील तर अशांच्या हातून मानवतेची सेवा घडते. व्यक्तीचे समाजाचे आणि राष्ट्राचे कल्याण होते. तिथे उपद्रवाचे स्रोत आपोआप सुकू लागतात आणि सदाचार फैलावत जातो. म्हणून सदाचाराचा आदेश आणि दुराचाराचा प्रतिबंध करणारी शासन व्यवस्था मानवतेच्या भल्यासाठी एकमेव उपाय आहे. त्यासाठी शासनाधिकारी हे सदाचारी आणि ईशपरायणशील असणे आवश्यक आहे.

**युध्दाचा आदेश** - वरील विवेचनावरून तुमच्या लक्षात आले असेल की अल्लाहने जिहादचा आदेश मानवाला स्वरक्षणासाठी दिला. हा बचावात्मक जिहाद आहे. ह्यात स्वत:चे सामर्थ्य आणि अस्तित्व टिकून धरण्यासाठी हा आदेश आला आहे. आता दुसरा आदेश हा अत्याचारी व उपद्रवी शक्तींना उखडून फेकून त्या जागी सदाचारी आणि ईशपरायणशील लोकांच्या हातात सत्ता यावी म्हणून आहे. कुरआनोक्ती आहे,

"युध्द करा ग्रंथधारकांपैकी त्या लोकांविरुध्द जे अल्लाहवर व मरणोत्तर जीवनावर श्रध्दा ठेवत नाहीत आणि अल्लाह व त्याच्या पैगंबराने जे काही निषिध्द ठरविले आहे त्याला निषिध्द करीत नाहीत आणि सत्यधर्माला आपला धर्म बनवित नाहीत. (त्यांच्याशी युध्द करा) येथपावेतो की त्यांनी स्वहस्ते जिझिया द्यावा व छोटे बनून राहावे." *(दिव्य कुरआन, ९:२९)*

वरील संकेत वचनात युध्दाचा हुकूम ज्या लोकांविरुध्द देण्यात आला त्यांचे वैशिष्ट्य सांगितले गेले आहे की ते जरी ग्रंथधारक असतील तरी अल्लाह आणि मरणोत्तर जीवनावर विश्वास ठेवीत नाहीत आणि अल्लाह व त्याच्या पैगंबर मुहम्मद (स.) यांनी जे काही निषिध्द ठरविले आहे, त्याला निषिध्द मानत नाहीत. तसेच ते लोक सत्यधर्माला आपला धर्म

मानत नाहीत. यावरून युध्दाचा आदेश का दिला हे स्पष्ट होते. त्यांच्याजवळ ग्रंथ आले होते ज्यात सदाचारी जीवन जगण्याची शिकवण होती. परंतु त्यांनी त्या ग्रंथाना सोडून दिले त्यांनी त्यांच्या मनोकामनेनुसार आपापले धर्म तयार केले जे सत्यधर्माविरुध्द होते. एकीकडे त्यांच्या विचारसरणीत बिघाड तयार झाला आणि मरणोत्तर जीवनावरचा त्यांचा विश्वास उडाला. ते दुराचारी बनले. वैध अवैधतेचे भान त्यांच्यात शिल्लक राहिले नाही. जेव्हा अल्लाहने त्यांच्यासाठी सत्यधर्म अवतरित केला ज्यास ते विसरून गेले होते तेव्हा त्या सत्यधर्मास मान्य करण्यास त्यांनी नकार दिला. त्यांच्या पूर्वजांच्या दुराचारावर आणि बिघाड झालेल्या विचारसरणीवरच ते कायम राहिले होते. त्यांनी जर त्या सत्यधर्माचा स्वीकार केला असता तर ते एक सदाचारी, सत्यधर्मी आणि न्यायप्रिय ठरले असते. त्यांच्यातून उपद्रवाचे नामोहरम झाले असते. आता ते सत्यधर्माला मानत नाहीत तर त्यांना हे स्वातंत्र्य आहे की त्यांनी सत्य धर्माच्या प्रभावाखाली लहान बनून राहावे. परंतु हे स्वातंत्र्य त्यांना दिले जात नाही की त्यांच्या असत्य धर्माचे नियम लागू करून राष्ट्रात पुन्हा उपद्रव माजवावा. सत्यधर्म अल्लाहच्या जमिनीत (फितना फसाद) उपद्रव माजविण्याची अजिबात परवानगी देत नाही.

**युध्दाची गरज** - युध्दाच्या उद्देशाला वर स्पष्ट करण्यात आले आहे. तलवार हातात घेऊन एखाद्याला मुस्लिम बनविणे हा युध्दाचा हेतु मुळीच नाही तर त्याने जिझिया देण्यास तयार व्हावे हीच युध्दाच्या उद्देशाची अंतिम मर्यादा आहे. यावर त्यांचे वित्त, जीव आणि अस्मितेचे रक्षण केले जाते, त्यांनी इस्लाम स्वीकार करो अथवा व करो. अल्लाहने जिझिया देण्यास स्वीकार करण्यास युध्दाची हदबंदी निश्चित केली आहे. त्या 'जिम्मी' लोकांचे वित्त जीव आणि अस्मितेचे रक्षण करणे अनिवार्य ठरते. त्यांच्या संरक्षणासाठी युध्द करून आपले रक्त सांडणे मुस्लिमांसाठी अनिवार्य ठरविले आहे. हजरत अलींचे कथन आहे, ''त्यांची संपत्ती आमच्या संपत्तीसारखी आहे आणि त्यांचे रक्त आमच्या रक्तासारखे आहे.''

माननीय उमर (र.) यांनी सांगितले आहे, ''मी प्रतिज्ञा करतो की अल्लाह आणि त्याच्या पैगंबर (स.) यांच्याप्रमाणेच जिम्मी (मुस्लिमेतर) यांचे अधिकार आणि हक्क त्यांना बहाल केले जावेत. त्यांच्या संरक्षणासाठी युध्द केले जावे आणि त्यांच्या ताकदीपेक्षा त्यांच्यावर जास्त ओझे टाकू नये. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हदीस कथन आहे,

''जो कोणी एखाद्या प्रतिज्ञा करणाऱ्या व्यक्तीला ठार करेल तर त्याला स्वर्गाचा सुगंधसुध्दा घेता येणार नाही.'' अशा प्रकारे तमाम 'जिम्मी' लोकांसाठी (आश्रित लोक) हा आदेश आहे. यावरून हे स्पष्ट होते की युध्दाचा हा आदेश इतर धर्मांच्या व्देषावर आधारित मुळीच नाही किंवा फक्त 'जिझिया' ची रक्कम वसूल करणे हासुध्दा नाही. तुटपुंजी जिझियाची

रक्कम स्वीकारून त्या संपूर्ण आश्रित लोकांची (जिम्मी) वित्त, जीव आणि अस्मिता रक्षणाची जबाबदारी स्वीकारणे आणि त्यांच्यासाठी युध्द करून वेळ पडल्यास त्यांच्या खातर आपले रक्त सांडणे हे कर्तव्य काही किरकोळ कर्तव्य नाही. तुटपूंजी रक्कम देऊन एक अश्रध्दावंत इस्लामी राज्यात शांतीने, सुख–समृध्दीने, सुरक्षित राहू शकतो. हाच एकमेव उद्देश आहे जिझिया घेण्या मागे! यावरून हेच सिध्द होते की युध्दाचा उद्देश लोकांना उपद्रवमुक्त करून त्यांना शांती सुरक्षा प्रदान करणे हाच आहे. जिझिया देऊन ते इस्लामी शासनाच्या प्रजेचा एक अंग आणि आज्ञाधारक प्रजा बनून राहतात.

**जिझियाची वास्तवता** - ज्याप्रमाणे इतर शासन व्यवस्थेत टॅक्स, कर देणे हे आज्ञाधारकतेचे लक्षण आहे आणि कर चुकवणे ही गद्दारी आणि अवज्ञा आहे. याचप्रमाणे जिझिया देत रहाणे हे आज्ञाधारकतेचे लक्षण आहे आणि न देणे हे करार भंग करण्यासारखे आहे. म्हणून सशक्त पुरुषवर्गावर की जे युध्दात लढू शकतात यांच्यावरच जिझिया आकारला जातो. वृध्द, स्त्रिया, मुलं, आंधळे, पांगळे यांच्यावर जिझिया आकारला जात नाही.

जिझियाची रक्कमसुध्दा जास्त नसते. त्याच्या वसुलीची प्रणाली नरमाईची आहे. कैद अथवा शिक्षा करणे अवैध आहे. एकदा उमर (रजि.) यांच्याकडे जिझियाची मोठी रक्कम आली. ती पाहून त्यांनी उद्गार काढले, ''तुम्ही लोकांना बरबाद केले त्यांच्याकडून बळाने वसुली केलेली दिसते.'' अधिकाऱ्याने सांगितले की आम्ही अत्यंत नरमाईने आणि बळाचा वापर न करता वसुली केली आहे. हे ऐकल्यानंतरच ती रक्कम सरकारी खजान्यात जमा झाली. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हदीस कथन आहे, ''जगात ज्याने लोकांना त्रास दिला त्यास मरणोत्तर जीवनात अल्लाह त्रास देणार.'' यावरून हेच सिध्द होते की मुस्लिमेतरावंर जिझिया आकारला जातो ते शिक्षा म्हणून नव्हे तर त्याचा उद्देश शांती आणि स्थिरता राहावी म्हणून त्यांना आज्ञांकित करून ठेवणे आहे. त्यांना अत्याचार, हिंसाचार आणि उपद्रवापासून दूर ठेवले जाते. त्यांना शांती सुरक्षा प्रदान केली जाते. त्यांच्या दुर्बलांवर, अल्पसंख्यांकांवर, असहाय लोकांवर अत्याचार केला जात नाही. निर्बलांना बलवानांचा गुलाम बनविण्यापासून मुक्तता होते आणि समस्त दुराचारी तत्त्वांना मानवतेच्या मूल्यांचा स्वीकार करण्यास भाग पाडले जाते.

कुरआनमध्ये अनेक ठिकाणी युध्दाचा हेतु विषद केला गेला आहे. युध्दाच्या कल्याणकारी परिणामांनासुध्दा स्पष्ट केले आहे. अश्रध्दावंतांनी आपल्या कायदेकानूनुसार जे असत्य आहेत, जगात उपद्रव अत्याचार माजवू नये. दुराचार, हिंसाचार, अत्याचार यांच्या जागी अल्लाहच्या न्याय व्यवस्थेच्या आधीन राहाणे हाच जिझियाचा उद्देश आहे तसेच युध्दाचा उद्देश व परिणाम आहे. उपद्रवाचा आणि युध्दाचा जोर नष्ट व्हावा हाच हेतु त्यामागे

कार्यरत आहे. अश्रध्दावंतांचे बोल नष्ट होऊन अल्लाहची वाणी प्रबळ व्हावी. उपद्रव नष्ट होणे, फसाद शिल्लक न राहाणे, व असत्य धर्मियांची युध्दाची खुमखुमी नष्ट व्हावी. श्रध्दाहीनतेच्या सैतानी शक्तींचा नायनाट होऊन जगात शांती नांदावी. सैतानी शक्तींनी लोकांच्या नैतिक, आध्यात्मिक भौतिक प्रगतीमध्ये अडथळे निर्माण करू नयेत, श्रध्दाहीनांनी स्वत: निर्माण केलेले कायदे नष्ट व्हावेत आणि त्यांच्या जागी अल्लाहचा कानून लागू व्हावा. सदाचारी आणि ईशपरायण समाजनिर्मिती व्हावी आणि जगातील प्रत्येक व्यक्तीला शांती–समृध्दीची शुभवार्ता देणे, विश्वशांतीचे व कल्याणाचे लक्ष गाठणे हाच एकमेव उद्देश आहे अल्लाहच्या मार्गात युध्द (जिहाद) करण्याचा!

जगातून 'फितना व फसाद' (उपद्रव व हिंसा) नाहीशी व्हावी या एकमेव हेतुने युध्दाचा आदेश देण्यात आला आहे. जगाला हे ज्ञात आहे की इस्लामची तलवार फक्त फितना फसादला नष्ट करण्यासाठी व अत्याचाराविरुध्द उचलली जाते मग त्या सैतानी कृत्यांचे शिकार मुस्लिम अथा मुस्लिमेतर असोत! जोपर्यंत जगात कोणते ही राष्ट्र मग ते किती ही शक्तीवान असोत, अत्याचार व फितना फसादचा आधार घेणे सोडत नसेल तर त्याविरुध्द जिहाद सुरुच राहील. ज्या क्षणी या दुराचाराला त्यागून त्या राष्ट्राने सदाचाराला स्वीकारले तर त्या क्षणी त्याविरुध्द जिहाद संपुष्टात येते. त्या राष्ट्राशी युध्द करणे निषिध्द होते. त्याचप्रमाणे एखाद्या जनसमूहालासुध्दा हा नियम लागू होतो. इस्लामी विधी–नियमांचा पाया हा मानवतेच्या कल्याणाच्या तत्वावर आधारित आहे. राजा प्रजेच्या कल्याणाचा जामीन असतो. या व्यवस्थेत व्यक्ती चारित्र्याच्या उच्च शिखरावर विराजमान होतो.

**इस्लाम आणि साम्राज्यवाद** – पाश्चिमात्य महासत्ताक देशांनी जागतिक सभ्यता, संस्कृती, लोकशाही, स्वातंत्र्य आणि त्यांच्या जीवनशैलीला धोका असल्याकारणाने त्याच्या रक्षणार्थ युध्द छेडले आहे. दुर्दैवाने ते जगात सुसंस्कृतपणा, लोकशाही, मानवी प्रगती व जगात शांतता नांदावी म्हणून युध्दाचा दावा करीत आहेत. परंतु या तोंडी दाव्याविरुध्द त्यांचे कृत्य चालू आहेत. ते निर्बल राष्ट्रांच्या स्वातंत्र्यावर डाका टाकत आहेत. संस्कृती आणि सभ्यतेच्या नावाने जगात माणुसकीला काळीमा फासला जात आहे. यावरून लोकांना शंका येते की इस्लामचा दावासुध्दा याच प्रकारचा तर नाही ना? जीभेवर सुधारणेचा मंत्र आणि बगलेत फितना फसाद (उपद्रव) ची तलवार? पाश्चिमात्य प्रचारतंत्र या कामी बरेच सफल झालेले आहेत. सुधारणेसाठी जिहाद हा फक्त मुस्लिमांसाठी आहे इतरांशी त्याचा संबंध नाही हा अपप्रचार करण्यात आला. साम्राज्यवाद हे खास राष्ट्राच्या आणि जातीपातीच्या शासनव्यवस्थेचे नाव आहे. इंग्रजी साम्राज्यवाद हा इंग्रज लोकांचा आहे तसेच जर्मन साम्राज्यवाद जर्मनांचा. त्यात फक्त जर्मन लोक सहभागी होतात. इटालियन साम्राज्यवादात जे काही आहे ते सर्व इटालियन

लोकांचेच आहे. दुसऱ्यासाठी त्यांचा साम्राज्यवाद नसून फक्त त्यांच्याच लोकांसाठी असतो. सभ्यता आणि संस्कृती रक्षणाच्या नावाने जगात जिथे कुठे इंग्रजी साम्राज्य जाईल तिथे ते इंग्रजी साम्राज्यवाद नेतील. सत्तेत तेच असतील. यात सत्ता एकाच राष्ट्राच्या आणि जाती वंशाच्या लोकांच्या हातात राहाते. राष्ट्रीयता आणि वंशवाद या व्यवस्थेत वाढीस लागतो. इंग्रजी साम्राज्यवादात इंग्रजेतरांना अजिबात भागीदार केले जात नाही. परराष्ट्रीय आणि परवंशीय लोकांना येथे मुळीच स्थान नाही. एका राष्ट्राला दुसऱ्या राष्ट्राच्या राष्ट्रीयतेचा आणि वंशभेदाचा बळी बनविला जातो. यामुळे अनेक वाईट परिणाम उदयाला येतात. गुलामीची मानसिकता वाढीस लागते. अत्याचार व उपद्रवाला हिमतीने तोंड देण्याची कुवत त्या गुलाम राष्ट्रात शिल्लक राहत नाही. इंग्रजाचा (इंग्रज साम्राज्याचा) सूर्य कधीच मावळत नव्हता याचा अनुभव जगाने घेतला आहे.

याविरुध्द इस्लाम एखाद्या राष्ट्राचे, जातीचे, वंशाचे नाव नाही. ते एक परिपूर्ण जीवनप्रणाली आणि जीवनसंविधान आहे. इस्लामचे दार जगात सर्वांसाठी खुले आहेत. अरबी, अरबेतर, चीनी, हिंदुस्थानी, जापानी, आफ्रिकन, अमेरिकन सर्वांसाठी इस्लामचे दार उघडे आहे. कुणीही इस्लामचा स्वीकार करु शकतो आणि इस्लाम स्वीकारल्यानंतर सर्व प्रकारचे हक्क प्रतिष्ठा वैयक्तिक आणि सामाजिकरित्या प्राप्त होते. आता त्याला मनुष्याच्या वंश, कुळ, रंग, जातपात, वर्ण यासी काहीच घेणेदेणे नसते. इस्लाम मनुष्याला निखळ मनुष्य म्हणून संबोधतो आणि त्याच्या समोर ईशप्रदत्त परिपूर्ण अशी जीवनप्रणाली ठेवतो. जो या जीवनप्रणालीस आत्मसात करतो तो इस्लामी जमात (समाज)चा सदस्य बनतो. इस्लामी शासनात इतरांबरोबर समान हक्क घेतो. त्याच्या कर्तृत्वावर तो इस्लामी शासनाध्यक्ष (अमीर) अथवा खलीफापर्यंत पोहचू शकतो. इस्लामच्या विधीनियमांचे पालन समाज सदृढ बनविते. इस्लाम खानदानी आणि वंशजातीची शासन व्यवस्था अवैध मानतो. सकारात्मक व सुधारात्मक शासन व्यवस्था त्याला अपेक्षित आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांचा आदेश आहे की, ''ऐका आणि आज्ञापालन करा त्या काळ्या गुलामाचे जेव्हा तो तुमचा अमीर (शासनाध्यक्ष) बनेल.'' इस्लामचे शेवट व अंतिम आवाहन अरबी देशातून झाले. इस्लामी ज्ञानाची प्रगती तिथेच झाली. परंतु इस्लामने शासन सत्ता आणि आज्ञांकिकता फक्त अरबांपुरती मर्यादित ठेवली नाही. या उलट साम्राज्यवादाचे तत्त्व आहे. जोपर्यंत अरब सदाचारी होते तोपर्यंत त्यांनी अर्ध्या जगावर राज्य केले. जेव्हा त्यांच्यात लायकी शिल्लक राहिली नाही तेव्हा अरबेतरांनी इस्लामी शासन व्यवस्था चालविली आणि अरबांवर राज्य केले. तुर्कस्तान इस्लामचे शत्रू होते. परंतु जेव्हा त्यांनी इस्लाम स्वीकारला तेव्हा इस्लामी जगताचा अर्धाभाग त्यांच्या शासनाधिकारात आला होता. हे सत्य आहे की आज मुस्लिमांमध्ये राष्ट्रीयता आणि वंशाचा जास्त पगडा आहे. परंतु इस्लामशी यांचे काहीही

संबंध नाही. इस्लामी शिकवणीमध्ये भेदाभेद करण्यास वाव दिलेला नाही. हाच इस्लाम आणि साम्राज्यवादामधील फरक आहे. साम्राज्यवाद जगातील धनसंपत्ती आपल्या एकट्याच्या हातात एकवटून ठेवण्याची एका वंशाची लालसा आहे. असा वंश दुसऱ्या राष्ट्रावर युध्द करून त्याची धनसंपत्ती आणि शासन सत्ता हातात घेतो. त्याच्या प्रजेला स्वत:चा गुलाम बनवतो आणि आपला व्यापार वाढवतो. सत्ताधीश राष्ट्र हे नेहमीच करत आले आहेत. परंतु पाश्चात्यांनी त्यांच्या या साम्राज्यवादी लुटमारीचे गोंडस असे नाव ठेवले आहे. 'संस्कृती आणि सभ्यतेचे रक्षण' आणि 'मानवतेची सेवा' या नावाने गरीब राष्ट्राची लूट करणे व त्यांना गुलाम बनवणे सर्रास चालू आहे. खरे पाहता यांचे मूळ तत्व हे आहे की बलवानांना या जगात जगण्याचा हक्क आहे दुर्बलांना नव्हे. गरीब आणि निर्बलांना या जगात जगण्याचा मूळीच हक्क नाही. या दुर्बल आणि गरीब राष्ट्राच्या 'प्रगतीच्या' नावाखाली त्यांना लाचार, गुलाम, दुराचारी, निधर्मी मानसिकतेत मालामाल केले जाते. मानवतेची त्यांची सेवा म्हणजे या लहान लहान गरीब राष्ट्रांना आपापसात सतत लढवत ठेवणे आहे. जेणे करून त्या राष्ट्रांची शांती सुरक्षिता आणि प्रगतीला कायमची खीळ बसावी. ही आहे या साम्राज्यवादी महासत्ताक पाश्चिमात्य राष्ट्रांची मानवतेची सेवा!

इस्लामची शिकवण साम्राज्यवादाविरुध्द आहे. जगाला इस्लाम या अत्याचारी आणि उपद्रवी साम्राज्यवादी शासन व्यवस्थेऐवजी एक न्यायपूर्ण, सदाचारी व्यवस्था देतो. इस्लामचा दावा आहे की शासन सत्ता व बादशाही फक्त अल्लाहसाठी आहे. अल्लाहच्या दासांना हा हक्क पोहचत नाही की त्यांनी अल्लाहच्या इतर दासांना आपला गुलाम बनवावे. हा मानवतेवर अत्याचार आहे आणि जगातील सर्वात मोठा उपद्रव आहे. त्यांचे कार्य हेच आहे की त्यांनी अल्लाह जो सार्वभौम व सर्व सत्ताधीश आहे; त्याचे प्रतिनिधी म्हणून जगात राज्यशासनाद्वारे मानवतेची सेवा करावी त्यांच्यात सुधार करावा. यासाठी कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"अल्लाहने वचन दिले आहे तुमच्यापैकी त्या लोकांना जे श्रध्दा ठेवतील आणि सत्कृत्यें करतील. तो त्यांना पृथ्वीतलावर त्याचप्रमाणे खलीफा (आपला नायब) बनवील, ज्याप्रमाणे त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांना बनविलेले आहे, त्यांच्यासाठी त्यांच्या त्या धर्माची भक्कम पायावर उभारणी करील, ज्या धर्माला सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्यासाठी पसंत केले आहे आणि त्यांची हलीची भीतीची अवस्था शांततेत परिवर्तीत करील. फक्त त्यांनी माझी भक्ती करावी आणि माझ्या समवेत कुणालाही भागीदार बनवू नये."

*(दिव्य कुरआन, २४:५५-५६)*

"आणि जबूरमध्ये उपदेशानंतर आम्ही हे लिहून ठेवले आहे की पृथ्वीचे वारस आमचे सदाचारी दास असतील. यात एक मोठी वार्ता आहे अल्लाहच्या भक्तीमध्ये राहणाऱ्या लोकांसाठी."

*(दिव्य कुरआन, २१:१०५)*

ही खिलाफत (प्रतिनिधित्व) आणि पृथ्वीचा वारसा हक्क सदाचारी दासांसाठी आहे. अल्लाहने त्यांना तंबी देवून सांगितले आहे की अल्लाहच्या इतर दासांवर तुम्हाला जी प्रतिष्ठा (कुदरत) प्राप्त आहे ती अल्लाहची अमानत आहे. तिला तुमच्या स्वत:ची मिळत म्हणून स्वत:साठी खर्च करू नका. पैगंबर दाऊद (अ.) यांना अल्लाहने शासनाधिकार सुपूर्द करताना सांगितले होते,

"हे दाऊद (अ.) आम्ही तुला पृथ्वीवर खलीफा (अल्लाहचा उत्तराधिकारी) बनविले आहे. म्हणून तू लोकांदरम्यान सत्यानिशी राज्य कर आणि मनोवासनेच्या आहारी जाऊ नकोस. ती तुला अल्लाहच्या मार्गापासून दूर करील. जे लोक अल्लाहच्या मार्गापासून भटकतात निश्चितच त्यांच्याकरिता कठोर शिक्षा आहे कारण हिशोबाचा दिवस ते विसरुन गेले."

*(दिव्य कुरआन, ३८:२६)*

सत्ता प्राप्त झाल्यानंतर मनुष्यात सर्वात मोठा दोष निर्माण होतो तो म्हणजे इतर सर्व सामान्य लोकांपेक्षा तो स्वत:ला वेगळा आणि मोठा समजू लागतो. तो स्वत:च्या वास्तवतेला (अल्लाहचा दास) विसरून जातो. म्हणून तो या गैरसमजूतीत पुरता वेढला जातो की इतर सर्व सामान्य लोक त्याचे गुलाम आहेत आणि त्याच्या भक्तीसाठी आहेत. इस्लाम या महादोषापासून अलिप्त राहण्याची सक्त ताकीद देत आहे. स्वत:च्या मुक्तीसाठी दोषविरहित राहण्यास तंबी देतो. सावध करतो याबाबत कुरआन स्पष्ट आदेश देत आहे,

"ते मरणोत्तर जीवनाचे घर तर आम्ही त्या लोकांसाठी खास करू जे पृथ्वीवर आपली शेखी मिरवू इच्छित नाहीत. आणि उपद्रवदेखील माजवू इच्छित नाहीत. आणि शेवटी भले ईशपरायणांसाठीच आहे. जो कोणी भलेपणा घेऊन येईल त्याच्यासाठी त्यापेक्षा श्रेष्ठ भलाई आहे आणि जो वाईट घेऊन येईल तर अपकृत्ये करणाराला तसाच मोबदला मिळेल जसे कृत्य ते करीत आहेत."

*(दिव्य कुरआन, २८:८३-८४)*

शासनाचे सर्व प्रथम कर्तव्य हे आहे की त्यांनी लोकांशी न्याय करावा. नेहमी सत्याची बाजू घ्यावी असे करताना स्वत:चे नुकसान होत असेल अथवा नातेवाईकांचे, जातीचे, मित्रांचे नुकसान होत असेल तरी हरकत नाही. इस्लाम या न्यायाची शिकवण देतो जो सत्याधिष्ठित आहे. याविषयी कुरआन स्पष्ट आदेश देत आहे,

"हे श्रध्दावंतांनो! न्यायावर दृढ राहा आणि अल्लाहसाठी साक्षीदार बना, यद्यपि तुमच्या न्यायाचा व तुमच्या साक्षीचा आघात तुम्हा स्वत: वर अथवा तुमच्या आईबापावर व नातेवाईकांवर जरी होत असेल तरीदेखील मामल्यातील पक्षकार मग तो श्रीमंत असो अथवा गरीब अल्लाह तुमच्यापेक्षा जास्त त्यांचा हितचिंतक आहे. म्हणून आपल्या मनोवासनेच्या अनुकरणात न्यायापासून दूर राहू नका आणि जर तुम्ही पक्षपाताची गोष्ट बोललाच अथवा सत्याला बगल दिली तर समजून असा की जे काही तुम्ही करता अल्लाहला त्यांची माहिती आहे."

*(दिव्य कुरआन, ४:१३५)*

यापेक्षासुध्दा जास्त कडक आदेश अल्लाहने सदाचारी ईशपरायण शासन व्यवस्थेला दिला आहे,

"हे श्रध्दावंतांनो, अल्लाहसाठी सत्यावर अढळ राहणारे व न्यायाची ग्वाही देणारे बना, एखाद्या गटाच्या शत्रुत्वाने तुम्हाला इतके प्रक्षोभित करू नये की तुम्ही न्यायापासून विमुख व्हाल. न्याय करा, हे ईशपरायणतेशी अधिक निकटवर्ती आहे. अल्लाहच्या कोपचे भय बाळगून कार्य करीत राहा." *(दिव्य कुरआन, ५:८)*

सामर्थ्य आणि योग्यता प्राप्त झाल्यानंतर एका राज्य सत्तेला वाटते की स्वत:च्या राज्याची सीमा वाढवावी आणि दुसऱ्या राष्ट्रांकडून त्यांचा प्रदेश जिंकावा. संपत्तीची आणि प्रदेशाची लालसा अत्याचार आणि हिसांचाराला बळ देते. इस्लाम दुसऱ्या राष्ट्रावर अत्याचार करण्यास सक्त मनाई करतो. एवढेच नव्हे तर अशा अत्याचारी राज्यसत्तेविरुध्द जिहाद करण्याचा आदेश देतो. पैगंबर मुहम्मद (स.) यांचे हदीस वचन आहे, "ज्याने एक फूट दुसऱ्याची जमीन अत्याचाराने हडप केली तर अल्लाह मरणोत्तर जीवनात त्याच्या गळ्यात सात जमिनींची बेडी टाकील."

"ही संपत्ती, धन दौलत, प्रिय वस्तू आहेत. ज्याने तिला सत्याधिष्ठित प्राप्त केले आणि सत्यमार्गात खर्च केले त्याच्यासाठी ती धन दौलत उत्तम भेट आहे. परंतु ज्याने तिला अत्याचाराने मिळविले तर असा मनुष्य अधाशासारखा आहे जो खातो पण पोट भरतच नाही."

इस्लामी शासनाचा तपशीलवार खुलासा कुरआन आणि हदीसमध्ये आला आहे. परंतु येथे तपशीलात जाण्याची संधी नाही. इस्लामने राजसत्तेच्या त्या सर्व सुख सोयींना, चैनींना निषिध्द ठरविले आहे ज्याच्या लालसेपोटी मनुष्य सत्ता हस्तगत करण्यास धडपडतो. इस्लामी शासनकर्ता सर्वसामान्य जनते पेक्षा वेगळा आणि मोठा नाही. तो त्यांच्यातलाच एक आहे. तो स्वत:पुढे दुसऱ्याला साष्टांग नमस्कार घालण्यास बाध्य करू शकत नाही. आणि

सत्यविधी नियमा विरुध्द काही करू शकतच नाही. सत्याविरुध्द तो एक पाऊलसुध्दा पुढे जाऊ शकत नाही. त्याला प्रत्येकक्षणी ही भीती असते की त्याच्या प्रत्येक कृत्याचा हिशेब घेतला जाणार आहे. गुन्ह्याबद्दल कडक शिक्षा भोगावी लागेल म्हणून तो नेहमी सतर्क राहतो आणि ईशकोप होण्याचे भय बाळगून असतो. इस्लामी शासनाध्यक्षाची खरी स्थिती आणि त्याची जबाबदारी काय आहे त्याचे वर्णन अबू बकर (रजि.) यांच्या प्रवचनातून आम्हाला स्पष्ट कळून येते.

"लोकहो! मला तुमच्या शासनांचे कार्य सोपविले आहे. परंतु मी तुमच्यापेक्षा मोठा नाही. माझ्यासाठी तुमच्यातील वयस्कर माणूस बलवान व प्रतिष्ठित आहे जोपर्यंत त्याचा हक्क मी अदा करत नाही आणि बलवान मनुष्य हा तुमच्यातील सर्वात अशक्त आहे. जोपर्यंत त्याच्यापासून हक्क वसूल होत नाही. लोकहो! माझी हैसियत तुमच्या सामान्य माणसापेक्षा जास्त नाही. मला तुम्ही सरळ मार्गावर चालताना पाहिले तरच माझे अनुकरण करा व आज्ञा पाळा. आणि वाकडा झालो तर मला सरळ करा."

माननीय उमर (रजि.) आपल्या एका प्रवचनात म्हणाले होते की -

"तुमच्या धनदौलतीशी माझा संबंध असा आहे की अनाथांच्या संपत्तीशी जसा त्याच्या विश्वस्ताचा असतो. जर मी खुशहाल आहे तर काही एक घेणार नाही आणि जर अडचणीत असलो तर माझा वैध हक्क जेवढा आहे तितकाच राजकोशातून घेईन. माझ्यावर तुमचे काही हक्क आहेत आणि तुम्ही माझ्याशी त्यांची मागणी करू शकता."

अशा प्रकारे शाहीथाटात न राहता एका सर्वसामान्याचे जीवन जगून त्यावर राज्याच्या प्रत्येक व्यक्तीचे हक्काचे ओझे प्रामाणिकपणे वहन करीत राहणे हे इस्लामी शासनध्यक्षाचे काम आहे. कुरआन याविषयी स्पष्ट आदेश देत आहे,

"हे ते लोक आहेत ज्यांना आम्ही जर पृथ्वीवर सत्ता बहाल केली तर ते नमाज कायम करतील, जकात देतील, सत्कार्माचा आदेश देतील आणि वाईटाला प्रतिबंध करतील आणि सर्व बाबींचा परिणाम अल्लाहच्या अखत्यारित आहे." *(दिव्य कुरआन, २२:४१)*

फक्त दावा करावा म्हणून इस्लामने हा दावा केलेला नाही तर पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या सहाबांनी (रजि.) आणि आदर्श शासनाध्यक्षांनी (खुलफा-ए-राशिदीन) जगापुढे आदर्श ठेवला आहे. येथे इतिहासाचे वर्णन करणे अपेक्षित नाही. परंतु ऐतिहासिक सत्य आहे की आदर्श शासन व्यवस्था ही इस्लामी शासन व्यवस्था आज जगापुढे

उपलब्ध आहे.

बनी मखजूम टोळीची एक प्रतिष्ठित फातेमा नामक स्त्री चोरीच्या आरोपात बंदी बनवून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासमोर आणली जाते. कुरैशच्या लोकांना भीती वाटते की सर्व सामान्यांसारखे या प्रतिष्ठित स्त्रीलासुध्दा हाथ कलम करण्याची शिक्षा तर ठोठावली जाणार नाही? शिफारसीसाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे त्यांचे अतिप्रिय सहाबी जैद (रजि.) यांना पाठविले जाते. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या शिफारसीला रद्द करून सांगतात की तुमच्या पूर्वीचे लोक याच कारणामुळे विनाश पावले कारण ते दुर्बळांवर तर शिक्षेची काटेकोर अंमलबजावणी करीत असत परंतु सबळांना, प्रतिष्ठितांना सोडून देत असत. यानंतर भावनावश होऊन सांगितले, "त्या अस्तित्वाची शपथ ज्याच्या हातात माझा जीव आहे. जर पैगंबर मुहम्मद (स.) यांची लाडकी मुलगी फातमा (रजि.) येथे चोरीच्या आरोपात पुढे आली असती तर तिचे हात कापून टाकले असते."

बदरच्या युध्दात कुरैश सरदारांच्या बरोबर पैगंबर मुहम्मद (स.) यांचे जावई अबूल आस यांना अटक केली जाते. (अबूल आस हे जैनब (रजि.) यांचे पती होते. ते हि. स. ५ पर्यंत अश्रध्दावंत होते नंतर त्यांनी इस्लामचा स्वीकार केला.) सर्वसामान्य कैद्याप्रमाणे त्यांनाही बंद खोठडीत ठेवले जाते. त्यांच्याजवळ संपत्ती नसल्यामुळे त्यांना जामीन मिळत नाही. ते त्यांची पत्नी पैगंबर मुहम्मद (स.) यांची मुलगी जैनब (रजि.) यांना निरोप पाठवितात. त्यांना एक मूल्यवान हार जो खदिजा (रजि.) यांचा होता पाठविला जातो. हाराकडे पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांना आपल्या मृत पत्नी (खदीजा (रजि.)) यांची आठवण होते आणि डोळयांतून आपोआप अश्रु वाहू लागतात. तरी ते जावयाची रक्कम (फिदीया) माफ करीत नाही. तमाम लोकांना विचारतात की तुम्ही जर हे पसंत केले की मुलगीला तिच्या आईचा हार परत मिळावा जेणेकरून आईची आठवण राहील. लोकांनी परवानगी दिली तेव्हा जावयाला विनारकमेची (रक्कम न घेता) सोडून दिले जाते. तसेच हुदेबियाच्या प्रसंगी पैगंबर मुहम्मद (स.) व कुरैश यांच्या दरम्यान करारनामा होतो. लिखापडी करताना एक मुस्लिम कुरैशच्या कैदेतून पळून येतो. त्याच्या पायात बेड्या आहेत. शरीरांवर असंख्य जखमा आहेत. ते मुस्लिमांसमोर येताक्षणी चक्कर येऊन पडतात आणि विनवणी करतात की मला कुरैशच्या कैदेतून मुक्त करा. त्यावेळी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ठरविले असते तर त्यांना त्वरित मुक्तता दिली असती. परंतु अश्रध्दावंतांशी करार होऊन गेला होता की कुरैशच्या कैदेतून जो कोणी मुस्लिम परत येईल त्याला कुरैशच्या हवाली पुन्हा करण्यात येईल. यामुळे पैगंबरांनी त्या मुस्लिमाला परत घेण्यास असमर्थता दर्शविली.

स्वत:च्या जखमा दाखवून तो वर्णन करीत होता की मला त्या नरकात पुन्हा पाठवू नका. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले की "अबू जिंदल (रजि.) सबुरीने घ्या. धैर्याने तोंड द्या आम्ही करार भंग करू शकत नाही. अल्लाह तुमच्या सुटकेची स्थिती निर्माण करील." यरमुकच्या युध्दाप्रसंगी रोम सम्राटाने लाखोच्या संख्येत मुस्लिमांविरुध्द लष्कर जमा केले होते. जॉर्डन आणि फिलिस्तीनहून मुस्लिमांना काढून देण्यासाठी आणि त्यांचे सामर्थ्य तोडण्यासाठी सज्ज होता. त्या निर्णायक प्रसंगी मुस्लिमांना एकएक पैशाची गरज पडते. परंतु त्यांनी अश्रध्दावंतांपासून जो जिझिया वसूल केला होता ती रक्कम त्यांना परत करतात यासाठी की आता मुस्लिम शासन (इस्लामी शासन) तुमची रक्षा करण्यास असमर्थ आहे. म्हणून अश्रध्दावंतांना त्यांची रक्षा स्वत: करण्यास सांगितले जाते. त्यावर अश्रध्दावंत म्हणतात की इस्लामचा न्याय आम्हाला अतिप्रिय आहे आणि आम्ही तुमच्याबरोबर शत्रूशी मुकाबला करू. हरकल हा एक ख्रिस्ती सम्राट होता आणि हे अश्रध्दावंतसुध्दा ख्रिस्ती होते जे त्या राजाच्या विरोधात लढण्यास तयार झाले. सफीयन युध्दाप्रसंगी खलीफा अली (रजि.) यांची चिलखत हरवते. युध्दावरून परत आल्यावर ती चिलखत एका यहुदीजवळ सापडते. आपण त्याच्याजवळ ते मागणी करता. यहुदी म्हणतो की माझी संपत्ती आहे. अली (रजि.) यांना विश्वास होतो की यहुदी खोटे बोलत आहे. त्यांच्या शासन अधिकारात अली (रजि.) यांनी ती जिरा यहुदीकडून परत घेतली असती. परंतु ते काझीकडे अपील करतात. काझीसुध्दा राजाला त्वरित राजा म्हणून निकाल देत नाही. काझींनी खलीफांना साक्षी पुरावे सादर करण्यास सांगितले. अली (रजि.) यांनी त्यांचा एक गुलाम आणि आपला मुलगा हुसेन (रजि.) यांची साक्ष दिली. काझींनी मुलाची साक्ष ग्राह्य धरली नाही. हे पाहून तो यहुदी अत्यंत प्रभावित झाला आणि म्हणाला ज्या धर्मात असा श्रेष्ठ न्याय आहे तो जरूर सत्य धर्म आहे आणि कलमा मुखोदत करून इस्लाम धर्म स्वीकारला. माननीय उमर (रजि.) यांच्याजवळ एकदा भली मोठी जिझियाची रक्कम आली. तिला पाहाताच क्षणी माननीय उमर (रजि.) उद्‌गारले की तुम्ही लोकांना बरबाद तर केले नाही ना? अधिकाऱ्याने उत्तर दिले, आम्ही तर फार नरमाईने जिझिया वसूल केला आहे. तेव्हा उमर (रजि.) यांनी ती रक्कम राजकोशात जमा केली. माननीय उमर (रजि.) यांचा मुलगा दारू सेवन करतो तेव्हा त्याला सर्वसामान्यांप्रमाणे कैदी बनविले जाते. स्वत: पिता माननीय उमर (रजि.) आपल्या हाताने मुलाला ८० कोडे लगावतात आणि मुलाचे त्यात निधन होते. माननीय उमर (रजि.) यांच्या एका राज्यातील राज्यपालाकडे आवश्यकतेपेक्षा जास्त संपत्ती जमा होते. तेव्हा त्यांना विचारणा होते. त्यांच्या उत्तराने माननीय उमर (रजि.) यांचे समाधान होत नाही आणि राज्यपालाची सर्व संपत्ती राजकोशात जमा केली जाते. माननीय अबू बकर (रजि.) पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या महानिर्वाणानंतर इस्लामी

शासनाध्यक्ष नियुक्त होतात. दुसऱ्या दिवशी माननीय उमर (रजि.) त्यांना कपड्याचा गठ्ठा डोक्यावर घेऊन बाजाराकडे जातांना पाहतात. माननीय उमर (रजि.) विनम्रपणे त्यांना सांगतात, ''आपण आता शासनाध्यक्ष आहात तुम्हाला हे काम शोभत नाही. ''अबू बकर (रजि.) उत्तर देतात, ''मी माझा आणि माझ्या कुटुंबाचा उदरनिर्वाह कसे करू ?'' माननीय उमर (रजि.) यांनी हे काम दुसऱ्याकडे सुपूर्द केले आणि पुढे अगदी तुटपुंजे मानधन घेण्यास शासनाध्यक्ष माननीय अबू बकर तयार झाले. माननीय अबू बकर (रजि.) यांचा अंतिम समय जवळ येतो. तेव्हा लोकांना बोलावून सांगतात, ''खलीफा झाल्यापासून माझ्या संपत्तीत जी वाढ झाली आहे, त्याचा हिशेब लावा आणि ते सर्व नव्या खलीफाकडे सुपूर्द करा जेव्हा निधनानंतर हिशेब केला गेला तर एक उँट, एक गुलाम आणि एक जुनी चादर याव्यतिरिक्त काहीही सापडले नाही.

माननीय उमर (रजि.) यांच्या शासनकाळात राज्यविस्तार भरपूर झालेला होता. इराणपासून दक्षिण आफ्रिकेपर्यंत राज्य पसरले होते. करोडोच्या संख्येत राजकोशात दरवर्षी भर पडत होती. कैसर व कसरा (रोम) ची सर्व संपत्ती मुस्लिमांच्या ताब्यात आली होती. अशा या विशाल राज्याच्या राजाच्या कपड्यावर मात्र बाराबारा थिगळे लावलेले होते. पायात फाटलेले पायतान घालून रस्त्यात व बाजारात अनाथ, गरीब व विधवांची विचारपूस करत फिरत असत. इतर राज्यांचे प्रतिनिधी येत तर त्यांना माननीय उमर (रजि.) यांना ओळखणे अशक्य होत असत. त्यांचे जेवण अगदी साधे होते. जेव्हा त्यांचे निधन झाले तेव्हा काहीही शिल्लक नव्हते. कर्ज फेडण्यासाठी राहते घर विकावे लागले होते. हे काही किस्से कहाणी मुळीच नाही. ही इस्लामी शासनाध्यक्षांच्या इतिहासाची छोटीसी झलक आहे. जगात यापेक्षासुध्दा चांगला आदर्श शासनाध्यक्षाचा तुम्ही दुसरा दाखवू शकता काय? जगात अशाच सदाचारी श्रध्दावंत लोकांचा शासन चालविण्याचा अधिकार आहे. त्यानी जवळपासच्या सैतानी राज्यकर्त्यांचे शासन उलथून पाडले आणि त्याजागी न्यायी शासन स्थापन केले तर हा मानवतेवर अत्याचार होता? की मानवतेची सेवा? याविरुध्द पाश्चिमात्यांचे हे खोटे दावे की ज्यांचा ईशपरायणतेशी आणि आज्ञाशीलतेशी न्यायाशी अजिबात संबंध नाही तसेच त्यांच्या स्वार्थापलीकडे ज्यांची नजर जात नाही, अशांनी इस्लामी शासनाला नावे ठेवावीत? हे सत्य आहे की नंतरच्या काळात मुस्लिम राज्याकडे हे विशेष गुण अल्प प्रमाणात बाकी राहिले होते. इस्लामी शासन व मुस्लिम शासन यात फरक पडत गेला. परंतु दोष इस्लामचा नाही तर त्याच्या अनुयायींचा आहे. इस्लाम तर एक विधीविधान आहे, ज्याचा कुरआन आणि हदीस मूळस्त्रोत आहे. जे राज्य या विधीनियमाप्रमाणे चालते ते राज्य इस्लामी राज्य आहे आणि ज्याची वर्तणूक याविरुध्द आहे ते इस्लामी शासन मुळीच नाही. आमच्यासाठी मुस्लिम बादशाह हे आदर्श नाही तर इस्लामी

विधीविधान आदर्श आहे.

**इस्लामच्या विजयाचे मुख्य कारण** - या ग्रंथात सतत हा उल्लेख केला गेलेला आहे की 'इस्लामी शरियत'मध्ये राष्ट्रीयतेच्यासाठी तलवार हातात घेणे निषिध्द आहे. यावर हा प्रश्न उभा राहतो की जर हे कृत्य हराम (निषिध्द) आहे तर सहाबा (रजि.) खुलफाए राशेदीन यांच्या युध्दाबद्दल काय म्हटले जाईल ज्यांनी इराक, जॉर्डन, इराण, इजिप्त दक्षिण आफ्रिका इ. राज्यांशी युध्द करून त्यांना पादाक्रांत केले होते? हा आक्षेप विरोधकांनी मोठ्या प्रमाणात लावला आहे. मुस्लिम धर्मपंडितांनी त्याचे उत्तरसुध्दा दिलेले आहे. परंतु यावर कुणीही विचार केलेला दिसत नाही की याविषयी इस्लाम आणि इस्लामेतर यांच्या दृष्टिकोनात मूलभूत फरक आहे. ज्यांनी मुस्लिमेतरांच्या आक्षेपाला समोर ठेऊन उत्तर दिले होते त्यांनी इस्लामला पूर्ण न्याय दिला नाही आणि ज्यांनी पूर्ण गांभीर्याने उत्तर दिले नाही त्यांच्यामुळे तर शंकेत भर पडतच गेली.

वास्तविकत: ही आहे की इस्लामी शासन सत्तेसंबंधी इस्लाममध्ये राष्ट्रीयता आणि परराष्ट्रीयता यात भेद नाही. तर इस्लाम 'न्याय आणि अन्याय' या कसोटीवर भेद करतो. एखाद्या देशातील शासन जर अशा अत्याचारी, अन्यायी, भ्रष्टाचारी व दुराचारी लोकांच्या हातात असेल आणि तिथे लोकशाही असेल तरी ती शासन व्यवस्था तिरस्करणीय आहे. परदेशी शासन असेच उपद्रवी असेल तर तेसुध्दा स्वदेशी शासनाप्रमाणेच तिरस्करणीय आहे. परंतु जर एक अरबेतर एका अरब देशावर ईशपरायणशील सदाचारी व लोक कल्याणकारी शासन चालवत असेल तर ते शासन उत्कृष्ठ शासन आहे. इस्लाम देशाच्या शासनप्रणालीकडे राष्ट्रीयतेच्या भूमिकेतून नव्हे तर मानवतेच्या नजरेतून पाहतो. इस्लामजवळ सदाचारी हा दुराचारीपेक्षा प्रिय आहे. देशी, परदेशी, भारतीय, अभारतीय, काळे, गोरे उचनिच इ. भेदाभेद हे अमानवी आणि द्वेषपूर्ण अंधविश्वास आहेत.

इस्लामनुसार शासनाचा चांगुलपणा हा त्याचा स्वदेशी होणे अथवा स्ववर्णीय होणे यावर अवंलबून नाही. तसेच वाईट शासन व्यवस्था विदेशी अथवा अवर्णिय असणे यावर अवलंबून नाही. मूळ प्रश्न हा आहे की शासन व्यवस्था ही न्यायिक आणि सत्याधिष्ठित आहे की नाही? असे असेल तर इस्लाम अशा शासनाला नष्ट करण्याचा प्रयत्न करतो कारण ते उपद्रवी शासन आहे. त्या जागी एक न्यायप्रिय आणि सत्याधिष्ठित शासन व्यवस्था आणू इच्छितो. हे इस्लामचे प्रथम कर्तव्य ठरते. मग शासनकर्ते देशी असोत अथवा परदेशी! ही वेगळी गोष्ट आहे की विदेशी शासन हे अत्याचारी शासन असते कारण एक देश दुसऱ्या देशावर राज्य याचसाठी करतो की दुसऱ्या

देशातील लोकांना गुलाम बनवावे आणि त्यांच्याकडून स्वत:चे स्वार्थ साधून घ्यावे. याविरुध्द त्यांच्या देशाच्या राज्यकर्त्यांमध्ये सुधार व लोककल्याण करण्याची भावना जागृत असते. तरी पण देशी शासन नेहमीच चांगले असते असे नाही व विदेशी अत्याचारी असतात असे नाही. शक्य आहे एका देशातील त्याचे लोक त्यांना गुलाम बनवून त्यांच्यावर अत्याचार करतात. खाजगीकरण आणि वैश्विकरण यामुळे ही शंका आणखी प्रबळ होऊ पाहात आहे. म्हणून शासन व्यवस्थेचा मूलाधार हा ईशपरायणतेत आहे ज्यामुळे न्यायप्रिय सदाचारी शासन व्यवस्था स्थापन होते. अन्यथा दुराचारी आणि उपद्रवी शासन व्यवस्था जगात थैमान माजवते. यापासून कोणी हा अर्थ काढत असेल की इस्लाम देशी शासन व्यवस्थेविरुध्द आहे तर ही त्याची घोडचूक आहे. तो प्रत्येक राष्ट्राच्या हक्काला मान्य करतो की स्वत:च्या नागरिकांचा सुधार त्या राज्यशासनानेच करावा. परंतु एखाद्या राष्ट्राची चहुबाजूने अधोगती झाली तर तो देश आणि त्यातील देशवासीय राज्य शासन चालविण्याचा हक्क गमावून बसतात. त्यांच्या जागी विदेशी सदाचारी लोकांच्या हातात त्या देशाचे शासन सुपूर्द करून त्याला विनाशापासून वाचविण्याचे काम इस्लामला मान्य आहे. कुरआनने दुराचारी राष्ट्रांना ही धमकी दिली आहे,

"जर तुम्ही सत्य व न्यायाकडे तोंड फिरवाल तर अल्लाह तुमच्या जागी अन्य एखाद्या राष्ट्राला आणील आणि ते तुमच्यासारखे असणार नाहीत." *(दिव्य कुरआन, ४७:३८)*

"तुम्ही जर (जिहादसाठी) उठणार नाही तर अल्लाह तुम्हाला दु:खदायक शिक्षा देईल, आणि तुमच्या जागी दुसऱ्या एखाद्या समुहाला उभे करील आणि तुम्ही ईश्वराचे काही एक वाकडे करू शकणार नाही, तो प्रत्येक गोष्टीला समर्थ आहे." *(दिव्य कुरआन, ९:३९)*

"आणि कार्य सिध्दीकरिता केवळ तोच पुरेसा आहे, जर अल्लाहने इच्छिले तर तो तुम्हाला बाजूस सारून तुमच्या जागी इतरांना आणील आणि यावर त्याचे सर्वस्वी प्रभुत्व आहे. जो कोणी केवळ ऐहिक लाभाचा इच्छुक आहे त्याला माहित असावे की अल्लाहजवळ ऐहिक लाभदेखील आहे आणि परलोकचा लाभदेखील. आणि अल्लाह सर्व काही ऐकणारा व सर्वकाही पाहणारा आहे." *(दिव्य कुरआन, ४:१३२-१३४)*

अशा अर्थाची संकेतवचनं कुरआनमध्ये अनेक आलेली आहेत. शासनाचा हक्क योग्यते वर अवलंबून आहे. जे राष्ट्र शासन करण्याची योग्यता गमावून बसतात, ते त्यांच्या हक्काला गमावून बसतात. आणि जे राष्ट्र (विदेशी) शासनाची योग्यता प्राप्त करतात त्यांना ते शासन बहाल केले जाते. ही योग्यता फक्त बळ आणि सामर्थ्याच्या अर्थाने मुळीच नाही. ही योग्यता त्या लोकांसाठी खास आहे जे एका ईश्वराची भक्ती करतात, दुराचारापासून रोखतात आणि सदाचाराचा आदेश देतात. ईशपरायणशील असतात त्यांना पूर्ण विश्वास

असतो की मरणोत्तर जीवनात त्यांना त्यांच्या कृत्यांचा हिशेब द्यावा लागणार आहे. कुरआनोक्ती आहे,

"अल्लाह आणि मरणोत्तर दिनावर श्रध्दा बाळगतात, सदाचाराचा आदेश देतात व दुराचारापासून प्रतिबंध करतात आणि पुण्य कार्यात क्रियाशील असतात हे सदाचारी लोक आहेत."
*(दिव्य कुरआन, ३:११४)*

हे 'सदाचारी लोक' कुण्या एका राष्ट्राची अथवा देशाची मिळकत नाही तर समस्त मानवजातीची धरोहर आहे. आदम (अ.) च्या समस्त संततीला त्यांच्या योग्यतेचा फायदा उठविण्याचा हक्क आहे. जर ते आपली सेवा एखाद्या राष्ट्रासाठी अथवा जनसमुदायासाठीच सीमित करतात तर असे करणे हे त्यांनी समस्त मानवजातीवर केलेले अत्याचार आहे. इस्लामने अशा 'सदाचारी लोकांची सेवा' ही पूर्ण मानवतेसाठी खास करून ठेवली आहे. समस्त मानवजात त्या सदाचारी लोकांच्या योग्यतेचा फायदा उठवू शकतात. कुरआन या सत्यस्थितीला स्पष्ट करून सांगत आहे,

"आणि जबूरमध्ये उपदेशानंतर आम्ही लिहून ठेवले आहे की पृथ्वीचे वारस आमचे सदाचारी दास ठरतील यात एक मोठी वार्ता आहे भक्तीमध्ये राहणाऱ्या लोकांसाठी."
*(दिव्य कुरआन, २१:१०५-१०६)*

हा इस्लामचा आत्मा आहे शासन व्यवस्थेविषयीचा! याला समजून घेतल्यानंतरच सहाबा (रजि.) व खलीफा (रजि.) यांच्याविजयी युध्दाचे गुढ तम्हास कळून येईल. दुराचाराला व उपद्रवाला मूठमाती देऊन त्याजागी सदाचारी ईशपरायण शासनव्यवस्था मानवतेच्या कल्याणासाठी स्थापन करणे हेच त्यांचे ध्येय होते. त्यांनी आजूबाजूच्या अत्याचारी व दुराचारी शासनाला ह्याचसाठी पराजित केले होते. तेथे मनुष्य मनुष्याचा ईश्वर बनला होता. न्याय, विधीनियम, कोठेच शिल्लक नव्हते. शासनकर्त्यांच्या व बादशाहाच्या लहरीपणावर लोकांचे भविष्य अवलंबून होते. त्यांची घरंदार उजाडली जात असत. त्यांच्या स्त्रियांची आबरू घेतली जात असे. शासन पुरस्कृत दहशतवाद, अनाचार आणि हिंसा चहुकडे माजलेली होती. गरीबांचे रक्त शोषण केले जात होते. राजे, बादशाह चैनीत आणि प्रजा मात्र भूकेली! त्या राज्यात दारू सेवन, जुगार, व्यभिचार सर्वत्र बोकाळलेला होता. त्याला राजाश्रय प्राप्त होता. शारीरिक वासनेने चारित्र्यहीनता आणि अमानवीयतेचा धुमाकूळ माजविला होता. संस्कृती आणि सभ्यतेच्या आभासामागे सैतानी चाळे इतके बोकळले होते की सैतानालासुध्दा शरम वाटावी.

मानवतेच्या या अध:पतनाला पाहून पैगंबर मुहम्मद (स.) यांचे सदाचारी सहाबा (रजि.) अनुयायींनी त्या विनाशाच्या खाईत कडेलोट होऊ पाहणाऱ्या त्या राष्ट्रांत सुधार आणण्यासाठी कंबर कसली. प्रथम त्यांनी त्या राष्ट्रांना उपदेश केला. त्यांना व्याख्याने आणि प्रवचने दिलीत आणि इस्लामच्या कृपाछत्राखाली त्यांच्या कल्याणासाठी येण्याचे निमंत्रण दिले. त्यांनी त्यांच्या दुराचारावर कायम राहणेच पसंत केले, परंतु सदाचाराचे निमंत्रण स्वीकारले नाही. तेव्हा अल्लाहने त्यांच्या जागी त्यांच्या राष्ट्रात सदाचारी सहाबा (रजि.) यांना शासनसत्ता बहाल केली. यापूर्वी त्यांना त्यांचा शासनाधिकार सोडून देण्यास सांगितले गेले तरी त्यांनी मान्य केले नाही. मानवतेच्या कल्याणासाठी शेवटी त्या राष्ट्रांविरुध्द तलवार हातात घेतली गेली. मुठभर निशस्त्र सदाचारी लोकांनी आपल्या नैतिक बळावर व सामर्थ्यावर तात्कालीन महासत्तांचे शासन उलटून टाकले. हिंदुस्थानपासून दक्षिण आफ्रिकेपर्यंत जे लोक त्यांच्या शासनाच्या अत्याचारापासून आणि उपद्रवांपासून पीडित होते त्यांना स्वातंत्र्य बहाल केले.

आज तुम्हाला हा अधिकार आहे की त्यांच्या या कार्याची साम्राज्यवादाशी तुलना करावी अथवा आक्रमकता अथवा अत्याचारी कृत्य म्हणावे. परंतु तुम्ही हे ऐतिहासिक सत्य लपवू शकत नाही की सदाचारींच्या शासन व्यवस्थेने तात्कालीन अत्याचारी व उपद्रवी शासन व्यवस्थेच्या मगर मीठीतून लोकांची सुटका केली होती. विनाशाच्या खाईत कडेलोट होऊ पाहणाऱ्या त्या राष्ट्रांना सदाचारी शासनव्यवस्थेने नवसंजीवनी दिली. त्यांना चारित्र्य, नैतिकता, भौतिकतेच्या व अध्यात्मिक प्रगतीच्या उच्च शिखरांवर विराजमान केले होते. त्यांच्यात ती नवसंजीवनी इस्लामी शासनाने फुंकली होती की ज्याचा सुगंध आजसुध्दा दरवळत आहे. हे ऐतिहासिक सत्य तर जगातील आजचे कोणतेही शासन सत्ता नाकारू शकत नाही. राष्ट्रभक्तीच्या धर्माचे लोक तर निर्णय देऊ शकतात की रोम व ईराणची महासत्ता नष्ट झाली असती तरी चालली असती. पण तात्कालीन अरब राष्ट्रांनी त्यांच्यावर आक्रमण करून जायचे नव्हते. त्यांच्यावर आक्रमण करण्याचा अरबांना हक्क पोहचत नव्हता. परंतु सदाचाराचा धर्म राष्ट्रभक्तीच्या धर्माविरुध्द हे सांगतो की त्या काळी रोम आणि ईराण या महासत्तांवर आक्रमण करून अरबांनी मानवतेची श्रेष्ठतम सेवा केली आहे. मानवी इतिहासात मानवतेची ही सेवा अद्वितीय आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांची आणि त्यांच्या अनुयायींची (सहाबा कराम) सदाचारी शासन व्यवस्था भूतलावर सूर्याने आपल्या डोळ्यांनी कधीही पाहिली नव्हती. जगाचे हे दुर्दैव आहे की जगाचा एक मोठा भाग त्या सदाचारी शासन व्यवस्थेपासून त्या काळी वंचित राहिलेला होता.

## प्रकरण ४

# इस्लाम प्रचार आणि इस्लामची तलवार

कुरआन, हदीस व प्रमुख धार्मिक ग्रंथांच्या आधारावर आपण इस्लामी युध्दाबद्दलचा तपशील आणि इस्लामी युध्दाचा हेतु यांचा सविस्तर अभ्यास आतापर्यंत केला. यात आपणास कुठेही असे आढळून आलेले नाही की इस्लाम स्वीकारण्यासाठी तलवारीचा वापर करण्यात आला. संदर्भित कोणत्याही आदेशावरून तुम्ही अशा प्रकारचा अर्थसुध्दा काढू शकत नाही. इस्लामच्या युध्दासंबंधीच्या आदेशांत अशाप्रकारचा एकही आदेश नसणे विरोधकांचे तोंड बंद करण्यासाठी सज्जड पुरावा आहे. परंतु इस्लामविरोधक इस्लामी जिहाद (युध्द) बद्दल सुनियोजित आणि प्रभावीपणे सतत अपप्रचार करीत आहेत. अनेकानेक गैरसमज त्यातून निर्माण झालेले आहेत. म्हणूनच याविषयी इस्लामी आदेशांचा तपशीलात जाऊन विचार करणे आवश्यक आहे. कुरआनने जिथे जिथे युध्द (जिहाद) चा आदेश दिला आहे, तिथे तिथे युध्दाच्या अटींचासुध्दा उल्लेख केला आहे. मर्यादा घालून दिल्या आहेत आणि त्या मर्यादांचे उल्लंघन करणे निषिध्द ठरविले आहे. 'सूरह बकरा' या अध्यायात युध्दाचा आदेश देतांना स्पष्ट सांगितले गेले आहे,

"आणि त्यांच्याशी तोपर्यंत युध्द करा जोपर्यंत उपद्रव नष्ट होत नाही. आणि अल्लाहसाठीच धर्म होईल. नंतर ते परावृत्त झाले तर लक्षात ठेवा की अत्याचाऱ्यांशिवाय कुणाशीही शत्रुत्व ठेवू नका." *(दिव्य कुरआन, २:१९३)*

वरील संकेतवचनात मर्यादा ही घातली आहे की जोपर्यंत उपद्रव शिल्लक आहे तोपर्यंत त्यांच्याशी युध्द करीत राहा जेणेकरून अल्लाहच्या मार्गातील अडथळे दूर होतील. दोन्ही प्रकार जेव्हा संपुष्टात येतील तेव्हा युध्द लढणे बंद करण्याचा आदेश आहे. ते जर परावृत्त झाले तर लक्षात ठेवा की अत्याचाऱ्यांशिवाय कुणाशीही शत्रुत्व ठेवू नका हे बजावून सांगितले आहे. 'सूरह मायदा' या अध्यायात आणखी स्पष्टपणे मानवीजीवाच्या वैधता आणि अवैधताबद्दल आदेश आहे,

"ज्याने एखाद्या माणसाला खुनाबद्दल अथवा पृथ्वीतलावर उपद्रव पसरविण्याव्यतिरिक्त अन्य कारणाने ठार केले तर त्याने जणू काही सर्व मानवांना ठार केले आणि ज्याने कुणाला जीवदान दिले त्याने जणू काही सर्व मानवजातीला जीवदान प्रदान केले." *(दिव्य कुरआन, ५:३२)*

वरील आदेशावरून हेच स्पष्ट होते की मनुष्याला ठार करणे हे फक्त दोन

परिस्थितीतच वैध आहे. एक ही परिस्थिती ज्यामध्ये त्या माणसाने एखाद्या दुसऱ्या व्यक्तीचा नाहक जीव घेतला असेल (विनाकारण ठार केले असेल) आणि दुसरे हे की भूतलावर उपद्रव (फसाद) माजविला असेल. या दोन्ही स्थितीऐवजी दुसऱ्याला ठार करणे हे फक्त अवैध नाही तर इतका मोठा गुन्हा आहे की त्या हीन कृत्यास समस्त मानवजातीची कत्तल करण्यासारखे ठरविले आहे. तसेच दुसऱ्याचे जीव वाचविणे हा सदाचारच फक्त नाही तर जणू काही त्याने समस्त मानवजातीलाच जीवदान दिले आहे, इतके श्रेष्ठतम पुण्य कार्य आहे. पुढे याच 'सूरह तौबा'मध्ये स्पष्ट करण्यात आले आहे,

"(युध्द करा त्यांच्याशी) इथपावेतो की त्यांनी स्वहस्ते जिझिया द्यावा व छोटे बनून राहावे." *(दिव्य कुरआन, ९:२९)*

यावरून हेच स्पष्ट होते की जेव्हा ईश द्रोही लोक स्वत:हून जिझिया द्यावयास सुरु करतील आणि इस्लामच्या अधिन होऊन राहतील तेव्हा त्यांच्याशी युध्द करणे निषिध्द आहे. 'सूरह शुरा" या अध्यायात अगदी स्पष्ट करून सांगितले गेले आहे,

"वाईटाचा बदला तसलेच वाईट आहे, मग जो कोणी माफ करील आणि सुधारणा करील त्याचा मोबदला अल्लाहच्या जिम्मे आहे, अल्लाह जालिमांना पसंत करीत नाही. आणि जे लोक अत्याचार झाल्या नंतर बदला घेतील त्यांची निर्भर्त्सना केली जाऊ शकत नाही, निर्भर्त्सनेलायक तर ते आहेत जे दुसऱ्यावर जुलूम करतात आणि पृथ्वीवर हकनाक आगळिकी करतात. अशा लोकांसाठी यातनादायक प्रकोप आहे. तथापि जो मनुष्य संयमाने वागेल आणि क्षमा करील तर हे मोठ्या साहसी कामांपैकी आहे."

*(दिव्य कुरआन, ४२:४०-४३)*

मुस्लिमांचे शत्रुत्व फक्त सत्य धर्माचे शत्रूसंगे आहे आणि ते जे अल्लाहच्या मार्गात अडथळे निर्माण करतात. जे लोक असे नाहीत त्यांच्याशी सदाचाराने वागण्यासाठी कोणतीच आडकाठी नाही. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"अल्लाह तुम्हाला या गोष्टीची मनाई करीत नाही की तुम्ही त्या लोकांशी सद्व्यवहार आणि न्यायाचे व्यवहार करावे ज्यांनी धर्माच्या बाबतीत तुमच्याशी युध्द केले नाही आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले नाही. अल्लाह न्याय करणाऱ्यांना पसंत करतो. तो तुम्हाला ज्या गोष्टीची मनाई करतो ती तर ही आहे की तुम्ही त्या लोकांशी मैत्री करावी. ज्यांनी तुमच्याशी धर्माच्या बाबतीत युध्द केले आहे आणि तुम्हाला तुमच्या घरातून बाहेर काढले आहे. आणि तुम्हाला बाहेर घालविण्यात एक दुसऱ्यास मदत केली आहे. त्यांच्याशी जे लोक मैत्री करतील तेच अत्याचारी आहेत." *(दिव्य कुरआन, ६०:८-९)*

वरील आदेश सूर्य प्रकाशा इतके स्पष्ट आहेत की त्यांचा आणखी खुलासा करणे गरजेचे नाही. यावरून हेच स्पष्ट होते की इस्लामी जिहाद (युध्द) चा उद्देश लोकांना बळजबरीने इस्लाम स्वीकारण्यास भाग पाडणे हा मूळीच नाही तर लोकांना अत्याचार, उपद्रव, हिंसाचार व अनाचारापासून परावृत्त करून त्यांना सदाचाराकडे, न्याय आणि सुरक्षिततेची व्यवस्था प्रदान करून देणे हा आहे. इस्लामची तलवार अशा लोकांच्या माना कापण्यास तर फार धारदार आहे, जे मुस्लिमांना आणि इस्लामला संपविण्याचा प्रयत्न करतात आणि अल्लाहच्या भूमीत उपद्रव माजवितात. काय मग या तलवारीच्या धारेला अत्याचार कसे म्हणाल? परंतु जे दुराचारी नाहीत, जे मुस्लिम आणि इस्लामला संपविण्याचा प्रयत्न करीत नाहीत, जे शांती भंग करीत नाहीत मग ते कोणत्याही वंशाचे, धर्माचे अथवा देशाचे असोत, इस्लाम त्यांना त्रास अजिबात देत नाही. त्यांच्यासाठी इस्लामची तलवार बोथट आहे आणि त्यांचे रक्त निषिध्द!

**धर्मात जोरजबरदस्ती नाही** - इस्लामी युध्दाच्या अटी निर्णायक स्वरुपाच्या आहेत. अल्लाह आम्हाला फक्त त्या अटी सांगून तिथेच थांबलेला नाही तर पुढे जाऊन जगाला अगदी स्पष्ट करून सांगितले की धर्मात जोरजबरदस्ती नाही. इस्लामचा प्रसार आणि प्रचार कार्यात कसल्याही प्रकारचा जोरजबर नाही.

"धर्माच्या बाबतीत कोणतीही जोरजबरदस्ती नाही. सत्य असत्यापासून वेगळे केले गेले आहे. आता ज्याने कोणी, तागूतचा इन्कार करून अल्लाहवर श्रध्दा ठेवली त्याने एक असा मजबूत आधार ग्रहण केला जो कधीही तुटणार नाही. आणि अल्लाह (ज्याचा आधार त्याने घेतला आहे) सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. जे लोक श्रध्दा ठेवतात त्यांचा समर्थक व सहाय्यक अल्लाह आहे आणि तो त्यांना अंधारातून काढून प्रकाशात आणतो. आणि जे लोक द्रोहाचा मार्ग अवलंबितात त्यांचे समर्थक व सहायक तागूत आहेत. आणि ते त्यांना प्रकाशापासून ओढून अंधाराकडे घेऊन जातात. हे नरकाग्नीमध्ये जाणारे लोक आहेत जेथे हे सदैव राहतील."

*(दिव्य कुरआन, २:२५६-२५७)*

वरील आदेश अगदी स्पष्ट आहेत परंतु ही ईशवाणी (आदेश) ज्या परिस्थितीत अवतरित झाले ते आपण अभ्यासल्यास मुद्दा आणखी स्पष्ट होतो. मदीना शहरात ही रूढीपरंपरा होती की ज्या स्त्रीचे मूल जीवंत राहत नसतील तर ती नवस करीत असे. नवस असा होता की मूल जीवंत राहिल्यास त्याला यहूदी बनविले जाईल. अशा पध्दतीने मदीन्यात अनेक मुलं यहुदी बनली होती. जेव्हा हि. स. ४ मध्ये पैगंबर मुहम्मद (स.) यांनी बनी नजीर या टोळीच्या खोडसाळ कारवाया पाहून त्यांना तडीपार केले तर त्यांत ती मुलेसुध्दा होती ज्यांना मदीनावासियांनी नवसापोटी यहुदी बनविले होते. मदीनावासी (अन्सार) लोकांनी त्या वेळी सांगितले की आम्ही आमच्या मुलांना बनी नजीर नामक यहुदी लोकांच्या स्वाधीन

करणार नाही. आम्ही त्यांना यहुदी यापूर्वीच बनवले होते. परंतु आता आम्ही विश्वधर्म इस्लामचा स्वीकार केला आहे. तर आम्ही आमच्या मुलांना त्या यहुदींच्या स्वाधीन करणार नाही आणि त्यांना इस्लाम धर्म स्वीकारण्यास भाग पाडू. या स्थितीत मार्गदर्शन करण्यासाठी 'धर्मात जोर जबरदस्ती नाही' हा आदेश अवतरित झाला. त्या मुलांना बळजबरीने मुस्लिम बनवू नका कारण धर्मात जोरजबरदस्ती नाही. या संदर्भात खालील खुलासासुध्दा आहे,

कोणत्याही व्यक्तीला इस्लामचा स्वीकार करण्यास बळजबरीने भाग पाडू नका. कारण इस्लामची शिकवण ही अगदी सरळ आणि सुलभ आहे. विवेकपूर्ण आणि सत्याधिष्ठित आहे. म्हणून कुणालाही विवश करण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. अल्लाहने ज्याला मार्गदर्शनासाठी निवडले आणि ज्याने सत्य जाणून घेण्यास आपले हृदय खुले ठेवले. तो आपल्या सद्‌विवेकाने अभ्यासांति आणि अनुभवांति इस्लामचा स्वीकार करतो. ज्याच्या ऐकण्यावर आणि पाहण्यावर मोहर लावली गेली असेल अशांना बळजबरीने धर्मात आणण्याचा काय तो उपयोग?'' वरील संदर्भानुसार आणखी एक खुलासा खाली आला आहे.

''अल्लाहने इस्लाम स्वीकारण्यासाठी जोरजबरदस्ती करण्यास मनाई केली आहे. परंतु याला मनुष्याच्या निर्णयावर सोडले आहे. जर अल्लाहला या जगात सर्वांना मुस्लिम करावयाचे असते तर त्याला तसे करण्यास अवघड काहीच नव्हते. मग तू काय लोकांना जोरजबरदस्ती करील? अल्लाहला जर समस्त मानवजातीला जोरजबरदस्तीने मुस्लिम बनवावयाचे होते तर अल्लाहने स्वत: लोकांना जोरजबरदस्तीने मुस्लिम बनविले असते. परंतु अल्लाहने असे केले नाही आणि सर्वकाही लोकांवर सोडून दिले आहे.''

अशाच प्रकारे इमाम राजी यांचा खुलासा खालीलप्रमाणे आहे,

''अल्लाहने इस्लामचा मामला जोरजबरदस्तीवर नव्हे तर व्यक्तीच्या स्वातंत्र्यावर आणि निर्णयावर सोडला आहे. अल्लाहने कुरआनमध्ये अश्रध्दावंतांना एकेश्वरत्व स्वीकारण्यासाठी पुराव्यानिशी अगदी स्पष्ट व तपशीलासह समजावून सांगितले आहे. त्यामुळे अनेकेश्वरवादींना आपल्या अनेकेश्वरत्वावर कायम रहाण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. अशा स्थितीत तो अनेकेश्वरवादी एकेश्वरत्वाचा स्वीकार करत नाही तर त्याला बळानेच सत्य स्वीकार करण्यास भाग पाडले पाहिजे. परंतु हे जग परीक्षा स्थळ आहे असे करणे योग्य नाही. कारण बळाने विवश करणे परीक्षा घेण्याच्या तत्वालाच संपवून टाकते. अल्लाहने कुरआनमध्ये स्पष्टोक्ती केली आहे, ''आता ज्याला हवे त्याने श्रध्दावंत बनावे आणि ज्याला हवे त्याने श्रध्दाहीनतेवर कायम राहावे.'' तसेच दुसऱ्या ठिकाणी स्पष्ट केले आहे, ''तुझा पालनकर्ता समस्त मानवजातीला श्रध्दावंत बनविण्यास समर्थ आहे त्याने तसे इच्छिले असते तर तसे केले असते. मग काय तू लोकांना श्रध्दावंत बनण्यास विवश करणार?''

**धर्मप्रचार (तबलीग)** - वस्तुत: युध्दासंबंधी आणि जिझियासंबंधी कुरआनंचा आदेश "धर्मात जोर जबरदस्ती नाही" या आदेशा विरुध्द मुळीच नाही. परंतु इस्लामने परंपरागत चालत आलेल्या बेलगाम युध्दाच्या आणि जिझिया कराच्या पध्दतीला नियंत्रित केले. प्रारंभी मुस्लिम हे निर्बल होते. त्यांच्यामध्ये युध्द करण्याची पात्रता आलेली नव्हती. म्हणून जगातून उपद्रव अत्याचार व अन्याय नष्ट करण्यासाठीचे सामर्थ त्यांच्यात नव्हते. त्या काळी ते फक्त एकेश्वरत्व पैगंबरत्व आणि परलोकत्वाची शिकवण लोकांना देत असत. तसेच नमाज कायम करण्याची शिकवण देत होते. व्यभिचार, चोरी, संततीची हत्या बद्दल तोंडी सांगत असत आणि अशा दुराचारांचा द्वेष करीत होते. परंतु जेव्हा मस्लिमांनी सामर्थ्य प्राप्त केले तेव्हा त्यांच्यात इस्लामी शिकवणीला आचरणात आणण्यासाठीची पात्रता आली. धार्मिक स्वातंत्र्य आबाधित ठेवून म्हणजे कुणालाही जोरजबरदस्तीने मुस्लिम बनविले जाणार नाही. परंतु हा निर्णय घेण्यात आला की जिथे शक्य आहे तिथे लोकांना दुराचारापासून, अत्याचार व अन्यायापासून, हिंसाचार व उपद्रवापासून रोखले जाईल. त्यांना हा अनाचार करण्यास मुळीच परवानगी दिली जाणार नाही. तेव्हाच सदाचाराचे क्षेत्र आणि दुराचाराला प्रतिबंध करण्याचे क्षेत्र वेगवेगळे झाले. दुराचाराला प्रतिबंध करताना धर्म प्रसार-प्रचार कार्यासोबत तलवारसुध्दा सामील झाली. या इस्लामी तलवारीने जगातून दुराचाला व उपद्रवाला समूळ नष्ट करण्याचा विडा उचलला, जग या कार्यासाठी तयार होवो अथवा न होवो परंतु या कार्यात (दुराचाराचा प्रतिबंध) धर्मात जोरजबरदस्ती नाही हे तत्त्व नेहमीच कार्यरत राहिले.

आपण वर पाहिलेच आहे की इस्लामच्या दोन प्रकारच्या अवस्था आहेत. एका अवस्थेत इस्लाम अल्लाहचा विधीनियम आहे तर दुसऱ्या अवस्थेत सदाचाराकडे आणि ईशपरायणतेकडे इस्लाम एक वैश्विक आवाहन आहे. पहिल्या अवस्थेचा हेतु जगात शांती स्थापित करणे हा आहे. विश्व शांतीला अत्याचारी आणि दुराचारी लोकांच्या हस्ते बरबाद होण्यापासून सुरक्षित ठेवणे तसेच मानवतेच्या अटींचे उल्लंघन होऊन न देणे आहे. यासाठी सामर्थ्य व बळाचा वापर करणे अनिवार्य आहे. परंतु दुसऱ्या अवस्थेमध्ये इस्लाम मनस्थितीला प्रगत करणारा, आत्म्यांना पवित्र करणारा व नैतिकतेच्या उच्च स्थानी नेऊन सोडणारा आहे.

दुसऱ्या अवस्थेत इस्लाम मनुष्याला चारित्र्यसंपन्न बनवितो ज्याच्यासाठी तलवारीची धार नव्हे तर मार्गदर्शनरूपी प्रकाश आणि मनाचे पावित्र्य अपेक्षित आहे. डोक्यावर तलवार टांगती ठेवून जोर जबरदस्तीने एखाद्याला मुस्लिम बनविले तरी तो मनाने तयार होत नाही. असा जबानी (तोंडी) स्वीकार इस्लामसाठी निकामी आहे. सत्य धर्माचे तर सोडा, परंतु जगातील इतर चळवळींबाबतसुध्दा हाच नियम लागू आहे. भौतिक उद्देश प्राप्त करण्यासाठी च्या

चळवळीतसुध्दा तोंडी स्वीकार करणाऱ्या सदस्यांवर भरोसा करीत नाहीत कारण मनापासून ते चळवळीत सहभागी नसतातच! बोलघेवडे, टपोरी आणि वरवरचा विश्वास दाखविणाऱ्यांना बरोबर घेऊन जगातील कोणतीच चळवळ आजपर्यंत यशस्वी झालेली नाही. मग विचार करा की अशांचे तिथे काय काम की-ज्या धर्मांचा उद्देश याजगात आणि पारलौकिक जीवनात अशा दोन्ही जगात मनुष्याचे कल्याण करणे आहे. इस्लाम श्रध्दाशीलतेला आणि संकल्प यांना आचरणाचे मूळ स्त्रोत मानतो. इस्लाम धर्म या जगात मानवतेच्या कल्याणासाठीची चळवळ घेऊन उभा ठाकला आहे. या इस्लामी चळवळीने जे यश संपादन केले आहे ते आजपर्यंत जगातील कोणत्याच चळवळीला साध्य करता आले नाही. काय शक्य आहे की आपले प्रचार–प्रसारकार्य तलवारीच्या मुक्या भाषेवर सोपविण्यात इस्लाम धन्य होईल? इस्लामला हे कसे शक्य होते की सदाचाराऐवजी दुराचाराचा आधार घेऊन बसावे? ज्यांची मने ईशपरायणतेपासून निकामी आहेत आणि ज्यांचा विश्वास तलवारीच्या टोकावर आहे, अशा अनुयायींवर इस्लाम कसा विश्वास ठेवील? फक्त जीव वाचविण्यासाठी अश्रध्दावान बनने जे पसंत करतात त्यांना इस्लाम कसा कबूल करेल? जर असे असते तर इस्लामने जगात जी क्रांती घडवून आणली आणि जे यश प्राप्त केले ते कसे शक्य आहे ?

मनुष्याच्या नैसर्गिक स्वभावाला त्याच्या निर्मात्यापेक्षा जास्त कोण बरे जाणू शकतो? अल्लाहने आपल्या बलशाली आणि समृध्दशाली वाणीमध्ये अनेक ठिकाणी याचे स्पष्टीकरण केलेले आहे आणि अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांना दाखवून दिले की लोकांची मने जिंकण्यासाठी प्रभावशाली पध्दत कोणती आहे. कुरआन एके ठिकाणी याविषयी स्पष्टोक्ती करत आहे,

"आणि हे पैगंबर (स.) भलाई आणि दुष्टता एकसमान नाहीत. तुम्ही दुष्टतेचे त्या भलाईद्वारे निरसन करा जी अत्युत्तम असेल. तुम्ही पाहाल की तुमच्याशी ज्याचे शत्रुत्व होते, तो जिवलग मित्र बनला आहे. हा गुण लाभत असतो त्या लोकांना जे संयम बाळगत असतात आणि हे स्थान प्राप्त होत असते त्या लोकांना जे मोठे भाग्यवान असतात."

*(दिव्य कुरआन, ४१:३४-३५)*

'सूरह आले ईमरान' या अध्ययात सांगितले गेले,

" हे पैगंबर (स.) ही अल्लाहची मोठी कृपा आहे की तुम्ही या लोकांसाठी फार कोमल स्वभावी ठरला आहात. एरवी जर तुम्ही एखादेवेळी शीघ्र कोपी स्वभावी व निष्ठूर असता तर हे सर्वजण तुमच्यापासून विभक्त झाले असते. यांचे अपराध माफ करा, यांच्यासाठी क्षमेची प्रार्थना करा." *(दिव्य कुरआन, ३:१५९)*

आणखी एके ठिकाणी इस्लामच्या प्रसार प्रचाराची रीत दाखवून दिली आहे -

''हे पैगम्बर (स.) आपल्या पालनकर्त्याच्या मार्गाकडे आमंत्रित करा मुत्सद्देगिरीने व उत्तम उपदेशासहित, आणि लोकांशी विवाद करा अशा पध्दतीने जी उत्तम असेल. तुमचा पालनकर्ता अधिक उत्तम जाणतो की कोण त्याच्या मार्गापासून भ्रष्ट झाला आहे आणि कोण सरळ मार्गावर आहे.' (दिव्य कुरआन, १६:१२५-१२६)

या मृदुभाषी आणि मधुर संदेशबाबत इथपर्यंत ताकीद केली गेली आहे की अनेकेश्वरवादींच्या उपास्यांना आणि त्यांच्या म्होरक्यांना अपशब्द वापरण्यासुध्दा मनाई केली आहे.

''(आणि हे मुस्लिमांनो), हे लोक अल्लाहशिवाय ज्यांचा धावा करतात त्यांचा उपहास करू नका, एखादे वेळेस असे होऊ नये की ते अनेकेश्वरत्वाच्या पुढे जाऊन अज्ञानामुळे अल्लाहचा उपहास करू लागतील.'' *(दिव्य कुरआन, ६:१०८)*

**मार्गदर्शन व मार्गभ्रष्टतेचे गुपित (रहस्य)** - कुरआनमध्ये अल्लाहने अनेकदा अनेक प्रसंगी बारीक सारीक प्रश्नांची उकल केली आहे. अल्लाहने ठरविले असते तर आपल्या सर्व दासांना श्रध्दावंत बनून सोडले असते. परंतु अल्लाहला अशा विवशतेची श्रध्दा अपेक्षित नाही. अशा प्रकारचा श्रध्दाशील गट (दूतांचा) त्याच्याकडे पूर्वीपासून आहे. परंतु अल्लाहला अशा निर्मितीची अपेक्षा होती की जी अल्लाहच्या सामर्थ्यावर आणि बळावर त्याची भक्ती करणारी नसावी तर आपल्या सद्विवेक बुध्दीने त्यांनी ईश्वराला ओळखावे. त्याची भक्ती आणि आज्ञापालन करण्यासाठी स्वतंत्रपणे विचार करावा. ईशआदेशाचे पालन करावे. आदेशाला अमान्य करण्याचे स्वातंत्र्य असूनसुध्दा त्याचे आज्ञापालन करावे. ह्याच हेतुसाठी अल्लाहने मनुष्याला निर्माण केले आहे आणि त्याला स्वातंत्र्य दिले की त्याने अल्लाहने दिलेल्या जीवनपध्दतीनुसार जीवन जगावे अथवा जगू नये. निर्णय त्याच्या अक्कल हुशारीवर सोडून दिलेला आहे. त्याने श्रध्दा ठेवावी अथवा ठेवू नये. अल्लाहने वेळोवेळी जगात पैगंबर पाठविले की त्यांनी लोकांना सत्य आणि असत्य स्पष्ट करून द्यावे. मनुष्याला सांगण्यासाठी बहाणा शिल्लक राहू नये की मी तर अंधारात होतो मला प्रकाश दाखविणारा कोणीही नव्हता. अल्लाहने एक हिशेबाचा दिवस निश्चित करून ठेवला आहे. ज्यांनी स्वतःच्या सद्विवेकबुध्दीने अल्लाहला जाणून घेतले आणि स्वतःच्या मर्जीने अल्लाहच्या सरळमार्गाने जीवन व्यतित केले आणि विवशता म्हणून नव्हे तर स्वतःचे कर्तव्य समजून अल्लाहचे आज्ञापालन केले, अशा लोकांना अल्लाह स्वर्गातील देणग्यांनी उपकृत करील. त्या लोकांवर प्रकोप होईल ज्यांनी सर्व संकेत व निशाण्या पाहूनसुध्दा मार्गभ्रष्टता स्वीकारली. त्याने अवतरित केलेला संदेश (इस्लाम) स्वीकारण्यास नकार दिला आणि अल्लाहच्या आदेशांचे उल्लंघन केले. पाहा या रहस्याला अल्लाहने किती सुंदरतेने उलगडून सांगितले आहे,

"नि:संशय जर तुझ्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर सर्व माणसांचा एक समुदाय बनविला असता. परंतु आता तर ते विभिन्न पध्दतीवरच चालत राहतील आणि पथभ्रष्टते पासून केवळ तेच लोक वाचतील ज्यांच्यावर तुझ्या पालनकर्त्याची कृपा आहे. याच (आवडी निवडीच्या स्वातंत्र्य आणि परीक्षे) साठी तर त्याने त्यांना निर्माण केले होते. आणि तुझ्या पालनकर्त्यांचे ते वचन पूर्ण झाले जे त्याने प्रतिपादिले होते की मी नरकाला जिन्न आणि माणसे या सर्वांनी भरून टाकीन." *(दिव्य कुरआन, ११:११८-११९)*

कुरआनमध्ये दुसऱ्या ठिकाणीसुध्दा या रहस्याला सुंदरतेने उलगडून दाखविले आहे.

"जर तुझ्या पालनकर्त्याची इच्छा अशी असती की (पृथ्वीतलावर सर्व श्रध्दावंत व आज्ञाधारकच असावे) तर सर्व भूतलवासी यांनी श्रध्दा ठेवली असती."

*(दिव्य कुरआन, १०:९९)*

"जर अल्लाहने इच्छिले असते तर या लोकांनी अनेकेश्वरत्व केलाच नसता."

*(दिव्य कुरआन, ६:१०७)*

"आम्ही इच्छिले तर आकाशातून अशी निशाणी उतरवू शकतो की यांच्या माना त्यापुढे नमतील." *(दिव्य कुरआन, २६:४)*

"जर तुझ्या पालनकर्त्याची इच्छा अशी असती की (पृथ्वीतलावर सर्व श्रध्दावंत व आज्ञाधारकच असावेत) तर सर्व भूतलवासी यांनी श्रध्दा ठेवली असती. मग तू लोकांना भाग पाडशील का की ते श्रध्दावंत बनतील? ....कोणताही जीव अल्लाहच्या आज्ञेविना श्रध्दा ठेवू शकत नाही, आणि अल्लाहचा प्रघात असा आहे की जे लोक बुध्दीचा उपयोग करीत नाहीत, तो त्यांच्यावर मार्ग भ्रष्टता टाकून देतो." *(दिव्य कुरआन, १०:९९-१००)*

"हे पैगम्बर (स.) तुम्हाला जो हवा आहे त्याला तुम्ही मार्गदर्शन करू शकत नाही परंतु अल्लाह ज्याला इच्छितो त्याला मार्गदर्शन करतो आणि तो त्या लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो, जे मार्गदर्शन स्वीकारणारे आहेत." *(दिव्य कुरआन, २८:५६)*

या सृष्टीचा निर्माता आणि मालक स्वत: इच्छित नाही की आपल्या दासांना आपली भक्ती करण्यास व आज्ञाधारकता स्वीकारण्यास विवश करावे. अल्लाह आपल्या दासाना स्वतंत्ररित्या आणि भक्ती करण्यास विवश न करता त्यांच्या मनावर निर्णय सोडतो. तर मग एखाद्या दासाला हा हक्क कसा पोहचतो की त्याने अल्लाहच्या दुसऱ्या दासांवर सक्ती करून आणि बळजबरीने अल्लाहची भक्ती (इस्लाम) थोपवावे. हा मूल्यहीन नजराना अल्लाहच्या हुजुरात काय कामाचा? ह्याच कारणासाठी अल्लाहने पैगंबर मुहम्मद (स.) यांना

अनेकदा समजावून सांगितले की इस्लाममध्ये जोरजबरदस्ती नाही. तुम्हाला फक्त इस्लामचा संदेश, ही ईशवाणी अल्लाहच्या दासांपर्यंत पोहचविणे आहे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"हे पैगंबर (स.) ज्या गोष्टी हे लोक बनवीत आहेत, त्यांना आम्ही चांगलेच जाणतो, आणि तुमचे काम यांच्याकडून जबरीने म्हणणे मान्य करविणे नव्हे. फक्त तुम्ही या कुरआनद्वारे त्या प्रत्येक माणसाला उपदेश करा जो माझ्या ताकीदीला भीत असेल."

*(दिव्य कुरआन, ५०:४५)*

"हे पैगम्बर (स.) तुम्ही उपदेश करीत राहा, तुम्ही केवळ उपदेशच करणारे आहात, यांच्यावर जबरदस्ती करणारे नाहीत. तथापि जो इसम विमुख होईल आणि इन्कार करील तर अल्लाह त्याला कठोर शिक्षा देईल. या लोकांना परतावयाचे आमच्याकडे आहे, मग त्यांचा हिशेब घेणे आमच्याकडेच आहे." *(दिव्य कुरआन, ८८:२१-२६)*

"मग तू लोकांना भाग पाडशील का की ते श्रध्दावंत बनतील? कोणताही जीव अल्लाहच्या आज्ञेविना श्रध्दा ठेवू शकत नाही." *(दिव्य कुरआन, १०:९९-१००)*

"हे नबी (स.) लोकांना सरळ मार्गावर आणण्याची जबाबदारी तुमच्यावर नाही. अल्लाह ज्याला इच्छितो त्यालाच मार्गदर्शन प्रदान करतो." *(दिव्य कुरआन, २:२७२)*

"कोणत्याही परिस्थितीत तुमचे काम फक्त संदेश पोहचविणेच होय आणि हिशेब घेणे आमचे काम आहे." *(दिव्य कुरआन, १३:४०)*

**इस्लामच्या प्रचारात तलवारीचा हिस्सा** - वरील विवेचनावरून हे अगदी स्पष्ट झाले आहे की इस्लामचा स्वीकार करण्यासाठी कुणालाही बळजबरी केली जात नाही. सदाचाराचा मार्ग आणि दुराचाराचा मार्ग (सत्य व असत्य) स्पष्टपणे समोर मांडलेले आहे. ज्याला हवे त्याने त्याचा स्वीकार करावा अथवा करू नये. एखाद्याने वाम मार्गाला स्वीकारून विनाशाच्या खाईत कडेलोट व्हावे किंवा सरळ मार्गावर चालून शाश्वत यश प्राप्त करावे. परंतु येथे हे स्पष्ट करावेसे वाटते की इस्लामच्या प्रचारकार्यात तलवारीचा संबंध मुळीच नाही असे म्हणता येत नाही. इस्लामचा प्रचारकार्यात (तबलींग) तलवारीचे काही महत्त्व नाही आणि उपयोगही नाही परंतु तबलीग (धर्मप्रचार) बरोबर आणि काही गोष्टींमुळे इस्लामचा प्रचार होतो तिथे तलवारीचे महत्त्व काहीसे आहे.

जेव्हा मनुष्य अनिर्बंध जीवन जगतो तेव्हा तो त्याच्या मनोकामनापूर्तीसाठी नैतिक बंधन पाळत नाही. तो वासनेच्या आहारी जाऊन एक बेलगाम जीवन जगतो. त्याला वैध अवैधतेची जाण राहत नाही. अशा बेबंद मनुष्याला व्याख्यानं, प्रवचनं अथवा उपदेश करण निरर्थक आहे. त्याच्या डोळ्यांवर, कानांवर आणि मनावर मोहर लागलेली असते.

त्याला कितीही नैतिकतेचे धडे द्या ते सर्व उलट्या घड्यावर पाणी! परंतु नैतिकतेच्या शिकवणीला जेव्हा सामर्थ्यांचे आणि बळाचे सहाय्य प्राप्त होते तेव्हा हाच मनुष्य हळू हळू सदाचाराकडे येऊ लागतो. सदाचार आणि दुराचारातील फरक त्याला कळू लागतो. मर्यादाचे उल्लंघन त्याच्या कडून सहसा होत नाही. अशा अनिर्बंध समाजाचे उदाहरण आपण घेऊया की जिथे न्याय आणि कायदा कानून नावाला मात्र शिल्लक नाही. लूटमार चहुकडे सर्रास चालू आहे. वासनांची पूर्ती कशाही प्रकारे केली जाते. वैध आणि अवैधतेला येथे स्थान नसते. अशा समाजाचे ध्येय आपल्या इच्छा आकांक्षाची आणि वासनांची पूर्ती करणे हेच असते. अशा ठिकाणी कोणी व्याख्यानाने अथवा उपदेशाने नैतिकतेचे आणि सदाचाराचे धडे देत असेल तर त्याचा काय उपयोग? काय हा अनिर्बंध समाज नैतिकतेच्या आणि सदाचाराच्या बंधनात स्वखुशीने स्वत:ला अडकून घेईल? अजिबात नाही! जगात असे पवित्र आत्मे फार थोडे आहेत (अत्यल्प) जे सदाचाराला स्वखुशीने आत्मसात करतात आणि दुराचाराला वाईट समजून त्याचा त्याग करतात.

परंतु जर तो फक्त उपदेश करणाराच नाही तर सामर्थ्यवानसुध्दा आहे. आणि देशाची शासन सत्ता त्याच्या हातात आहे. आपल्या शासन–सत्तेच्या आणि बळाच्या साह्याने तो समाजात सदाचाराचा आदेश देऊ शकतो आणि दूरचाराचा प्रतिबंध करू शकतो. अनिर्बंध समाज हा एक सदाचारी समाजात परिवर्तीत होतो. अरबांच्या अनिर्बंध समाजाला एक सदाचारी, शिस्त प्रिय समाजात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी परिवर्तित केले. हे एक ऐतिहासिक सत्य आहे. इस्लामच्या प्रचारकार्याला प्रभावीपणे यशस्वी करण्यासाठी हीच अपेक्षा आहे. एकेश्वरत्व, प्रेषित्व आणि परलोकत्वाचेच धडे लोकांना ऐकवत गेले तर शैतानी शक्ती येथे जास्त प्रमाणात विरोध करणार नाही. इस्लाम एक श्रध्दाच फक्त नव्हे तर एक विधी विधान आहे आणि असा कायदा जो मनुष्याच्या जीवनाला नियंत्रित करतो. इस्लामच्या श्रध्देला अत्याचारी लोकांचा इतका विरोध नाही जितका त्याच्या विधी नियमांना आणि इस्लामी कायद्याला आहे. तो चोरी करू पाहतो तर इस्लाम त्याचे हात कापण्याची धमकी देतो. तो व्यभिचार करू पाहतो तर इस्लाम त्याला कोडे (फटके) मारण्याची शिक्षा देतो. तो व्याज खाऊ इच्छितो तर इस्लाम त्याविरुध्द युध्द करण्याची धमकी देतो. तो वैध आणि अवैधतेच्या जाळ्यात अडकू इच्छित नाही, तर इस्लाम त्याला त्याच्या मनोकमानेच्या व वासनेच्या आहारी जाऊ देत नाही. अशा मनोविकारी आणि वासनेच्या आहारी गेलेल्या माणसाचे मन दुराचाराने गंजून जाते. तो इस्लामच्या सदाचाराचा स्वीकार करूच शकत नाही.

पैगंबर मुहम्मद (स.) सतत १३ वर्ष अरबांना इस्लामचे निमंत्रण देत होते.

व्याख्यानं, प्रवचनं व उपदेशाद्वारे प्रभावीपणे समजून सांगत होते. पुरावे सादर केले, अल्लाहतर्फे चमत्कार दाखविले आणि आपल्या स्वत:च्या चारित्र्याने आणि पवित्र जीवनाद्वारे लोकांसमोर सदाचाराचा एक आदर्श नमूना ठेवला. त्यांनी सदाचाराचे सर्व मार्ग वापरून त्यांना इस्लामचे आव्हान केले. तरी अरब राष्ट्राने त्यांच्या आवाहनाकडे गांभीर्याने पाहिले नाही आणि सत्य मान्य करण्यास नकार दिला. सत्य त्यांच्या पुढे सूर्यप्रकाशासारखे स्पष्ट करण्यात आले होते. सत्य मार्गावर चालण्याचे प्रात्यक्षिक त्यांच्या समोर पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या रूपात हजर होते. त्यांना त्यांच्या अनिर्बंध जीवनातील हौसमौज त्यागून तसेच चंगळवादाला सोडचिट्ठी देऊन नियंत्रित जीवन जगणे अशक्य होते. प्रवचनं, व्याख्यानं आणि उपदेशांच्या असफलतेनंतर इस्लामने हातात 'तलवार' घेतली. (सत्ता आणि सामर्थ्याचा या कामी उपयोग सुरु केला). त्यावेळी मजबूत-इस्लामी शासन स्थापन झाले. नैतिक कायदे बलपूर्वक अमलात आणले गेले. दुराचाराला आणि स्वैराचाराला समूळ नष्ट केले. हळू हळू लोकांच्या मनावर दुराचाराचा बसलेला गंज दूर होऊ लागला. मनुष्य सत्याला स्वखुशीने कबूल करू लागला. लोकांच्या मनावर दुराचाराचा बसलेला गंज हळूहळू खरडून दूर केला गेला.

अरब राष्ट्राप्रमाणे इतर राष्ट्रांनीसुध्दा इस्लाम स्वीकारण्यास सुरुवात केली. एक शतकाच्या आत एक चतुर्थांश जग मुस्लिम बनले. इस्लामच्या 'तलवारी' ने (इस्लामी शासन) त्यांच्या दुराचारी शासनाला उलटून दिले आणि त्या जागी सदाचारी शासन व्यवस्था स्थापित केली. इस्लामला एक जीवनपध्दती म्हणून आचरणात आणून जगाला दाखवून दिले की मनुष्याच्या चारित्र्य संवर्धनासाठी, भौतिक व नैतिक प्रगतीसाठी इस्लामी जीवनपध्दतीपेक्षा दुसरी पध्दत सक्षम नाही. इस्लामच्या प्रचारकार्यात तबलीग (प्रचार-प्रसार) आणि इस्लामी शासन (तलवार) दोन्ही महत्त्वाचे अंग आहेत. तलवार प्रथम जमीन नरम बनवते, नंतर तबलीग (धर्मप्रचार) बी टाकतो आणि सिंचन करतो जेणेकरून फळधारणा होते. आम्हाला जगाच्या इतिहासात कुठेच हे पहावयास मिळत नाही की एखाद्या संस्कृतीत या दोन्ही घटकांचा समावेश नाही. ज्याला मनुष्य स्वभावाची जाण आहे तो या वास्तवतेला नाकारू शकत नाही. समाजाचा आंतरिक बाह्य सुधार करतांना एक स्थिती अशी उद्भवते की आत्मा आणि मनाला आव्हान करण्यापूर्वी शरीर आणि जीव यांना आव्हान करावे लागते.

## प्रकरण ५

# युध्द इतर धर्मांत

मागील प्रकरणात जी काही चर्चा झाली आहे त्याचा संबंध युध्दाच्या नैतिक पैलूशींच फक्त होता. आता आपण पाहू या की युध्दाच्या मानवी सुधार प्रक्रियेत इस्लामने किती मोलाचे कार्य केले आहे. कोणत्याही कार्याचा दोन पध्दतीने विचार केला जातो. पहिला त्याचा उद्देश आणि दुसरा तो उद्देश साध्य करण्यासाठीची प्रक्रिया आणि कार्यप्रणाली. उद्देश वाईट असेल तर त्याला प्राप्त करण्यासाठी कितीही चांगल्या प्रकाराचा उपयोग केला तरी ते वाईटच असते. उद्देश अतिशय चांगला, परंतु साधन मात्र वाईट तर त्यामुळे उद्देश साध्य करण्यात बाधा येते. उदा. एका व्यक्तीचा उद्देश अनाथांचे शिक्षण आणि विधवांना मदत करण्याचा आहे. परंतु त्यासाठी पैसा मात्र चोरीचा वापरला जातो. ह्यात साध्य कितीही पवित्र असेल तरी साधन मात्र अपवित्र असल्याने ती व्यक्ती दुसऱ्या चोराप्रमाणेच कायद्याने गुन्हेगार ठरते. तसेच एखादी व्यक्ती प्रत्यक्षात लोकांना ठगून पैसा कमवू इच्छितो. परंतु लोकांचा विश्वास संपादन करण्यासाठी मशीदीत बसून धर्माची शिकवण देतो. बयानबाजी सतत करतो आणि अधिकांश वेळ अल्लाहच्या उपासनेत घालवितो. बाह्यता त्याचे हे कृत्य पवित्र आहे. त्याचे साधन मात्र चांगले आहे. परंतु साध्य मात्र वाईट आहे ज्याच्यासाठी त्याने बहुरुप्यासारखे हे रूप धारण केले आहे. त्यामुळे लोकांना आणि अल्लाहला धोका देण्याचा डबल गुन्हा ही व्यक्ती करते. हीच स्थिती युध्दाचीसुध्दा आहे. युध्द करण्याचा हेतु जर निर्बल राष्ट्राचे स्वातंत्र्य हिसकावून घेणे, त्यांची संपत्ती लुटणे आणि लोकांना गुलाम बनविणे हेच असेल तर युध्द कीतीही शिस्तबद्दरीतीने जीवहानी न होता, लोक जखमी जास्त न होता तसेच लुटमार न करता लढले तरी ते अत्याचारी युध्द आहे. अशा युध्दाचा हेतु मात्र दुसऱ्यांवर अत्याचार करणे हा आहे. त्याच प्रमाणे युध्दाचा हेतु कितीही चांगला असला आणि युध्द मात्र अत्याचार हिंसाचाराने आणि युध्दअटींची पर्वा न करता लढले गेले तर असे युध्द सत्यासाठी नाही. म्हणून एक सर्वमान्य आणि पवित्र युध्द त्यालाच म्हणावे लागते की ज्याचा उद्देश अथवा साध्य आणि साध्य प्राप्तीसाठी वापरलेले साधन दोन्ही सत्याधिष्ठित असावेत. आतापर्यंत आपण युध्दाच्या हेतुविषयीच पाहिले आहे. आता युध्दाचा दुसरा पैलू (कार्यप्रणाली) वर इस्लामचा काय दृष्टिकोन आहे तो पाहू या. परंतु त्या अगोदर इतर धर्माची युध्दाची पध्दत कशी याकडे एक दृष्टिक्षेप टाकू या. त्या धर्मात युध्द करण्याची परवानगी दिली आहे का? दिली असेल तर त्या युध्दाचा उद्देश आणि साधन इस्लामपेक्षा चांगले आहे की वाईट? तसेच युध्द निषिध्द असेल तर त्या धर्माची शिकवण मानवी स्वभावाच्या सुसंगत आहे की इस्लामी शिकवण सुसंगत आहे? मनुष्य ज्या

धर्मावर श्रध्दा ठेवतो त्याच्या विरुध्द श्रध्देशी तो फार कमी न्याय देऊ शकतो. विशेषत: धार्मिक लोकांमध्ये तर द्वेष आणि संकुचित वृत्तीचे अत्यंत वाईट उदाहरण सापडते. यात त्यांच्या स्वत:च्या धर्माचेसुध्दा नुकसान ते आपल्या हाताने करतात. दुसऱ्या धर्माच्या वाईट वृत्तीचा (तथाकथित) शोध घेवून त्यांना उघड करणे व त्या धर्माच्या चांगल्या बाजूला झाकून ठेवणे हा सत्यापर्यंत पोहचण्याचा मार्ग नाही. एका धर्माच्या शिकवणीला योग्य ठरविण्यासाठी तुम्ही दुसऱ्या धर्माच्या शिकवणीला अयोग्य अथवा खोटे ठरवू शकत नाही. तसेच एखादी व्यक्ती हा दावा करते की त्याचाच धर्म सत्य आहे आणि इतर असत्य, तर तो दुसऱ्या धर्मावरच नाही तर खुद्द सत्यावर अत्याचार करतो. सदाचार आणि सत्य थोड्या फार फरकाने चहुकडे (सर्वधर्मात) उपलब्ध आहे. कोणत्याही धर्माच्या बाबतीत पूर्वग्रहदूषित दृष्टी नसावी आपण जगातील चार मोठ्या धर्माचा या विषयी थोडक्यात अभ्यास करू या.

**१) हिंदू धर्म** - हिंदुत्व हा धर्म नाही. धर्माची एक मध्यवर्ती श्रध्दा असते ज्यावर त्या धर्माचा पाया आधारलेला असतो. हिंदु धर्मात अशी श्रध्दा आढळत नाही. हिंदू धर्माच्या चारी वेदांचा आणि गीतेचा आपण या संदर्भात अभ्यास केला तर खालील गोष्टी प्रकर्षाने आपल्या लक्षात येतील.

१) आर्यांची लढाई ही अशा राष्ट्राशी होती ज्यांचे वंश, जात, धर्म, रंग आणि राष्ट्र वेगळे होते. आर्यांनी त्यांच्या देशावर आक्रमण केले होते आणि त्यांच्या जागी स्वत: वसाहत करू पाहात होते.

२) ते आर्य त्या लोकांना पिशाच्य योनीतील समजत आणि त्यांना दास्य, वैश्य, राक्षस किंवा पिशाच्य या वाईट नावाने संबोधन करीत असत. आणि त्यांच्या ह्या शत्रूंना आर्यांनी बरोबरीचा दर्जा दिला नाही.

३) त्यांच्यासमोर युध्दाचा मानवतेच्या दृष्टीने महान असा उद्देश नव्हता. त्यांना धनदौलत हवी होती. आणि याच उद्देशाने ते इतर देशांवर आक्रमण करीत असत.

४) त्यांच्या त्या लढाया ह्यांसाठी होत्या की दुसरे देश हे आर्य नव्हते आणि आर्यांच्या देवीदेवतांची ते पूजा करत नसत. आर्यांचा धर्म हा प्रचारक स्वरुपाचा नव्हता. ते इतर धर्मियांना तुच्छ मानत असत. त्यांचे युध्द तोपर्यंत चालत जोपर्यंत दुसऱ्या देशातील लोक (मूळनिवासी) शुद्र बनून राहात नाहीत. अथवा जंगलात निघून जात नाहीत.

५) वेदमंत्रावरून हे माहीत होत नाही की आर्य आपल्या शत्रूंना युध्दात कशा प्रकारची शिक्षा देत असत. परंतु त्यांच्या मनात शत्रूला महाभंयकर शिक्षा देण्याची इच्छा होती. जिवंत माणसाची कातडी सोलून काढणे, त्याचे तुकडे तुकडे करणे, आगीत जाळणे,

त्याच्या शरीराच्या अवयवांची (मृत) विटंबना करणे, त्याला जिवंत जंगली जनावरांबरोबर भीडवणे, त्याला जनावराच्या कातडीमध्ये शीवून टाकणे, त्याच्या डोळ्यांसमोर त्याच्या मुलाबाळांची हत्या करणे इ. शिक्षा त्यांच्या शत्रूंना त्यांच्या देवतांनी द्याव्यात अशी त्यांची इच्छा होती. ज्यांची अशी मनोमन इच्छा आहे त्यांच्या आचरणाविषयी काय बोलावे?

६) मनुष्य एकदा मेल्यानंतर त्वरित दुसऱ्या रुपात जन्म घेतो (पुनर्जन्म) म्हणून त्याला या जगात ठार करणे काही वाईट गोष्ट नाही. हत्येनंतर पुन्हा तो जन्म घेईल तेव्हा त्याच्या अमरत्वावार हत्येचा डाग नसेल.

७) आत्म्यासाठी शरीराची स्थिती तशीच आहे जशी शरीराला कपड्याची आवश्यकता. एखाद्याच्या शरीराचा त्याच्या आत्म्याशी संबंध तोडणे (हत्या करणे) असेच आहे जसे की जुणे कपडे फाडणे. म्हणून हत्येवर शोक करत बसणे अज्ञान आहे. शोक तेव्हाच केले गेले असते जेव्हा आत्म्याची आणि शरीराची दोघांची ही हत्या केली गेली असती.

८) मनुष्याला एके दिवशी मरणे आहे मग त्याला मारून टाकण्यात काय वाईट आहे. जी अटळ गोष्ट आहे ती होणारच मग ती आमच्या हाताने होवो अथवा निसर्गाच्या हाताने उद्या निसर्ग त्याला मारून टाकणार आहे. मग आज आम्ही त्याला मारले तर काय वाईट केले?

९) ज्याला ज्ञान प्राप्त झाले त्याच्यासाठी सदाचार आणि दुराचाराचे बंधन नसते. त्याच्यासाठी सर्व आचरण एकसारखे बनते. सदाचार आणि दुराचार हा आचारणातील फरक फक्त अज्ञानी लोकांसाठीच आहे.

वरील शिकवणुकीचा नैसर्गिक परिणाम हा आहे की मनुष्याच्या मनात मानवी जीवाची काही किंमत व कदर बाकी राहात नाही. ज्याला वाटले त्याने आपल्या भावाच्या शरीराला जुने कपडे समजून फाडून टाकावे. ज्ञानीजवळ तर कोणताच गुन्हा हा गुन्हा नाही. गीता आणि वेद मध्ये युध्दाचा हेतु मात्र कुठेच सांगितला गेला नाही. युध्दाचा उद्देश अथवा हेतु एक मौलिक प्रश्न आहे. कारण या खतरनाक कृत्याला वैधता फक्त त्याचे पावित्र आणि मानवतेच्या दृष्टीने योग्य हेतूने प्राप्त होऊ शकते. अयोग्य आणि अमानवीय युध्दासाठी कितीही मानवतावादी अथवा पवित्र युध्दप्रणाली वापरली गेली तरी त्यामुळे ते युध्द वैधता प्राप्त करू शकत नाही. या बाबतीत गीतेमध्ये काही एक मार्गदर्शन आलेले नाही. काही ठिकाणी मात्र युध्दाचे उद्देश सांगितले गेले आहेत.

'हे अर्जुन, हे युध्द स्वर्गाचा एक दरवाजा आहे जो तुझ्यासाठी खुला आहे. असा

मौका नशीबवान क्षत्रियाला मिळतो. तू जर धर्मासाठी युध्द करणार नाही तर आपल्या धर्माला आणि इज्जतीला बरबाद करून पाप जमा करील. लोक तुझ्या हेटाळणीचे गीत नेहमीच गातील. ही बदनामी मृत्युपेक्षा वाईट आहे." (२:३२-३४)

येथे धन दौलतीला प्राप्त करणे, प्रतिष्ठा प्राप्त करणे, सत्ता प्राप्ती, बदनामीचे भय, हाच उद्देश मात्र आहे. यात श्रेष्ठ अशा उद्देश अथवा शिकवण नाही. आणि उच्चतम असे नैतिक मार्गदर्शनसुध्दा नाही युध्दाचा उद्देश एकमात्र भौतिकतेकडे झुकलेला दिसतो. मनुशास्त्र हे हिंदुच्या धर्माचे एक उत्तम धार्मिक नियमांचा संग्रह आहे. धर्माच्या इतर ग्रंथातसुध्दा मनुशास्त्राचा मूळ संदर्भ म्हणून उपयोग झाला आहे. मनस्मृतीशिवाय दुसरा ग्रंथ हिंदु धर्माचे नियमांसाठीचा नाही.

"धर्मानुसार आचरण करणारा राजाचे खास कर्तव्य आहे की त्याने प्रदेश पादाक्रांत करावा आणि युध्दा पासून कधीही दूर राहू नये." (मनुस्मृती ११९-१०)

मनुस्मृतीतील अशा अनेक श्लोकांवरून हेच सिध्द होते की युध्दाचा ध्येय आणि उद्देश गीतेत सांगितलेल्या ध्येयाप्रमाणेच आहे. शीलसंपन्नतेच्या (सदाचार) नजरेत बादशाहाच्या साम्राज्यशाही पेक्षा मनुष्याचे रक्त, राष्ट्रांचे स्वातंत्र्य, आणि देशाची शातंता आणि स्थिरता जास्त प्रिय आहे. एखाद्याची मनोकामना पूर्ण करणे शीलसंपन्नतेचे लक्षण ठरत नाही. सदाचार तर समस्त मानव जातीच्या कल्याणासाठी आवश्यक आहे. सदाचार युध्दासारखे विध्वंसक मार्ग तेव्हाच अवलंब करण्यास सांगतो जेव्हा मनुष्याच्या भौतिक, आध्यात्मिक आणि नैतिक जीवनाला विनाशापासून वाचविण्यासाठी दुसरा मार्ग उपलब्ध नसेल. अशा विनाशकारी शक्तीविरुध्द युध्द समस्त मानवजातीची सुटका करण्यासाठी आवश्यक ठरते. ह्या युध्दाच्या तत्वज्ञानांपर्यंत मनुस्मृती आणि हिंदुत्ववेत्यांची नजरसुध्दा गेलेली दिसत नाही. ज्यांनी या विषयी आदर्श वादाचा आसरा घेतला त्यांनी अहिंसेच्या हद्दीपर्यंत मजल मारली.

मनुस्मृतीत युध्दाच्या मर्यादाबद्दल खुलासा आला आहे त्यापैकी एका श्लोकाचे भाषांतर येथे आपण पाहू या,

"सदाचारी मनुष्य अशा माणसाला ठार करणार नाही ज्याचे हत्यार तुटले आहे, आणि जो दु:खी आहे, किंवा अत्यंत अशक्त आहे, किंवा घाबरलेला आहे आणि जो पाठ फिरवून बसेल." (९३:७)

युध्दाच्या अटीं अशा प्रकारे आहेत की पायी चालणाऱ्याला ठार करू नका, ज्याच्या डोक्याचे केस मोकळे झाले तर त्याच्यावर वार करू नका, घाबरलेला, शत्रु दुसऱ्याशी लढत असेल तर इ. यामध्ये नैतिकतेचा मेळ बसत नाही. या सर्व अटींचा विचार

केला तर तो लढूच शकत नाही. याचाच अर्थ असा की या अटी फक्त सांगण्यापुरत्या आहेत. मनुस्मृतीच्या वेळी आर्य आणि अनार्य ही स्थिती नव्हती. अनार्य म्हणजे मूळ निवासी, क्षुद्र, पिशाचा इ. आपले देश सोडून जंगलात गेले होते. त्यामुळे मनुस्मृतीमध्ये हिंदुच्याविषयी नियम सापडतात. मनु म्हणतो,

"ब्रम्हाने आपल्या तोंडातून ब्राम्हणांना, हातातून क्षत्रियांना, कमरेतून वैश्यांना आणि पायातून शूद्रांना जन्म दिला आहे."

"शूद्रासमोर वेद पठण करू नका." (९९:४)

"शूद्राचे जेवण खाऊ नये." (२११:४)

"शूद्राला ठार करण्याची शिक्षा एखादा कुत्रा, मांजर, पाल इ. मारण्यासारखे आहे." (१३२:११)

हिंदू धर्म अस्पृश्यांना किती हीन दर्जाची आणि हिसेंची अमानवीय वागणूक देतो याचे असंख्य दाखले देता येतील. इस्लाम इस्लामेतर लोकांना जे हक्क देतो त्यांना पाहिले तर आकाशा एवढा फरक आढळतो. आजच्या हिंदू धर्मपंडितांचे म्हणणे आहे की वर्ण हे जन्माने नव्हे तर गुणांनी आणि लायकीने ठरते. असे असते तर फार चांगले होते. परंतु हिंदू धर्मशास्त्राच्या ग्रंथात याच्या अगदी उलट चित्र आहे. हिंदु धर्मात जातीवंश 'कर्मा'वर नव्हे तर 'वर्णा'वर ठरते.

## २) यहुदी धर्म

यहुदी धर्म ग्रंथ एक आहे तो म्हणजे 'तौराह'! त्यातून यहुदी धर्माची शिकवण आणि विधी विधान कळते. नंतर अनेक ग्रंथ यहुदी धर्मावर लिहिले गेले. तौरातमध्ये युध्दासंबंधी उल्लेख आलेला आहे आणि ठिकठिकाणी युध्दाचा आदेश दिला आहे.

"बनी इस्त्राईल यांना सांगा जेव्हा तुम्ही यरूणला पार करून किनआनमध्ये दाखल व्हाल तेव्हा तेथील सर्व रहिवाशांना हाकलून द्या. त्यांच्या मुर्तींना तोडा, आणि घडविलेल्या मूर्तींनासुध्दा तोडा. त्यांच्या उंच इमारतींना तोडा, सर्वांना हाकलून द्या आणि त्या जागी तुम्ही वस्ती करा. कारण ती भूमी मी तुम्हाला दिली आहे की तुम्ही तिचे मालक बनून राहावे." (३३:५०-५४)

अशा प्रकारचे युध्दासंबंधीचे तौरातमधील अनेक आदेश पाहिल्यास आपणास कळून येते की युध्दाचा उद्देश दुसरे देश पादाक्रांत करणे, संपत्ती मिळविणे, बळाने दुसऱ्यांना वश करून घेणे हाच आहे. कुरआनमध्ये अल्लाहने स्पष्ट सांगितले आहे,

"पृथ्वीचे वारस माझे श्रध्दावंत दास असतील." *(दिव्य कुरआन, २१: १०५)*

परंतु यहुदींच्या येथे याच्या अगदी विरुध्द आहे. तौरातमध्ये फक्त बनीइस्त्राईल लोकांनाच पृथ्वीचे वारस ठरविले आहे. कुरआन मात्र एखाद्या राष्ट्राला अथवा वंशाला नव्हे तर सदाचारी लोकांना पृथ्वीचा वारस ठरवितो. तौरातमध्ये वारस होण्यासाठी दुसऱ्यांची घरेदारे, धनदौलत, जीव, वित्त व इज्जतीचे स्वत: मालक बनून राहाणे आहे. दुसऱ्याचा नाश करून त्या जागी यहुदींना बसवावे म्हणजे पृथ्वीचा वारस होण्यासारखे आहे. परंतु कुरआनमध्ये एखाद्या राष्ट्राला वारस बनविण्याचा अर्थ हा आहे की अल्लाहने त्या राष्ट्राला सदाचारी राष्ट्र असल्यामुळे आपल्या प्रतिनिधित्वासाठी पृथ्वीवर निवड केली आहे. त्यांच्याकडे अल्लाहने आपल्या पृथ्वीला सुपूर्द केले आहे जेणेकरून त्यांनी जगातून उपद्रवाचा व अत्याचाराचा नायनाट करून त्या जागी सदाचार आणि न्याय स्थापित करावे. तौरातमध्ये एखाद्या भूमीला (देशाला) बळकाविण्यासाठी युध्द करा असे म्हटले आहे. कुरआन असा जुलमी आदेश देत नाही. इस्लामच्या "अल्लाहच्या मार्गात जिहाद करणे" याविरुध्द यहुदींच्या युध्दाचा हेतु आहे. त्यांचा हेतु फक्त दुसऱ्याची जमीन, मालमत्ता बळकावणे हाच आहे आणि इतर वंशावर त्यांच्या वंशाचे, जातीचे श्रेष्ठत्व टिकवणे हाच एकमेव उद्देश यहुदींच्या युध्दाचा आहे.

**युध्दाच्या अटी** - युध्दाच्या अटींबाबत तौरातमध्ये जास्त माहिती मिळत नाही. तौरातचा आदेश युध्दासंबंधीचा अभ्यासल्यास आपणास माहित होते की यहुदी धर्म त्यांच्या शत्रुला दोन प्रकारात विभागतो. एक प्रकार तो ज्याला खुदावंदने बनी इस्त्राईल लोकांच्या मिराशीत दिलेले नाही आणि दुसरे ते ज्यांना यहुदी (बनी इस्त्राईल) यांच्या मिराशीत दिले आहे. दोहोबरोबरचा त्यांचा मामला वेगवेगळा आहे. पहिल्या प्रकारच्या शत्रूसाठी त्याला तह करण्यास सांगावे. त्या शत्रूलोकांनी ऐकले तर त्यांना यहुदींचे गुलाम बनवून ठेवावे. परंतु जर तह मान्य केला नाही तर युध्द करा. सर्व पुरुषांना ठार करावे आणि स्त्रिया आणि बालकांना गुलाम बनवावेत. त्यांच्या धनदौलतीवर कब्जा करावा.

दुसऱ्या प्रकारच्या शत्रूंना मानवी हक्कांपासून वंचित ठेवले आहे. त्यांच्या वस्त्यांना लुटावे त्यांची शेती, व्यापार, धार्मिक स्थळे उद्ध्वस्त करावीत. स्त्री पुरुष, मुले सर्वांना किंबहुना प्राण्यांनासुध्दा ठार करावे. जगात त्यांचे नामोनिशाण बाकी ठेवू नये. त्यांच्याशी कोणताही करार करू नये. आज यहुदी फिलिस्तीन लोकांवर हाच अत्याचार करीत आहेत.

## ३) बौध्द धर्म

वरील दोन्ही धर्मातील युध्दाबद्दलच्या अटी, नियम आणि युध्दाचरण हे इस्लामच्या अगदी विरुध्द आहेत हे आपण पाहिले. काही धर्म असे आहेत की जे युध्द करण्याच्या विरोधात आहेत. हे धर्म इस्लामच्या यासाठी विरोध करतात की इस्लामने जिहादची (युध्द) परवानगी दिली आहे. बौध्द धर्मात याविषयी काय सांगितले आहे ते आपण पाहू या. बुध्दाची शिकवण काय होती या विषयी मूळ स्त्रोत आज उपलब्ध नाही. बुध्दाने त्याच्या आयुष्यात ग्रंथ लिहिला नाही. बुध्दाने स्वत: काही नीती–नियम घालूनसुध्दा दिलेले नाहीत. बुध्दाच्या निकवर्तीय अनुयायींनीसुध्दा बुध्दाच्या शिकवणीचा संग्रह केलेला आढळत नाही. बुध्दाच्या निधनानंतर त्याच्या एकदोन सहकार्यांनी तोंडी व्याख्यानं या संदर्भात दिलेली आहेत. एक शतकानंतर एक धार्मिक समितीचे गठन झाले आणि तेथून नीतीनियम तयार झाले. भिक्षूकांनी मूळ धर्म बदलून टाकला, नीतीनियम बदलून टाकले. प्रथमत: बौध्द धर्मात ईश्वराचे काहीच स्थान नव्हते. परंतु नंतर ईश्वराचे अस्तित्व मान्य करण्यात आले आहे. पूर्वी स्वर्ग नरक ही संकल्पना नव्हती. परंतु आता मात्र सदाचारी हा स्वर्गात जाणार आणि दुराचारी नरकात ही संकल्पना रुढ झाली.बौध्द धर्मात धार्मिक ग्रंथ (मूळ) आज उपलब्ध नाही. नंतरच्या काळात (कनिष्क काळ) म्हणजे इ. स. १ मध्ये काही ग्रंथ लिहिण्यात आले. त्यापैकी तीन ग्रंथ प्रसिध्द आहेत. उदा. विनय गद्य, सुत्रगद्य व तिसरे धम्म ग्रंथ इ.

बौध्द धर्म अहिंसावादी धर्म आहे. मनुष्यापासून ते अतिसुक्ष्म जीवापर्यंत सर्व निषिध्द आहे. बौध्द धर्माचा पाहिला आदेश आहे. "कोणत्याही सजीवाला ठार करू नका." भिक्षुकाला लढाई पाहाण्याचीसुध्दा मनाई आहे. बौध्द मनुष्याला कोणत्या मार्गावर नेतो तसेच या धर्माचा उद्देश काय आहे व उद्देशप्राप्तीसांठी कोणती कार्यप्रणाली बुध्दाने सांगितली आहे? हे आता आपण पाहू या.

वर सांगितल्याप्रमाणे बौध्द धर्म जगातील इतर सर्व धर्मांच्या शिकवणीपेक्षा वेगळा आहे. या धर्मात जो मूळ प्रश्न आहे की मनुष्यनिर्मिती जगात कशासाठी झाली? याकडे दुर्लक्ष करण्यात आले आहे. मनुष्य जीवनाचा उद्देश काय आहे? या प्रश्नाचे उत्तर बुध्द देत नाही. त्यामुळे स्वभावत: जीवनयापण करण्याचा मार्गसुध्दा हा धर्म देत नाही. बुध्दाने मनुष्य जीवनात परिवर्तन का येतात आणि त्यावर विजय मिळविणे कसे शक्य आहे याच बाबींकडे पूर्ण लक्ष दिले आहे. जीवनाच्या इतर क्षेत्राकडे हा धर्म लक्ष देत नाही. बालपण, तारूण्य, म्हातारपण, सद्दढता, निर्बलता, आजारपण, मृत्यु याच बाबींचा उल्लेख आला आहे.

अनेकानेक वर्षे तपस्या केल्यानंतर बुध्दाला ज्ञान प्राप्त होते की आयुष्य हे एक संकट आहे ज्यात मनुष्य पुरता फसला आहे. जन्मापासून मृत्यूपर्यंत जे काही त्याच्या आयुष्यात घडते ते या संकटामुळेच घडते! मनुष्याचा जगात येण्याचा काहीच उद्देश नाही. त्याचे काम फक्त संकटे झेलत राहणे आहे. हे जग त्याच्या वास्तव्याचे ठिकाण नाही. प्रत्येक सुखामागे दु:ख आहे. प्रत्येक जन्मामागे मृत्यू आहे. क्रांती आणि परिवर्तन एक संकट आहे मनुष्य जीवनात!

या संकटात मनुष्य का घेरला गेला आहे? या प्रश्नाचे उत्तर बुध्दाने दिले आहे की आशा आकांक्षा, जाणीव आणि जाणं या संकटामागे कार्यरत आहे. याचमुळे मनुष्य जगात पुन्हा पुन्हा जन्म घेतो. तसेच अनेकानेक जीवनात प्रवेश करतो. वासनेचे हे जोखड जोपर्यंत मनुष्य त्यागत नाही तोपर्यंत तो जन्मानंतर मृत्यू आणि मृत्यूनंतर जन्म या फेऱ्यात अडकून पडतो. मग या पासून सुटका कशी? याचे उत्तर बुध्द एका शब्दात देतो ते म्हणजे "निर्वाण"! हे मनोकामना, वासना, इच्छा आकांक्षा यांना त्यागूनच प्राप्त होणार. जगातील कोणत्याही गोष्टीशी आसक्ती ठेवू नये म्हणजे दुसऱ्यांदा या संकटात मनुष्य सापडत नाही. तो पुन्हा जगात जन्माला येत नाही. निर्वाणापर्यंत जाण्यासाठी जी बुध्दाने शिकवण दिली आहे ती खालीलप्रमाणे -

(१) कुणालाही ठार मारू नका (अनिवार्य ५ बाबी), (२) चोरी करू नका, (३) व्यभिचार करू नका, (४) खोटे बोलू नका, (५) व्यसनाधीन बनू नका, (६) वेळेआधी जेवण करू नका, (७) खेळ, तमाशा, नाचगाण्यापासून दूर राहा, (८) अत्तर, फुल यापासून दूर राहा, (९) आरामदायी आणि नरम अंथरुणापासून दूर राहा, (१०) सोने चांदी जवळ बाळगू नका. हे नंतरचे (६ ते १०) शिकवणी अनिवार्य नाहीत (विनय ग्रंथ)

बौध्द भौतिकतेचा त्याग करणे शिकवतो कारण या धर्माचे अंतिम ध्येय 'निर्वाण' आहे आणि हे ध्येय इंद्रियदमनाशिवाय प्राप्त होऊ शकत नाही. म्हणून 'स्व'चा नाश करण्यासाठी शरीराला अतित्रास देण्यासाठी उपाय सांगण्यात आले आहेत. त्यांचा तपशील येथे देणे शक्य नाही. विनय ग्रंथात तपशील देण्यात आला आहे. बुध्द स्वत: भीक मागत असे. आपल्या अनुयायींना भिक्षु आणि स्वत: ला महाभिक्षु (मोठाभिकारी) म्हणून संबोधत असे.

बौध्द धर्मात अंहिसेला प्रथम स्थान आहे. त्यात अनेक नैतिक धडे देण्यात आले आहेत. काही नैतिकतेचे धडे उत्कृष्ठ आहेत. यात चारित्र्य संपन्नतेवर अधिक भर दिला आहे. बुध्दाने जीवनात स्वत: आचरण करून अनुयायींना एक आदर्श घालून दिला आहे. तरी पण हा धर्म आपल्या ध्येय प्राप्तीत पूर्णपणे अयशस्वी ठरला आहे. या धर्माची मनुष्य जीवनासंबंधीची धारणा चूकीची आहे. एका चुकीच्या ध्येयाला मनुष्य जीवनध्येय ठरविले

आहे. जीवनातील दु:खाच्या मूळ कारणांकडे या धर्माने लक्ष दिले नाही. वरवरची नजर टाकून हा धर्म निर्णयाप्रत येतो. जगाचा त्याग करून फक्त स्वत:च्या मुक्तीसाठी असा मार्ग जो जीवनाच्या मार्गावरून नव्हे तर जीवनबाह्य मार्गाचा स्वीकार करतो. अशी व्यक्ती, कुटूंब, समाज, देश आणि मानवतेची काय सेवा करणार? या जबाबदारींना तो कसा पेलणार? बौध्द धर्माने अहिंसेचा स्वीकार यासाठी केला की जगाचा त्याग आणि सन्यासी वृत्तीमध्ये तलवारीचा उपयोग नाही. हा धर्म अहिंसेचा पुजारी आहे. याचमुळे बौध्द धर्म आपली संस्कृती अथवा ताकत जगात निर्माण करू शकला नाही. दुसऱ्या संस्कृतीवर वर्चस्व प्राप्त करून घेण्यासाठी सामर्थ्यवान बनण्याची कल्पना त्यांना मान्य नाही. हा धर्म जगात एक मजबूत जीवनव्यवस्था स्थापन करू शकला नाही. तरी पण जगात या धर्माचा प्रसार मोठ्या प्रमाणात झाला. जगात या धर्माला आज लोकसंख्येच्या दृष्टीने वरचे स्थान आहे. या धर्माने मात्र जगात काही क्रांती घडवून आणली अथवा मानव इतिहासात श्रेष्ठ कार्याची नोंद केली असे नाही. याउलट जिथे प्रबळ संस्कृतीचा सामना झाला तिथे या धर्माने नेहमीच माघार घेतलेली दिसते. हिंदुस्थान या धर्माची जन्मभूमी आहे. इ. स. पहिल्या शतकात संपूर्ण हिंदुस्थान या धर्माला मानणारा होता. परंतु संस्कृती आणि सामर्थ्य यावर बौध्द धर्माने कधीच लक्ष दिले नाही. समाजातील बिघाड दुरुस्त केला नाही की राज्य स्थापन केले नाही. शासनात भाग घेण्याऐवजी अथवा शासनाला बदलण्याऐवजी जी–हुजुरी करण्यातच धन्यता मानली. अत्याचार सहन करण्याची शिकवण या धर्माची आहे. त्यामुळे अत्याचारी शासन व्यवस्थेत अत्याचार सहन करत राहाणे परंतु शासनाविरुध्द 'ब्र' सुध्दा न काढणे या मानसिकतेतून या धर्माला जगातील बहुतेक देशांनी आश्रय दिला. आपल्या स्वबळावर नव्हे तर इतरांच्या कृपेवर हा धर्म फैलावत गेला.

इस्लामनुसार जगात मनुष्य एका महान कार्यासाठी नियुक्त केला गेला आहे. त्याची मुक्ती या जगाला स्थैर्य व शांती प्रदान करण्यात आहे. या ध्येयासाठी (मानवी कल्याण) त्याला सामर्थ्य अपेक्षित आहे. बौध्द धर्माला मात्र या जगाशी काही एक घेणे–देणे नाही. मनुष्याच्या जीवनाचे काही ध्येय नाही. त्याची मुक्ती जगाचा सन्यास घेण्यात व इंद्रियदमनात आहे. बौध्द धर्म याचमुळे मनुष्याला असे आचरण करण्यास परवानगी देत नाही, ज्यामुळे तो जगात रस घेऊ लागेल. यावरून बौध्द धर्माची अहिंसा मानवतेसाठी जास्त उपयोगी आहे की इस्लामचा जिहाद उपयोगी आहे याचा निर्णय वाचकाला घ्यावयाचा आहे.

## ४) ख्रिस्ती धर्म

हा धर्मसुध्दा इस्लामच्या युध्दासंबंधीच्या धोरणाच्या विरोधात आहे. ख्रिस्ती धर्म म्हणजे तो धर्म नव्हे ज्याची शिकवण पैगंबर ईसा (अ.) यांनी दिली. ख्रिस्ती धर्म तो धर्म आहे जो पैगंबर ईसा (अ.) यांच्या नावाने (ईसायियत) स्थापन झाला आहे. पैगंबर ईसा (अ.) तर इस्लाम घेऊन आले होते, जसे त्यांच्या अगोदरचे सर्व पैगंबर इस्लाम घेऊन आले होते. ईसा (अ.) यांच्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी इस्लाम धर्माची शिकवण दिली. यहुदी धर्माप्रमाणेच या धर्माचा धार्मिक ग्रंथ इंजिल (बायबल) आहे. या ग्रंथाद्वारे पैगंबर ईसा (अ.) यांची शिकवण काय होती याबद्दल माहिती प्राप्त होत नाही तर आजच्या ख्रिस्ती धर्मांची माहिती मिळते. इंजिल हा ग्रंथ चार भागांचा मिळून बनला आहे. मता, मारकस, लुका आणि योहाना आहेत. परंतु पैगंबर ईसा (अ.) यांच्यावर अवतरित नाहीत. ते ईशवाणी अथवा पैगंबरवाणी नाही तर त्यांच्या अनुयायींच्या ग्रंथांचे संकलन आहे ज्यात पैगंबर ईसा (अ.) यांच्या आयुष्याबद्दल आणि शिकवणीबद्दल उल्लेख आहेत. या चारी ग्रंथांपैकी एकही ग्रंथ पैगंबर ईसा (अ.) यांच्याशी जुळत नाही. पैगंबर ईसा (अ.) यांनी काय सांगितले आणि काय न करण्याचा आदेश दिला याबद्दल काही एक सुगावा लागत नाही. चारी ग्रंथात विरोधाभास आहे. हे सर्व ग्रंथ युनानी भाषेतील आहेत. परंतु ईसा (अ.) आणि त्यांच्या अनुयायींची मातृभाषा मात्र सुरयानी होती. भाषेतील विरोधामुळे विचारातील विरोधाभास साहजिक आहे. पुढील विवेचन हे पैगंबर ईसा (अ.) यांच्या शिकवणीनुसार नाही तर आजच्या ख्रिस्ती धर्मानुसार आहे, ज्यावर आज ख्रिस्ती जगत विश्वास ठेवत आहे.

**प्रेमाची शिकवण** - बायबलनुसार ख्रिस्ती धर्म युध्दाच्या सक्त विरोधात आहे, मग ते युध्द सत्यासाठी असो अथवा असत्यासाठी. ईश्वराशी प्रेम करा आणि आपल्या शेजाऱ्याशी प्रेम करा तसेच राग करू नकोस. बायबल येथेच थांबत नाही तर खरा ख्रिस्ती अत्याचारा समोर शरण जातो. दुसऱ्याचे रक्षण तर सोडा स्वतःच्या हक्कांचे रक्षणसुध्दा करू नये अशी शिकवण आहे.

"मी तुम्हा ऐकणाऱ्यांना सांगतो की आपल्या शत्रुशी मैत्री करा जे तुमच्याशी शत्रुत्व ठेवतात. त्यांचे भले करा, जे तुमचा धिक्कार करतात त्यांच्यावर कृपा करा. तुमची जो कोणी बेइज्जती करील त्याच्यासाठी प्रार्थना करा, जो तुमच्या एका गालावर थापड मारील त्याच्यासमोर दुसरे गाल द्या. दुसऱ्याकडून जसे वर्तन तुम्हाला अपेक्षित आहे तुम्ही सुध्दा त्यांच्याबरोबर तसेच करा. जर तुम्ही प्रेम करणाऱ्यांवरच प्रेम कराल तर मग तुमचे उपकार ते काय? कारण गुन्हेगारसुध्दा प्रेम करणाऱ्यांशी प्रेम करतात." (लुका ३२:२६-२७)

**शिष्टाचारासंबंधीचे तत्त्वज्ञान** - ख्रिस्ती धर्म आज जसा आमच्यासमोर आहे त्याला पाहून माहीत होते की हा धर्म सन्यास आणि त्यागाचा धर्म आहे. त्यात मानवी जीवनाच्या व्यवस्थेसाठी काही एक तरतूद केली गेलेली नाही. हा धर्म मानव मानवातील, कुटुंबाचे, समाजाचे, राष्ट्राच्या हक्कासंबंधी मार्गदर्शन करत नाही. व्यावहारिक जीवनासंबंधी अजिबात मार्गदर्शन येथे सापडत नाही. एकाच प्रश्नाभोवती सर्व चर्चा केंद्रित झाली आहे की मनुष्य कशा प्रकारे 'आस्मानी बादशाही'मध्ये समाविष्ट होईल? आणि याच उद्देशप्राप्तीसाठी ख्रिस्ती धर्म अनुयायींना तयार करतो. जगाची बादशाही आणि आस्मानी बादशाही दोन्ही भिन्न आहेत ज्याप्रमाणे अग्नि आणि पाणी! त्यामुळे ध्येयप्राप्तीसाठी भौतिकतेचा आधार घेणे निषिध्द आहे.

"जर कोणी माझ्याजवळ आला आणि आपले आई-वडील, पत्नी, मुलबाळं, भाऊ-बहिणी तसेच आपल्या जीवाचा द्वेष करत नसेल तर तो माझा शिष्य नाही." (लुका ६२:१४)

मनुष्याच्या सुख-समृध्दीसाठी तसेच वैयक्तिक आणि सामाजिक समृध्दीसाठी धनदौलत प्राप्त करणे अत्यावश्यक आहे. परंतु ख्रिस्ती धर्म आध्यात्मिक प्रगतीसाठी आणि आस्मानी बादशाहीसाठी त्याचा त्याग करणे आवश्यक समजतो. दीन (धर्म) आणि दुनिया (जग) दोघांना ही प्राप्त करणे अशक्य आहे. आस्मानी बादशाही (मुक्ती) प्राप्त करण्यासाठी जगाचा त्याग करणे (सन्यास) अत्यावश्यक आहे. मुक्तीचा मार्ग ख्रिस्ती शिष्टाचारसंबंधीची शिकवण आणि तत्त्वज्ञान आहे. जो कोणी त्यावर आचरण करत नाही तो मुक्ती प्राप्त करू शकत नाही. परंतु पुढे हेसुध्दा सांगितले गेले आहे की येशु ख्रिस्ताने सुळीवर चढून तमाम मानवांच्या गुन्ह्यांचा पश्चाताप केला आहे. हे मान्य केल्यावर या धर्माचे शिष्टाचारासंबंधीची शिकवण बेकार ठरते. पश्चातापाचे हे तत्त्वज्ञान मान्य करून मनुष्य जगात चोरी, हत्या, व्यभिचार, शेजाऱ्यावर अत्याचार, दुराचार आणि हरामाची कमाई करूनसुध्दा आस्मानी बादशाही (मुक्ती) प्राप्त करू शकतो. यासाठी मनुष्याने ख्रिस्ताचा अनुयायी बनणे आवश्यक आहे.

शिष्टाचारसंबंधीचे हे तत्त्वज्ञान अवास्तविक आहे. जगात सदाचाराबरोबर दुराचारसुध्दा अस्तित्वात आहे. अशा स्थितीत सदाचाराला निर्बळ करून सोडणे आणि अल्लाहने दिलेल्या सामर्थ्याचा उपयोग सदाचाराचे रक्षण करण्यासाठी न करणे, हे कृत्य आत्महत्याच नाही तर दुराचाराला खतपाणी घालण्यासारखे आहे. अत्याचाऱ्यांना अत्याचार करण्याची मोकळीक दिली जावी हे कोणतेही पुण्यकार्य नाही. सदाचार वास्तविकत : सुधारकतेचे प्रमुख अंग आहे आणि ते प्रेम आणि राजाच्या योग्यमिश्रणाने तयार होते. दुराचार हा प्रेमाने, सबुरीने, सलोख्याचे संबंध ठेवून सदाचारात परिवर्तीत (सुधार) होते तर योग्य आहे. परंतु हे शक्य नसेल तर शासन यंत्रणेद्वारा,

बलपूर्वक अथवा बदल्याच्या भूमिकेतून सुधार घडवून आणणे अत्यावश्यक होते, कारण मूळ उद्देश सुधार घडवून आणणे हा आहे. मनुष्याला ज्या काही शक्ती अल्लाहने बहाल केलेल्या आहेत त्यांचे चांगले आणि वाईट दोन्ही परिणाम आहेत. शरीर सदृढ राहणे हे शरीराचे संपूर्ण अवयव तंदुरुस्त राहून आपापसात समतोल राखणे तसेच आपल्या मर्यादेत राहून कार्य करीत राहणे यावर अवलंबून आहे. याचप्रमाणे मनुष्याच्या वासना इच्छा आकांक्षामध्ये तारतम्य ठेवणे आणि मर्यादेत राहून शरीराच्या प्रत्येक शक्तीला कार्य करण्यास मुभा देणे हे (प्राकृतिक) स्वाभाविक धर्माचे कर्तव्य आहे. हा प्राकृतिक धर्म मनुष्याला मनोव्यापाराच्या आणि जीवनव्यवहाराच्या संतुलनाकडे मार्गदर्शन करतो. ख्रिस्ती धर्माने मात्र जगाचा (भौतिकतेचा) त्याग करून सन्यास स्वीकारलेला आहे आणि मनुष्याचे फक्त अत्याचारित आणि लज्जित बनून राहणे जीवनध्येय आहे. ही तर मानवतेची सेवा नसून मानवतेवर घोर अन्याय आहे. एकीकडे जगात हे अल्लाहने निर्मिलेल्या गोष्टींच्या सुखसुविधांपासून वंचित राहतात तर दुसरीकडे आपले अस्तित्व अर्थहीन ठरवून मानवतेच्या सेवेसाठी निरुपयोगी ठरतात. ख्रिस्ती धर्माने जगाच्या बादशाहीला आसमानी बादशाहीपासून वेगळे केले. त्यामुळे धनदौलतीला सोडून, सत्तेला लाथ मारून फक्त आसमानी बादशाहीचे बनून राहावे. स्वाभाविकपणे सदाचारी लोक जगाचा सन्यास घेऊन दुराचारी, अत्याचारी लोकांच्या ताब्यात जगाचा कारभार देतील. शासन व्यवस्था अत्याचारी व दुराचारी लोकांच्या हातात जाईल व व्यापार उदीम धोकेबाज लोकांच्या हातात येईल. अशा प्रकारे जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात दुराचारी लोकांच्या हातात सत्ता येईल. जगाच्या सुव्यवस्थेला हे सुरुंग लावतील कारण सदाचारी लोकांनी आपले हातपाय कापून एके ठिकाणी ठाण मांडले आहे. अशा स्थितीत जग विनाशाच्या खाईत कडेलोट होणार आणि ह्यासाठी निम्मे जबाबदार सदाचारी असणार कारण जबाबदारीपासून दूर जाऊन या सदाचारी लोकांनी कर्तव्याच्या मैदानातून पळ काढला आणि पूर्ण मैदान दुराचारींच्या स्वाधीन केले होते.

**ख्रिस्ती धर्माची वास्तवता -** ख्रिस्ती धर्मात युध्द आणि राजकारण तसे वर्ज्य आहे. या धर्माच्या शिकवणीवर जगात कोणीही आचरण करू शकत नाही. परंतु या धर्माच्या इतिहासाकडे पाहिल्यास आढळून येते की त्यात शिष्टाचार आणि श्रध्देच्या काही ढोबळ तत्वांशिवाय मानवी हक्कासंबंधी, जीवनपध्दतीसाठी आदेश (शरियत) इ. काहीच आढळून येत नाही. भक्तीचा कोणताच मार्ग निश्चित नाही. हा धर्म नवीन धर्म नव्हता तर मुसावी धर्मस्थापनेसाठी आणि बनी इस्त्राईलमध्ये सुधार करण्यासाठी निर्माण झाला होता. एक शतकापर्यंत बनी इस्त्राईल लोक (यहुदी) समुदाय गुलामीचे जीणे जगत होता. येशु जन्माच्या २० वर्षापूर्वी रोमियानी फिलीस्तीन ताब्यात घेतले आणि मसीह जन्मला तेव्हा संपूर्ण यहुदी रोमचे गुलाम होते. अशा प्रकारे सात आठ शतके यहुदी ईराण, युनानी, रोम यांच्या गुलामीत

होते. त्यामुळे त्या समुदायांत शिष्टाचार, नैतिकता, धार्मिकता, मानवता नावालासुध्दा शिल्लक राहिली नव्हती. बायबलमध्ये यहुदींच्या या नैतिक अध:पतनाचे अनेक दाखले सापडतात. त्या सर्वांचा अभ्यास केल्यानंतर समजते की ख्रिस्ती धर्मात मुसावी धर्माची सर्व तत्वें कायम ठेवली गेली व त्यात फक्त त्यांचे वैशिष्ट्य आणि श्रेष्ठत्व यांची भर घातली गेली.

**ख्रिस्ती धर्मात युध्दाला स्थान नाही** – तौरात ग्रंथात जे आदेश युध्दासंबंधी आले होते त्यांना ख्रिस्ती धर्मात स्थान मिळाले होते. येशुचा काळ हा यहुदींचा गुलामीचा काळ होता. एका गुंडाचा जीव येशुच्या जीवापेक्षा जास्त मौल्यवान समजला जात होता. अशा वेळी येशु प्रारंभी युध्दाचा झेंडा घेऊन उभा कसा होणार होता? आपल्या लोक समुदायाला नैतिक अध:पतनापासून वाचवणे हे त्यांचे प्रथम कर्तव्य होते. समाजसुधार कार्य येशुने हाती घेतले. त्यासाठी अथक प्रयत्न करीत राहिले. या कार्यात शासनाच्या विरोधात न जाण्याची पुरेपूर काळजी घेतली. समाजसुधारणेसाठी हे आवश्यक होते. समाज मन जिवंत करण्यासाठीच्या शिकवणींवर प्रथम भर देण्यात आला होता. गुलामीचे जीवन शेकडो वर्ष जगून समाजमन मृतवत झाले होते. शेवटी येशू जिहाद व युध्दाकडे वळू लागले होते. कधीकधी आपल्या शत्रुंना ठार करण्याची इच्छा बाळगत होते. एके ठिकाणी सांगातात,

"माझ्या त्या शत्रूंना ज्यांना माझी बादशाही नावडती होती. त्यांची येथे आणून माझ्या समोर हत्या करावी."

आपल्या अनुयायींना त्यांनी तलवार बाळगण्याची परवानगी दिली होती तसा उल्लेख लुकामध्ये आलेला आहे.

परंतु मसीह (येशु) यांना समाज परिवर्तनासाठी फक्त अडीच तीन वर्षाचाच अल्प कालावधी मिळाला होता. इतका अल्पकाळ हा अल्लाहच्या मार्गात जिहाद (युध्द) करण्यासाठी पूर्ण समाजाला तयार करण्यासाठी पुरेपूर नव्हता. त्यांच्या अनुयायींची संख्यासुध्दा कमी होती, त्यामुळे रोमविरुध्द ते युध्द करू शकत नव्हते. ईसा (अ.) यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासारखा भरपूर वेळ अनुयायींच्या शिक्षण प्रशिक्षणासाठी मिळाला असता तर त्यांचे अनुयायीसुध्दा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या अनुयायीं (सहाबा) सारखे धैर्यशील योध्दे बनले असते. परंतु ईसा (अ.) यांच्या लोक समुदायाने त्यांना पूर्ण तीन वर्षाचा कालावधीसुध्दा दिला नाही. त्या अल्पकाळात ईसा (अ.) यांनी समाजमन जिवंत करण्याचे काम भरपूर केले. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनाचे मक्केतील प्रथम तीन वर्षातसुध्दा जिहाद युध्द इ.संबंधी उल्लेख मिळत नाही. त्याऐवजी सदाचार, ईशभय, धैयशीलता, सबुरी, ईश्वरावर दृढ श्रध्दा इ. बाबींचा उल्लेख मिळतो. ही शिकवण ईसा (अ.) यांच्या अल्प पैगंबर काळातसुध्दा आपणास दिसून येते.

**ख्रिस्ती आणि यहुदी धर्मसंबंध** - मुसावी शरियतमध्ये प्रेम, करूणा, शेजार धर्माचरण, कृपाशीलता या गुणांची कमी होती. या सर्व गुणांची भर पैगंबर ईसा (अ.) यांनी घातली. धर्मविधीमध्ये लवचिकता आणली आणि यहुदींना तमाम मानवजातीवर प्रेम करण्यास शिकविले. तसेच यहुदीच्या सामाजिक आर्थिक व राजकीय क्षेत्रात सुधार घडवून आणला. यहुदी लोकांचा धनदौलत व जगात जीव होता. ईसा (अ.) यांनी भौतिकतेचा त्याग करण्याची शिकवण दिली. यहुदी लोक क्रूर होते, त्यांना प्रेमाची व करूणेची शिकवण दिली. त्यांना ईशभय आणि ईशआरधनेकडे आमंत्रित केले. दुसरीकडे यहुदी लोकांत धैर्यशीलता आणि संयम हे गुण यावेत यासाठी 'दुसरा गाल पुढे करा'सारखी शिकवण दिली.

**शरियत आणि मसियत** - ईसा (अ.) जगातून अदृश्य झाल्यानंतर अल्पावधित त्यांच्या शिकवणींना पूर्ण नाहीशी केले गेले. सेंट पॉल हे ईसा (अ.) यांच्या निकटवर्तीयांपैकी नव्हे तर त्यांच्या विरोधकांपैकी होते. त्यांनी ईसा (अ.) नंतर ख्रिस्ती धर्माची मूळ शिकवण बदलून टाकली. ईसा (अ.) यांच्या निकटवर्तीय अनुयायींनी (हवारींनी) यास विरोध केला होता. ईसा (अ.) यांची शिकवण यहुदी (बनी इस्त्राईल) लोकांसाठीच फक्त होती. त्या शिकवणीला समस्त मानव जातीसाठी संदेश म्हणून सिध्द केले. ईसा (अ.) यांनी आपल्या जीवनात बनी ईस्त्राईल (यहुदी) लोकांना सोडून इतर लोकांना आपणाकडे आमंत्रित केले नव्हते किंवा इतरांना आपले अनुयायी बनविले नव्हते. यहुदी लोकांत सुधारणा करण्यासाठी ख्रिस्ती चळवळ मर्यादित होती. परंतु सेंट पॉल यांनी ईसा (अ.) यांच्यानंतर खऱ्या शिकवणींना दूर करून मसियत (ख्रिस्ती धर्म) हा समस्त मानवतेसाठी आहे आणि येशु समस्त मानवतेच्या पश्चाताप व्यक्त करण्यासाठी सुळीवर चढला. एके दिवशी आपल्या शिष्याच्या जवळ येऊन येशु म्हणाला, "माझी शिकवण समस्त मानवतेसाठी आहे." "आस्मानी बादशाहीत तोच दाखल होऊ शकतो जो तौरात (यहुदी धर्मग्रंथ) प्रमाणे आचरण करतो." ही ईसा (अ.) ची शिकवण यहुदी धर्माचरण (शरियत) मध्ये सुधारणा करण्यासाठी होती. म्हणून मसियत आणि शरियत हे वेगळे होऊच शकत नव्हते. मसियत ही यहुदी लोकांसाठीच होती, परंतु सेंट पॉल यांनी गैरयहुदीसुध्दा ख्रिस्ती बनू शकतो, त्याने शरियतप्रमाणे आचरण करावे अथवा करू नये असे जाहीर केले. अशा प्रकारे मसियत शरियतपासून वेगळी करण्यात आली. सामाजिक, सांस्कृतिक, आर्थिक व राजकीय तसेच व्यक्तिगत आणि सामूहिक जीवनाचे सर्व कायदे रद्द करण्यात आले. आध्यात्मिक आणि नैतिक शिकवणीचे काही मोजके धडे स्वीकारून त्यास एका खास धर्माचे रूप देण्यात आले आणि त्यास मानवतेसाठीचा धर्म बनविण्यात आला. वस्तुस्थिती मात्र वर उल्लेख आल्याप्रमाणे खास परिस्थितीत खास लोकसमुदाया (यहुदी) साठीच हा धर्म होता. धर्माची पूर्ण शिकवण आणि स्वरूप बदलून टाकण्यात आले.

**परिणाम** - यामुळे पहिला परिणाम हा झाला की लोकांनी आपल्या धर्मशिकवणीनुसार सतत तीनशे वर्ष अत्याचार आणि जुलूम सहन केला आणि स्वत:ला इतरांसमोर नरम गोळा म्हणून सिध्द केले. कारण धर्माची शिकवणच ही होती की एखाद्याने एका गालावर थापड मारली तर तुम्ही दुसरा गाल पुढे करा. कालांतराने जगात स्थित्त्यंतरे आणि क्रांती घडू लागली. त्यामुळे या धर्माच्या लोकांना बहुसंख्येमुळे सामर्थ्य प्राप्त झाले. त्यामुळे राज्य शासनाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली. अशा स्थितीत त्यांना मसिय (ख्रिस्ती) धर्माच्या संकुचित वृत्तीच्या पुढे जावे लागले. लोकांना या क्षेत्रात धर्माचे मार्गदर्शन लाभले नाही. स्वत:च्या नियमाप्रमाणे आणि लहरीप्रमाणे राज्य कारभार चालवयास सुरवात केली. परिणाम असा झाला की जो धर्म आज तागायत इतरांचे अत्याचार, जुलूम सहन करत होता तो स्वत: आपल्या हाताने जगावर अत्याचार आणि दुराचार करू लागला. लहरीपणाच्या आहारी जाऊन त्यांनी जगात अत्याचार हिंसाचार आणि आतंक माजविला. तलवारीच्या आणि बळाच्या जोरावर आपला धर्म जगातील बहुतांश भागावर लादला गेला. याची साक्ष इतिहास देत आहे. आज सत्ता आणि प्रसारमाध्यमें याच्यांच हातात असल्याने त्यांनी इतिहासाला बदलून सत्याला खोटे ठरविले आहे. इसाई धर्म युध्दे आणि धर्म न्यायालये (Inquisition) हे इतर धर्मियावंर केलेल्या अमानुष अत्याचारांची आणि हिंसाचाराची बोलकी उदाहरणे आहेत. येथे त्यांचा सविस्तर आणि आकडेवारीसह उल्लेख करणे अशक्य आहे. तिसरा आणि शेवटचा स्वाभाविक परिणाम हा झाला की जेव्हा ईसाईनी धर्माच्या नावाने जगात अत्याचाराचा आणि हिंसाचाराचा जो विस्फोट केला होता, त्या विस्फोटाने उग्ररूप धारण केले आणि त्या झंझावाताने सीमा पार केली तेव्हा लोकांना धर्माबद्दल द्वेष निर्माण होऊ लागला. धर्माच्या नावाने ज्यांनी जगात आजतागायत हाहाकार माजविला ते स्वत: धर्माच्या विरोधात निधर्मियतेचा प्रसार करण्यासाठी पुढे सरसावले.

यात शंका नाही की अत्याचार आणि हिंसाचार काही मुस्लिम बादशाहांनीसुध्दा केला होता. युध्दाचे दुष्ट प्रकार त्यांनीसुध्दा स्वीकारले होते. धर्माच्या नावावर अधर्मासाठी युध्द करण्याचे पाप मुस्लिमांनीही केले आहेत. परंतु इतरांमध्ये आणि मुस्लिमांमध्ये मौलिक फरक आहे. मुस्लिमांच्या कोणत्याही अपकृत्यांचे आणि दुराचाराचे खापर इस्लामवर फोडले जाऊ शकत नाही. कारण इस्लामने त्याच्या अनुयायींना एक परिपूर्ण अशी जीवनपध्दती बनवून दिली आहे. त्यामुळे त्याबाहेर जाऊन केलेले कृत्य ही इस्लामची जबाबदारी ठरूच शकत नाही. त्यांचा आधार घेऊन इस्लामला बदनाम केले जात आहे ही वेगळी गोष्ट आहे. परंतु मसिहतच्या अनुयायींना मसिहतने सरळ मार्ग (परिपूर्ण जीवनपध्दती) दाखविली नाही. त्यामुळे त्यांनी असीम अत्याचार आणि हिंसाचार मानवजातीवर केला त्याची पूर्ण जबाबदारी ईसाई धर्मावर येते.

आपण आतापर्यंत जगातील चार प्रमुख धर्मांचा युध्दासंबंधीचा विचार पाहिला. यातील दोन धर्मयुध्दाला मान्यता देतात. परंतु सर्व प्रकारच्या युध्दांना त्यांच्या आशा आकांक्षाना पूर्ण करण्यासाठी परवानगी आहे. युध्द करण्याचा कोणताच महान मानवतावादी उद्देश नाही. कशाही प्रकारे आणि कशाहीसाठी युध्दाची परवानगी येथे आहे. याचबरोबर त्यांनी मानवतेला भौगोलिक, वांशिक आणि वर्णाश्रमिक तत्त्वांवर विभागून टाकले. त्यांनी काही खास लोकांना याबाबत इतक्या सवलती देऊन टाकल्या की इतर लोक त्यापासून कायमचेच वंचित राहून गेले. दुसरीकडे इतर दोन धर्म मनुष्याने मनुष्याची हत्या करणे निषिध्द ठरवते. परंतु त्यांच्या या अविवेकी वृत्तीने युध्दासाठी युध्द करता करता त्यांनी मानवी स्वभावाशीच युध्द सुरु केले. अल्लाहने मानवाला जे सामर्थ्य प्रदान केले त्यापैकी काहींना हे दाबून टाकू इच्छितात आणि बाकी सामर्थ्यांना उपयोगात आणू इच्छितात. याचा परिणाम हा झाला की त्यांना जीवनात मार्गदर्शन प्राप्त होत नाही. ते कधी इकडे तर कधी तिकडे दिसू लागतात.

इस्लामने या अफरातफरी अव्यवस्थेतून एक मध्यमार्ग काढला आहे. इस्लाम मानवी स्वभाव आणि मानवी आवश्यकतेनुसार मानवतेच्या सुधारणेसाठीचा उद्देश पुढे ठेवून युध्दाला दोन प्रकारात विभागतो. एक ती लढाई जी देशासाठी, धनसंपत्तीसाठी, सत्तेसाठी आणि मनोकामनेसाठी लढली जाते आणि दुसरे ते युध्द जे सत्यासाठी लढले जाते. अत्याचार आणि हिंसाचार थांबविण्यासाठी लढले जाते. पहिला प्रकार हा इस्लामच्या दृष्टीने उपद्रव आहे आणि दुसऱ्या प्रकारचे युध्द अल्लाहच्या मार्गातील युध्द आहे. ही श्रेष्ठतम उपासना आहे. एक श्रेष्ठतम कर्तव्य आहे. यापेक्षा श्रेष्ठतम जनसेवा असू शकतच नाही. अल्लाहने या श्रेष्ठतम अशा उपासनेसाठी (इबादत) काही मर्यादा घालून दिल्या आहेत. त्याच्या उद्देशाबद्दल खुलासा दिला आहे आणि त्याची तपशीलवार पध्दत सांगितली आहे की जेणेकरून अल्लाहच्या नावावर शैतानाचे काम होऊ लागू नये. (धर्माच्या नावाखाली अधर्म)

ही एक अशी परिपूर्ण जीवनपध्दती आहे जी इस्लामशिवाय इतर कुठेही सापडत नाही. इस्लामच्या या विधीनियमाना स्वीकारून जग त्या धिक्कारापासून सुरक्षित राहू शकते ज्याचे नाव अत्याचार आहे, उपद्रव आहे आणि त्या धिक्कारित स्थितीपासूनसुध्दा सुरक्षित राहू शकते जिचे नाव अत्याचारपीडित असे आहे, उपद्रवग्रस्त असे आहे.

## प्रकरण ६

# युध्द इस्लाम धर्मात (जिहाद)

**अज्ञान युगातील अरब देशातील युध्द** - अरबस्थानात पूर्वी युध्द म्हणजे एक टोळीयुध्द होते. आवश्यक गरजांची अपूर्तता, पोटापाण्याचा प्रश्न अशा अनेक आर्थिक सामाजिक प्रश्नांमुळे त्याकाळी युध्द अटळ होते. युध्द करणे त्यांची सवय बनली होती. युध्दखोरपणा त्यांचे वैशिष्ट्य गणले जात असे. शत्रूत्व मग ते शुल्लक कारणावरून का असेना पिढ्यापिढ्या चालत असत. बदला घेण्यासाठी अमानवी पध्दत युध्दात वापरली जात असे. युध्द त्यांच्यासाठी लूटमार, शोर हंगामा आणि गडबडगोंधळ व अत्याचार होता. त्यांची ही धारणा होती की पलगांवर पडून मृत्यु येताना जीव नाकेवाटे जातो. परंतु युध्दात जखमी होऊन जीव जखमेवाटे जातो. त्यांना जखमेवाटे गेलेला जीव प्रिय होता. युध्दाला ते गर्वाची स्थिती समजत होते. त्यांना या कामी युध्दात मिळणारी लूट आकर्षित करीत होती. जेव्हा एखादी टोळीयुध्दावर निघाली तर त्यांच्या बायका त्यांना भरपूर लूटमाल घेऊन येण्याची शपथ देत असत. ही सर्व वर्णनें त्यांच्या तात्कालिन काव्यातून आपल्याला सापडतात. सूड घेणे हा एक महत्त्वाच्या उद्देशांपैकी एक होता. युध्द त्यांच्यातील सैतानी वृत्तीचे एक प्रतीक होते.

**युध्दाच्या अमानवी पध्दती** - युध्दात स्त्रिया, वृध्द, बालक, आजारी, जखमी इ. सर्वांनाच घेरले जाई. शत्रूच्या स्त्रियांची अब्रू लुटणे, गरोदर स्त्रियांचे पोट फाडून जिवंत मूल बाहेर काढून त्यास ठार करणे इ. अत्याचार केले जात. आगीत जिवंत झोकून त्यांना जाळले जात असे. हातपाय तोडणे, डोळे फोडणे तसेच भर दुपारी वाळूवर झोपवणे व अंगावर मोठी शिळ ठेवणे. अशा प्रकारचे अनेक हालअपेष्टा करून शत्रुंना मारले जात असे. शत्रू बेसावध असताना त्यांच्यावर हल्ला केला जाई. युध्दाची घोषणा केली जात नसे. शत्रूंच्या शवाला विद्रुप केले जात. त्यांचे नाक, कान कापून स्त्रिया हार बनवत असत. अबू सुफियानच्या पत्नीने माननीय हमजा (रजि.) यांचे काळीज काढून चावले होते. दिलेला शब्द न पाळणे हा तर त्या लोकांचा गुणविशेष होता. धोकाधडीत ते निष्णात होते. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याच काळातील काही तह करार पाहू या. बनू नजीर, बनू कुरैजा आणि बनू कैनकाई या तीन टोळ्यांशी पैगंबर मुहम्मद (स.) यांचा करार झाला होता. परंतु तिघांनी वेळ आल्यावर करार मोडून टाकला होता. बनी नजीरने स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) यांना ठार मारण्याचा कट रचला होता. बनी कुरैजा हे अहजाबच्या युध्दाप्रसंगी इस्लामच्या विरोधात गेले. पैगंबरांकडे त्यांनी मदतीसाठी काही लोक मागितल्यावर पैगंबरांनी ७० सहाबा (रजि.)

यांना त्यांच्यासमवेत पाठविले. परंतु त्यांनी सर्वांना धोकेबाजीने ठार केले. कुरआनमध्ये अशा धोकेबाज करार भंग करणाऱ्यांबद्दल सांगितले गेले आहे, "ते कोणत्याही मुस्लिमांबरोबर केलेल्या कराराचे पालन करत नाहीत."

हिंसाचार आणि अत्याचार तात्कालीन प्रगत व सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या सर्व राष्ट्रात मर्यादेपलिकडचा होता. मानवतेवर हा अत्याचार आणि हिंसाचार किरकोळ उद्देशासाठी आणि किरकोळ कारणासाठी होत असे. हजारो लाखोंचे रक्त राजाच्या लहरीपणामुळे सांडले जात असे. वासनेची पूर्तता करण्यासाठी रक्ताने भूमी न्हाऊन निघत असे. एखाद्या सुंदरीला प्राप्त करण्यासाठी रक्ताचे पाट वाहिले गेले हा इतिहास आहे. त्याचा तपशील आणि आकडेवारी देणे हा उद्देश येथे नाही. त्या काळी युध्द हे लुटमार करण्यासाठी, हिंसाचार माजविण्यासाठी, सूड घेण्यासाठी आणि धाक जमविण्यासाठी केले जात. अशा युध्दांच्या काही अटी वगैरे तसेच श्रेष्ठ उद्देश नव्हते. शतकानुशतकांच्या अशा युध्दांमुळे मनुष्य अशा युध्दाचा विचारसुध्दा करू शकत नव्हता ज्यात लूटमार, खूनखराबा, अत्याचार आणि विनाश नाही. ज्या युध्दात स्त्रिया, लहान मूलं, वृध्द, जखमी, आजारींना ठार मारले जात नाही. ज्या युध्दात दुसऱ्यांच्या धार्मिक स्थळांची मोडतोड केली जात नाही. जे युध्द शिष्टाचारांच्या अटींवर लढले जात असे अशा इस्लामी जिहादचा जगाला या हिंस्त्र युध्दामुळे विसर पडला होता.

**इस्लामी सुधार** - अशा पार्श्वभूमीत इस्लामने सुधार घडवून आणला. तात्कालिन युध्दाच्या वास्तवतेला बदलून एक नवीन रूप दिले. युध्दाच्या या नवीन रूपाला तोपर्यंत जग अनोळखी होते. अल्लाहच्या या जगात सुखशांती आणि स्थिरतेला कोणी तिलांजली देऊन येथे अत्याचार, हिंसाचार व उपद्रव माजवित असेल तर हे उपद्रवी कृत्य युध्द आणि हत्येपेक्षासुध्दा वाईट आहे. बचावात्मक भूमिका न घेता सकारात्मक युध्द पुकारणे अशा वेळी अनिवार्य ठरते हे इस्लामने जगाला दाखवून दिले.

**इस्लाम आणि युध्द** - इस्लामच्या नजरेत युध्द करणे म्हणजे शत्रुचा नायनाट करणे अथवा आरपारची लढाई करणे नव्हे तर त्या शत्रूच्या दुराचाराला नष्ट करणे आहे. म्हणून इस्लाम युध्दात बळ आणि सामर्थ्य वापरण्याची परवानगी, दुराचार नष्ट होईपर्यंतच देतो आणि त्याच लोकांच्याविरुध्द युध्द पुकारले जाते जे दुराचार पसरविण्यासाठी आहेत. इतरांना युध्दाची झळसुध्दा पोहचता कामा नये. युध्दाची ही कल्पना अगदी वेगळी होती. तात्कालीन मुस्लिमेतरांच्या मनात आणि आतासुध्दा अमेरिका आणि पाश्चात्यांच्या मते युध्द हे तर संहारक, आणि हिंस्त्रपणाचे प्रतीक आहे. म्हणून अल्लाहच्या मार्गात जिहाद (युध्द) आणि प्रचलित हिंस्त्र आणि संहारक युध्द दोन ध्रुवाचे दोन टोक आहेत. जिहादचा शब्दकोषिय अर्थ

आहे. ''एखाद्या ध्येयाला प्राप्त करण्यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करणे.'' परंतु ही प्रयत्नांची पराकाष्ठा चांगल्या ध्येयासाठी ही होऊ शकते आणि वाईट ध्येय प्राप्तीसाठीसुध्दा होऊ शकते. हे प्रयत्न एखाद्या देशाला पादाक्रांत करण्यासाठी, एखाद्या सुंदरीला हासील करण्यासाठी, सूड उगविण्यासाठी अथवा धन दौलत मिळविण्यासाठी नव्हे तर फक्त आणि फक्त अल्लाहच्या मार्गात व्हावेत. यासाठी ''अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्टा करणे'' ही अट इस्लामने जिहादसाठी (युध्दासाठी) घालून दिली. हे प्रयत्न फक्त अल्लाहसाठीच आणि अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी आहेत. त्यात मनोकामना, वासना, सूडभावना इ. दूराचारांना अजिबात वाव नाही.

या पवित्र हेतुसाठी इस्लामने युध्दाची एक परिपूर्ण अशी प्रणाली तयार करून जगापुढे ठेवली आहे. ज्यामध्ये युध्दाचे शिष्टाचार, युध्दाच्या अटीं व मर्यादांचा तपशील आलेला आहे. पराजित राष्ट्राचे हक्क, विजयी राष्ट्राची जबाबदारी इ. बद्दल तपशीलवार आदेश आहेत. तसेच पैगंबर मुहम्मद (स.) आणि खुलफा-ए-राशिदीन (चार आदर्श खलीफा) यांची त्या बरहुकूम युध्दप्रणाली एक आदर्श म्हणून जगापुढे मांडली गेली आहे. परंतु मागील शतकातील आणि सध्याच्या हेतुपरस्पर पाश्चात्यांच्या इस्लाम अपप्रचार कार्यमोहिमे अंतर्गत इस्लामच्या अनेकानेक चांगल्या गोष्टी झाकून गेल्या. त्यापैकी जिहादचा पवित्र हेतु आणि कार्यप्रणालीसुध्दा झाकून गेली आहे. याला मुस्लिम व तथाकथित मुस्लिम पंडितसुध्दा तितकेच जबाबदार आहेत.

**जिहादचा पवित्र हेतु** - शतकानुशतके चालत आलेले युध्द आणि युध्दाच्या हेतुबद्दल लोक सुपरिचित होते. युध्द आणि त्यांचे अत्याचारी हेतु लोकांच्या अंगवळणी पडले होते. त्यांना युध्द हे सूडासाठी, धन दौलतीसाठी, परकियांचा प्रदेश हडप करण्यासाठी, सुंदरीला हासील करण्यासाठीच केले जाते आणि युध्द करण्याचे हेतु याशिवाय दुसरे कोणते असणार ज्यासाठी असंख्य लोकांचे रक्त सांडले जाते? याव्यतिरिक्त दुसरा हेतु असू शकतच नाही ही लोकांची युध्दाबद्दलची ठाम धारणा बनली होती. ते अशा युध्दाचा विचारसुध्दा करू शकत नव्हते ज्यामध्ये मनुष्याचा स्वार्थ आणि वासनेला काही स्थान प्राप्त नाही. अशा स्थितीत इस्लामच्या युध्दाबद्दलच्या विधीविधानांना कागदावरची शोभा वाढविण्यासाठीच फक्त अवतरित केले गेले नव्हते. तर दुराचारात सुधार आणून युध्दाच्या हिंस्त्र स्वरुपाला नष्ट करून इस्लामच्या त्या विधी विधीविधानानुसार युध्दप्रणाली कार्यान्वित केली जावी हा मूळ हेतु होता. यासाठी लोकांच्या मनातील युध्दासंबंधीचे ते दुष्टविचार जे त्यांच्या मनात शतकानुशतके घर करून बसले होते, त्यांना दूर करणे अत्यावश्यक होते. यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यानी पहिले काम हे केले की ''अल्लाहच्या मार्गात प्रयत्नांची पराकाष्ठा'' (जिहाद) याचा अर्थ आणि हेतु लोकांपुढे सरळ व सहज सुलभतेने मांडला. त्यांनी

"ईशद्रोही (तागूत) च्या मार्गातील जिहाद" आणि "अल्लाहच्या मार्गातील जिहाद" (युध्द) या दोघातील फरक लोकांसमोर सप्रमाण मांडला. लोकांनी इस्लामच्या युध्दाच्या पवित्र हेतुला समजून उमजून घ्यावे यासाठी इस्लामच्या शिकवणीनुसार जिहाद करून जगापुढे आदर्श निर्माण केले. याविषयी अनेक हदीसी उपलब्ध आहेत त्यापैकी काहींचा येथे आपण अभ्यास करू या.

"एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आला आणि विचारू लागला की कोणी युध्दातील लूट प्राप्त करण्यासाठीच युध्दात भाग घेत असेल अथवा प्रसिध्दीसाठी आणि शौर्य दाखविण्यासाठी युध्द करत असेल तर त्यापैकी कुणाचे अल्लाहच्या मार्गातील युध्द ठरेल? पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले, "अल्लाहच्या मार्गातील युध्द तर त्याचे आहे जो फक्त अल्लाहचा बोलबाला करण्यासाठी लढत असेल."

"एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आला आणि विचारू लागला की, 'हे पैगंबर मुहम्मद (स.) अल्लाहच्या मार्गातील युध्द कसे आहे? आमच्यातून कोणी सूड उगविण्यासाठी अथवा कोणी राष्ट्रासाठी लढत असेल तर?" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी नजर उंचावून उत्तर दिले, "जो कोणी अल्लाहचा बोलबाला करण्यासाठी युध्द करतो त्याचे युध्द अल्लाहच्या मार्गातील युध्द आहे." ही हदीसची दोन्ही कथनं माननीय अबू मूसाशरई (रजि.) यांच्याद्वारे केली गेली आहेत.

माननीय अबू इमामा यांचे कथन आहे की एकदा एक व्यक्ती पैगंबर मुहम्मद (स.) यांना पुन्हा पुन्हा विचारू लागला, "त्या व्यक्तीबद्दल आपले काय मत आहे जो धनदौलत आणि प्रसिध्दी प्राप्त करण्यासाठी युध्द करतो? अशा व्यक्तीला काय मिळणार?" पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले, "त्याला काहीही फळ प्राप्त होणार नाही." त्याने तीन चारवेळा पैगंबराकडे जाऊन हाच प्रश्न पुन्हा पुन्हा मांडला आणि पैगंबरांनी हेच उत्तर दिले. चौथ्यांदा तो जेव्हा आला आणि तोच प्रश्न पुन्हा केला तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले, "अल्लाह कोणते ही कार्य पसंत करत नाही परंतु तेच कार्य जे अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी केले जाते."

माननीय मआज बीन जबल (रजि.) याचे कथन आहे की एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "युध्द दोन प्रकारचे आहेत. ज्याने फक्त अल्लाहसाठीच युध्द केले आणि नेत्याचे (इमाम) आदेश पालन केले, आपली उत्तम धनसंपत्ती खर्च केली आणि उपद्रवापासून दूर राहिला तर अशा व्यक्तीचे उठणे बसणे, झोपणेसुध्दा पुण्य आहे आणि ज्याने मात्र प्रसिध्दीसाठी, शौर्य दाखविण्यासाठी युध्द केले आणि नेत्याचे ऐकले नाही आणि पृथ्वीवर उपद्रव माजवला तर तो शिक्षेस पात्र ठरला."

माननीय अबू हुरैरा (रजि.) यांचे कथन आहे की एकदा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "पुनरुत्थानादिवशी सर्वप्रथम तीन प्रकारच्या लोकांचा निकाल लागेल. पहिला त्याला आणले जाईल जो युध्दात शहीद झाला. अल्लाह त्याला आपले उपकार व कृपा दाखविल. तो त्यांचा स्वीकार करील तेव्हा अल्लाह विचारील, "तू माझ्यासाठी काय केलेस?" तो म्हणेल, "मी तुझ्यासाठी युध्द केले आणि युध्दात शहीद झालो." त्यावर अल्लाह स्पष्ट सांगेल की तू खोटे बोलतो. तू तर यासाठी लढला होता की लोकांनी तुला शूर म्हणावे आणि ते तू मिळविले, "अल्लाह त्याला शिक्षा ठोठावील आणि तो मनुष्य तोंडघशी पाडून फरफटत नरकात टाकला जाईल."

अशा प्रकारची ही शिकवण युध्दाला भौतिक फायद्यापासून, प्रसिध्दी, धनदौलत, इज्जत, सूड भावनेपासून तसेच जगाच्या इतर कोणत्याही गरजेपासून दूर ठेवते. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले आहे की "शत्रुशी मुकाबला करण्याची इच्छा बाळगू नका तर अल्लाहजवळ शांती व समृध्दीसाठी प्रार्थना करा. परंतु जेव्हा शत्रुशी मुकाबला झाला तर मग मात्र धैर्याने आणि निष्ठेने लढा आणि जाणून असा की तलवारीच्या छायेत स्वर्ग आहे."

**युध्दप्रणाली** - युध्दाच्या हेतुमध्ये सुधार केल्यानंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी युध्द प्रणालीतसुध्दा सुधार घडवून आणला. त्यांनी हळू हळू त्या रानटी आणि हिंस्त्र प्रणालींना नाहीसे केले, ज्या अज्ञानकाळात लढल्या जात होत्या. यासाठी दिव्य कुरआनात आदेश आलेले आहेत ते पुढे येतीलच परंतु येथे प्रथम आपण पैगंबरांच्या शिकवणीच्या प्रकाशात पुढे जाऊ या. युध्द करणारे ते आहेत जे प्रत्यक्ष युध्दात भाग घेतात आणि भाग घेण्यास सक्षम आहेत. ते तरूण त्यांना अहले किताल म्हटले जाते. आणि जे युध्दात भाग घेऊ शकत नाहीत. म्हणजे स्त्रिया, वृध्द, बालक, आजारी, अपंग, जख्मी लोक, धार्मिक स्थळांचे पुजारी आणि असेच इतर असहाय लोकांना "गैर अहले किताल" म्हटले जाते. इस्लामने युध्दात प्रथम प्रकारच्या लोकांना म्हणजे युध्दात जे प्रत्यक्ष भाग घेतात. (अहले किताल) यांना ठार करण्याची परवानगी दिली आहे. परंतु दुसऱ्या प्रकारच्या लोकांना म्हणजे (गैर अहले किताल) युध्दात भाग घेऊ न शकणाऱ्या लोकांना ठार करणे निषिध्द ठरविले आहे. एकदा युध्दाच्या मैदानात पैगंबर मुहम्मद (स.) यांनी स्त्रीचे शव पडलेले पाहिले तेव्हा अति दु:खाने विचारणा केली "ही तर युध्दात सामील नव्हती" त्यांनी आदेश दिला, "युध्दात स्त्रियांना आणि मुलांना अजिबात ठार करू नका."

"वृध्द, अपंग, मुलांना आणि स्त्रियांना युध्दात ठार करू नका. युध्द लुटीत चोरी करू नका. युध्दात जे काही प्राप्त होईल ते सर्व एकत्र करा. सदाचार आणि उपकार करा कारण अल्लाहला उपकार करणारे आवडतात."

मक्केच्या विजयापूर्वीच पैगंबर (स.) यांनी आदेश दिले होते, "कुण्या जखमीवर हल्ला करू नका. जो कोणी जीव वाचविण्यासाठी पळत असेल त्याचा पाठलाग करू नका आणि जो आपल्या घरात दारबंद करून बसून राहील त्यांना सोडून द्या. तसेच ज्यांच्याशी तह झाला असेल आणि जे धार्मिक स्थळांचे पुजारी आहेत त्यांना ठार करू नका." असा आदेश युध्दावर जाणाऱ्या फौजेला पैगंबर मुहम्मद (स.) नेहमी देत असत.

अशा प्रकारे तमाम ते लोक जे युध्द लढण्यास असमर्थ आहेत अथवा स्वभाविकपणे युध्दासाठी असमर्थ आहेत, त्यांना युध्दात ठार करणे निषिध्द आहे. यांनी प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष युध्दात भाग न घेतला पाहिजे. परंतु एखादा आजारी व्यक्ती पलंगावर बसून युध्दाचे धडे देत असेल, स्त्री फितुरीचे काम करत असेल, मुलं गुप्त बातम्या पोहचविण्याचे काम करत असतील किंवा धार्मिक व्यक्ती युध्दासाठी लोकांमध्ये जोश आणि प्रेरणा निर्माण करत असतील तर अशांना ठार करण्याचा आदेश आहे. इस्लामी युध्दाच्या अटी खालीलप्रमाणे आहेत.

**अहले कितालचे हक्क** - ज्याप्रमाणे गैरअहले कितालचे हक्क वर सांगितले गेले आहेत त्याचप्रमाणे अहले किताल लोकांचे हक्कसुध्दा इस्लामने विषद केले आहेत. काही मर्यादा घालून दिल्या आहेत ज्याचे उल्लंघन करणे निषिध्द ठरविले आहे. या अटींचे एकेक करून खुलासा करण्यात आला आहे.

**१) बेसावधपणात हल्ला करणे निषिध्द** - त्याकाळी अरब लोक रात्रीचे आणि विशेषता अर्ध्या रात्रीनंतर जेव्हा लोक निद्रानिस्त असतात, त्यावेळी अचानक त्यांच्यावर तुटून पडत असत. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी या वाईट सवयीला बंद केले आणि कायदा केला की सकाळ होण्यापूर्वी हल्ला केला जाऊ नये. माननीय अनस (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) एखाद्या शत्रूजवळ रात्री पोहचत तरी सकाळ झाल्याशिवाय युध्द पुकारत नसत.

**२) आगीत जिवंत जाळण्याची सक्त मनाई** - त्या काळी चालत आलेली प्रथा अशी होती की बदल्याच्या आणि द्वेषाच्या उद्रेकातून शत्रूला जिवंत जाळले जात असे. (आजही हे दृष्य विरळ नाही) पैगंबर मुहम्मद (स.) यांनी ह्या अमानवी, हिंस्त्र कृत्याला सक्त मनाई केली. हदीसमध्ये आले आहे,

"आगीत जाळण्याची शिक्षा देण्यासाठी अग्नी निर्माण करणाऱ्याशिवाय कुणीही पात्र नाही."

एकदा माननीय अली (रजि.) यांनी आगीची शिक्षा सुनावली त्यावर माननीय इब्ने अब्बास (रजि.) यांनी त्यांना रोखले आणि सांगितले के पैगंबर मुहम्मद (स.) यांचा हा आदेश आहे की "अग्नीची शिक्षा देणे अल्लाहसाठी योग्य आहे, त्याद्वारे तुम्ही अल्लाहच्या दासांना शिक्षा देऊ नका."

**३) क्रूरता दाखविण्याची सक्त मनाई** - पैगंबर मुहम्मद (स.) यांनी शत्रुला बांधून आणि अत्याचार करून ठार करण्यास सक्त मनाई केली आहे. एकदा लढाईत शत्रु पक्षातील एकाला धरून बांधून ठार करण्यात आले होते. याची खबर माननीय अय्युब अंसारी (रजि.) यांना मिळताच ते म्हणाले की "मी पैगंबर मुहम्मद (स.) यांचा आदेश ऐकलेला आहे की शत्रुला बांधून मारण्याची सक्त मनाई केली आहे." हे जेव्हा तात्कालिन सेनापतीला कळले तेव्हा त्यांनी पश्चाताप केला आणि चार गुलामांना आझाद केले.

**४) लूटमार करण्याची सक्त मनाई** - जंगे खैबरमध्ये समेट झाल्यानंतर इस्लामी फौजेतील काहींनी लुटमार करण्यास सुरवात केली. ते पाहून यहुदींचा सरदार पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे गेला आणि रागात म्हणाला, "हे पैगंबर मुहम्मद (स.) काय तुम्हाला हे शोभा देते की आमच्या खेचराना मारले जावे, आमची फळे खावीत आणि आमच्या स्त्रियांना मारपीट करावी?" त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अब्ने औफ (रजि.) यांना आदेश दिला, "दवंडी पिटून सर्व फौजेला एकत्र बोलवा." सर्व फौज एकत्र जमा झाल्यावर पैगंबर मुहम्मद (स.) उभे राहून म्हणाले,

"काय तुमच्यापैकी कोणी गर्विष्ट बनून हे समजू लागला आहे की अल्लाहने कुरआनमध्ये जे काही निषिध्द केले आहे त्याव्यतिरिक्त आणखी काही निषिध्द नाही? अल्लाह शपथ मी जे काही मार्गदर्शन आणि उपदेश तुम्हाला करतो आणि दुराचाराला प्रतिबंधित करण्याचा आदेश देतो तेसुध्दा कुरआन आदेशाप्रमाणे किंबहुना त्याहीपेक्षा जास्त आहे, अल्लाहने तुमच्यासाठी हे मान्य केले नाही की ग्रंथधारकांच्या घरात विनापरवानगी घुसावे, त्यांच्या स्त्रियांना मारपीठ करावी आणि त्यांची फळे खावीत. त्यांनी तुम्हाला जे काही द्यावयाचे होते ते तर देऊन टाकले आहे."

एकदा लष्कराने रस्त्यात युध्दाप्रसंगी काही शेळ्या लुटल्या आणि मटण शिजवून खाण्यासाठी तयार करत असतांना पैगंबर मुहम्मद (स.) तेथे आले. त्यांना खबर झाल्याक्षणी ती हांडी स्वत:च्या हाताने पालथी केली आणि बजावून सांगितले, "लूटमारीचा माल हा मुरदारपेक्षा वाईट आहे." गंभीर स्थितीत जर रस्त्यात शेळी दूध देणारी दिसली आणि तिचे दूध काढून पिणे अत्यावश्यक असेल तर मालकाला विचारा, तेथे मालक नसेल तर मोठ्या

आवाजाने तीनदा हाक मारा मालक न आल्यास दूध काढून घ्या.

**५) विध्वंस करण्याची सक्त मनाई** - उभ्या पिकांचा नाश करणे, वस्तीमध्ये हत्याकांड माजवणे, आग लावणे इ.साठी युध्दात सक्त मनाई केली आहे. परंतु इस्लाम ह्या कृत्यांना उपद्रव म्हणून संबोधतो आणि सक्तीने मनाई करतो. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

**"जेव्हा त्याला सत्ता प्राप्त होते, तेव्हा पृथ्वीतलावर त्याची सारी धावपळ केवळ याच करिता असते की उपद्रव माजवावे, शेतीचा विध्वंस करावा व मानवजात नष्ट करावी. वास्तविक पाहता अल्लाह (ज्याला तो साक्षी ठरवित होता) त्याला उपद्रव मुळीच आवडत नाही."**

*(दिव्य कुरआन, २:२०५)*

**६) शवविटंबना करण्याची सक्त मनाई** - शत्रुच्या शवाची विटंबना करण्याची पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सक्त मनाई केली आहे. हा वाईट प्रघात तात्कालिन अरबात शतकानुशतके चालत आला होता. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लूटपाट व शवाची विटंबना करण्यापासून सक्त मनाई केली आहे. लष्कर युध्दासाठी सज्ज झाल्यावर पैगंबर जे आदेश देत असत त्यात शत्रुच्या शवाची विटंबना करू नका हे आवर्जुन सांगत असत.

**७) विवश लोकांना ठार करण्याची सक्त मनाई** - मक्का विजयाच्यावेळी पैगंबर मुहम्मद (स.) शहरात दाखल होतांना लष्कराला आदेश दिला होता, "कोणत्याही विवश व्यक्तीवर हल्ला करू नका, पळ काढणाऱ्याचा पाठलाग करू नका, कैदीला ठार करू नका आणि जो आपल्या घराचे दार बंद करून आत बसेल तो सुरक्षित आहे."

**८) प्रवासी लोकांना ठार करण्याची सक्त मनाई** - प्रवासी आणि वाटाड्याला ठार न करण्याचे आदेश आहेत. तसेच कासिद (टपाली) लोकांनासुध्दा ठार करू नये.

**९) तहनामा न तोडण्याची सक्त ताकीद** - हे कृत्य इस्लाममध्ये अत्यंत वाईट गुन्हा आहे. याविषयी अनेक हदीसी उपलब्ध आहेत. अब्दुल्लाह बिन उमर (रजि.) यांचे कथन आहे की पैगंबर मुहम्मद (स.) यांनी सांगितले, "जो कोणी तह केलेल्या व्यक्तीला ठार करील तर त्या व्यक्तीला स्वर्गाचा सुगंधसुध्दा नसीब होणार नाही." एका दुसऱ्या हदीसमध्ये आहे की "ज्या व्यक्तीमध्ये हे चार विकार सापडतील तो दांभिक ठरेल. एक जेव्हा तो बोलतो तेव्हा खोटे बोलतो. जेव्हा वादा करतो तेव्हा त्याच्याविरुध्द वागतो व वायदा तोडून टाकतो. तिसरे करार केला तर त्याला तोडून टाकतो आणि चौथे भांडत असेल तर शिव्या देतो."

**१०) अव्यवस्था आणि बिघाड निर्माण करण्याची मनाई** - अरबांची प्रथा होती की युध्दाला

निघाल्यावर रस्त्यात जे काही भेटल त्याला लुटणे अथवा शहरात जाऊन अव्यवस्था माजवित. एकदा पैगंबर मुहम्मद (स.) फौज घेऊन जिहादला जात असताना त्यांना कळले की फौजेत अज्ञानकाळातील प्रथा आहे. लोकांना लुटले जाते आणि अव्यवस्था माजविली जात आहे. त्यावर पैगंबर मुहम्मद (स.) यांनी घोषणा केली, "जो कोणी अव्यवस्था माजविल आणि लोकांना लुटेल तर त्याचे जिहाद होणार नाही. याला त्यांनी सैतानी कृत्य म्हणून संबोधले आहे." पैगंबरांच्या या आदेशानंतर इस्लामी फौजेत अत्यंत शिस्तप्रियता आणि शहरात अव्यवस्था माजू नये म्हणून फौजेत अत्यंत काळजी घेतली जात असे. तेव्हा इस्लामी फौज आपला पडाव जेथे कुठे टाकत असे तेथे एक संघ व एकत्रित एका ठिकाणी राहत असत.

**११) गडबड गोंधळ माजविण्याची सक्त मनाई** - अरब लोक युध्दात गडबड गोंधळ करण्यात फार प्रसिध्द होते. इस्लाम स्वीकारल्यानंतरसुध्दा अरबांनी हीच पध्दत अवलंबविण्याचे ठरविले. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्यांना ह्याची परवानगी दिली नाही. माननीय अबू मूसा अशअरी (रजि.) यांचे कथन आहे, "आम्ही पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासोबत जात असताना एका जंगलातून टेकडीवर पोहचलो. तेथे आम्ही मोठ्या आवाजात "अल्लाहु अकबर"च्या घोषणा देत होतो. त्या वेळी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी बजावले की "लोकहो, शिस्तीने चाला, तुम्ही ज्याला पुकारता आहात तो काही बहिरा नाही. तो तर तुमच्याबरोबर आहे. सर्व काही ऐकणारा आणि अत्यंत समीप आहे."

**१२) हिसंक कारवायांना सक्त मनाई** - हि. स. ७ मध्ये जगात प्रथमत: पैगंबर मुहम्मद (स.) यांनी लष्कराला युध्दावर जाण्या अगोदर मार्गदर्शन (युध्दासंबंधी) देण्यास सुरूवात केली. जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या सेनापतीला युध्दासाठी पाठवत असत तेव्हा त्याला आणि त्याच्या लष्कराला ईशपरायणता आणि ईशभय यांची शिकवण देत आणि युध्दासंबंधी मार्गदर्शन करीत असत,

"जा अल्लाहचे नाव घेऊन आणि अल्लाहच्या मार्गात लढा त्या लोकांशी जे अल्लाहशी द्रोह करतात, परंतु युध्दात कुणाशीही गैरवर्तन करू नका, युध्दात प्राप्त संपत्तीचा अपहार करू नका, शव विटंबना करू नका आणि लहान मुलांना ठार करू नका."

यानंतर लष्कराला मार्गदर्शन करीत की "शत्रुसमोर तीन गोष्टी ठेवा एक इस्लाम दुसरा जिझिया आणि तिसरे युध्द जर ते इस्लामचा स्वीकार करतील तर त्यांच्यावर हाथ टाकू नका. जर जिझिया देऊन आज्ञाधारकता स्वीकारली तर त्याच्या वित्त आणि जीवांची काळजी घ्या, परंतु त्यांनी जिझिया देण्याससुध्दा नकरा दिला तर अल्लाहजवळ मदतीची याचना करून युध्द सुरू करावे."

माननीय अबू बकर (रजि.) यांनी इजिप्तकडे लष्कर रवाना करण्याअगोदर त्यांना दहा प्रकारचे मार्गदर्शन केले ते खालीलप्रमाणे -

१) स्त्रिया, मुले आणि म्हातारे यांना ठार करू नका.

२) शवविटंबना करू नका.

३) वाटसरू, सन्यासी आणि धार्मिक लोकांना त्रास देऊ नका, परंतु त्यांच्या उपास्यांची खबर घ्या.

४) फळबागा कापू नका, झाडे तोडू नका व उभ्या पिकांचा नाश करू नका.

५) वस्तीमध्ये धुमाकूळ माजवू नका आणि वस्त्या विरान करू नका.

६) जनावरांना ठार करू नका.

७) धोकेबाजीपासून दूर राहा.

८) जे शरण येतील व आज्ञा पाळतील त्यांचे जीव आणि वित्ताचे रक्षण करा.

९) युध्दलूटमध्ये अफरातफर करू नका.

१०) युध्दात पाठ दाखऊ नका.

**युध्दातील सुधार आणि त्याचे परिणाम** - युध्दासंबंधीच्या वरील आदेशांवरून हे सिध्द होते की इस्लामने युध्दाला त्या सर्व पाशवी प्रकारांपासून शुध्द केले आहे. इस्लाममध्ये युध्द हे फक्त पवित्र कार्य ठरविण्यात आले आहे. ती एक उच्चतम भक्ती आहे. अशा वेळी युध्दातील सर्व सैतानी आणि पाशवी प्रकारांना यासाठी दूर करण्यात आले आहे. युध्द हे शूर आणि चारित्र्यशील लोकांचे काम आहे जे युध्दात शत्रु पक्षाला कमीतकमी इजा पोहचवून वाईटाचा नायनाट करण्याचा प्रयत्न करतात. अल्लाहच्या ह्या श्रेष्ठतम भक्तीमध्ये (जिहाद) सैतानी कृत्यांना इस्लामने अजिबात वाव ठेवलेला नाही.

अशा या युध्द सुधारात्मक प्रशिक्षणाच्या सततच्या आठ वर्षाच्या प्रशिक्षण कालावधीनंतर मानवतेसाठी 'आदर्श युध्द' म्हणून 'मक्का विजय' जगासमोर आहे. एका शक्तीवर दुसऱ्या शक्तीचा विजय. विजयानंतर शत्रूच्या प्रदेशात आणि शहरात विजयी सेनेकडून काय प्रताप केले जात होते ते सर्व नजरेसमोर ठेवा. त्या काळातील "प्रगत" देशसुध्दा यापासून वेगळे नव्हते. ज्या मक्का शहरवासीयांनी पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांच्या सहकार्यांना अतोनात कष्ट दिले. पैगंबर मुहम्मद (स.) यांना ठार मारण्याचा कट केला आणि त्या सर्वांना

आपल्या घरादारातून बाहेर काढले होते. अशा परिस्थितीत जेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी मक्का विजय प्राप्त केला आणि त्वरित मक्कावासीयांसाठी 'जाहीर माफी'ची घोषणा केली! जगातील सर्वात जास्त रानटी संस्कृतीत फक्त आठ वर्षाच्या आत युध्दाला ईशभक्तीचा अत्युच्चतम दर्जा देण्यात आला! दुराचाराचा नाश आणि सदाराचा बोलबाला झाला. हाडामासाचे शत्रु हे परममित्र बनले. असत्याला लाथाडून त्यांनी सत्य धर्माचा स्वीकार केला. ही होती खरी क्रांती! आणि एक आदर्श समाजसुधार!

**युध्दाचे नीतिनियम** - युध्दाचे वरील वर्णन केलेले पाशवी प्रकार जगात सर्रास होत होते. इस्लामने त्या हिंस्त्र आणि पाशवी युध्द प्रकारांना बंद करून त्या जागी युध्दात सुसंस्कृतपणा आणि सभ्यता आणली. युध्दासंबंधी चांगल्या गोष्टी इस्लामने जगाला दाखवून दिल्या आणि वाईट गोष्टींचा नायनाट केला. चांगले नियम घालून दिले. आपण त्या मौलिक नियमांचा येथे विचार करू या.

**नेत्याचे आज्ञापालन** - युध्दकार्य शिस्तबध्द करण्यासाठी इस्लामने लष्करात एक केंद्रीय सत्तास्थान निर्माण केले आणि लष्करात शिस्तप्रियता आणि आज्ञाधारकता निर्माण केली. त्यासाठी कायदेकानू केले. युध्दाचा कोणताच निर्णय नेत्याच्या परवानगीशिवाय घेतला जात नाही. नेत्याच्या आदेशाविना केलेले कृत्य हे घोर पाप समजले गेले. इस्लामने नेत्याच्या आज्ञाधारकतेला अल्लाह आणि त्याचे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या आज्ञाधारकतेचा दर्जा दिला हदीसमध्ये नमूद आहे,

"युध्द दोन प्रकारचे आहेत. ज्याने फक्त अल्लाहच्या प्रसन्नतेसाठीच युध्द केले, नेत्याची आज्ञा पाळली, आपली शुध्द धनसंपत्ती खर्च केली आणि उपद्रवापासून दूर राहिला, अशा व्यक्तीचे जागणे आणि झोपणेसुध्दा भक्ती आहे परंतु ज्याने दिखाव्यासाठी आणि प्रसिध्दीसाठी युध्द केले, नेत्याची आज्ञा पाळली नाही. आणि जगात उपद्रव माजविला तर अशा व्यक्तीसाठी कडक शिक्षा आहे."

तसेच "ज्याने माझी आज्ञा पाळली त्याने अल्लाहची आज्ञा पाळली आणि ज्याने माझी अवज्ञा केली त्याने अल्लाहची अवज्ञा केली. ज्याने नेत्याचे आज्ञापालन केले त्याने माझी आज्ञा पाळली आणि ज्याने त्याची अवज्ञा केली त्याने जणूकाही माझी अवज्ञा केली आहे."

वरील पैगंबरआदेशामुळे युध्दात शिस्तप्रियता आली. यापूर्वी शिपाई मनाला येईल तशी शत्रुपक्षाच्या जीवीताचे, वित्ताची लुटमार करीत होते. शत्रुचा प्रदेश बेचिराख करीत होते. विजयी लष्करांचे जगातील हे 'प्रताप' इतिहासात आजही सुरक्षित आहेत. परंतु इस्लामने हे पाशवी स्वातंत्र्य लष्कराला दिले नाही. इस्लामने मानवी रक्त सांडणे ही मोठी जबाबदारीचे काम सिध्द

केले. इस्लामने युध्दाच्या प्रत्येक निर्णयांची जबाबदारी लष्कर प्रमुख (नेता) यावर टाकली. एखाद्या शिपायाला शत्रुपक्षाच्या प्रदेशातील झाडावरील फळसुध्दा तोडण्याची परवानगी दिली गेली नाही तर शत्रुचा नाहक व विना परवानगी जीव घेणे ही फार दूरवरची गोष्ट आहे!

**करार पालन करणे** - इस्लामने युध्दकाळात आणि शांती काळातसुध्दा करार पालन करण्याची सक्त ताकीद केली आहे. मनुष्याने कठीण परिस्थितीतसुध्दा करार पालन केले पाहिजे. हे नैतिकतेचे लक्षण आहे. करार भंग करून कितीही मोठा फायदा हात असेल तरी त्या फायद्याला इस्लाम सोडायला सांगतो आणि करार पालनात मोठे नुकसान होत असेल तरी इस्लाम त्या नुकसानीला सहन करण्याचा आदेश आपल्या अनुयायींना देतो. हा नियम जसा व्यक्तीला लागू आहे तसा समुदायाला आणि राष्ट्राला सुध्दा लागू आहे. व्यक्तीश: व्यक्ती कितीही पुण्यशील आणि सदाचारी असली तरी सार्वजनिक क्षेत्रात व राजकारणात मात्र ''देशाच्या भल्यासाठी'' अथवा ''इतरांच्या भल्यासाठी'' दुराचार करणे, करार भंग करणे, खोटे बोलणे इ. प्रगतीची लक्षणे समजली जातात. अशाने आज सार्वजनिक जीवन हे नीतीमूल्यहीन बनले आहे. जगात महासत्ता गणले जाणारे राष्ट्र आणि स्वत:ला सभ्यतेचा पूतळा समजणारे सामाजिक, राजकीय पक्ष दूराचार, अनाचार आणि हिंसाचार सर्रास करताना दिसतात. परंतु इस्लाम ह्या गोष्टीत व्यक्ती आणि समाज, शासक आणि शासित श्रीमंत व गरीब असा भेदभाव अजिबात करत नाही. करारभंग करण्यास इस्लाम प्रत्येक स्थितीत अमान्य करतो. मग तो करार भंग व्यक्तिगत फायद्यासाठी असो की देशाच्या फायद्यासाठी असो. कुरआन स्पष्टोक्ती आहे की -

''(आणि हे श्रध्दावंतांनो!) तुम्ही आपल्या शपथांना आपापसात एक दुसऱ्याला फसविण्याचे साधन बनवू नका. एखादे वेळी असे होऊ नये की एखादा पाया भक्कम झाल्यानंतर तो घसरावा आणि या अपराधापायी की तुम्ही लोकांना अल्लाहच्या मार्गापासून रोखले, दुष्परिणाम पहावा व शिक्षा भोगावी. अल्लाहच्या कराराला अल्पशा लाभासाठी विकू नका,जे काही अल्लाहपाशी आहे ते तुमच्यासाठी अधिक उत्तम आहे. जर तुम्ही जाणत असाल, जे काही तुमच्यापाशी आहे ते खर्च होऊन जाणार आहे व जे काही अल्लाहजवळ आहे तेच उरणार आहे आणि आम्ही जरूर संयम बाळगणाऱ्यांना त्याचे मोबदले त्यांच्या उत्तम कर्मानुसार देऊ. जो कोणी सत्कर्म करील मग तो पुरूष असो अथवा स्त्री, मात्र तो श्रध्दावंत असावा, त्याच्याकडून आम्ही जगात निर्मळ जीवन व्यतीत करवू आणि (परलोकात) अशा लोकांना त्यांचा मोबदला त्यांच्या उत्तम कृत्यानुसार प्रदान करू'' *(दिव्य कुरआन, १६: ९४-९७)*

अशा प्रकारे संदर्भित विषयानुसार अनेक संकेतवचन कुरआनमध्ये आलेली आहेत. येथे काहीचांच उल्लेख करू या.

"आणि त्यांचे वर्तन असे असते की अल्लाहपाशी केलेल्या आपल्या वचनांची ते पूर्तता करतात आणि त्याची भक्कम बांधीलकी नंतर सोडून टाकत नाहीत. त्यांचे वर्तन असे असते की अल्लाहने ज्या ज्या संबंधांना कायम राखण्याची आज्ञा दिली आहे. त्यांना कायम ठेवतात. आपल्या पालनकर्त्याला भितात आणि याचे भय बाळगतात की एखादेवेळी त्यांचे कडून वाईट प्रकारे हिशेब घेतला जाऊ नये." *(दिव्य कुरआन, १३: २०-२१)*

"जो कोणी आपले वचन पूर्ण करील व वाईट गोष्टीपासून दूर राहील तो अल्लाहचा प्रिय बनेल, कारण ईशपरायण लोक त्याला प्रिय आहेत. उरले ते लोक जे अल्लाहशी केलेला करार व आपल्या शपथा अल्पशा किमतीवर विकून टाकतात तर त्यांच्यासाठी पारलौकिक जीवनात कोणताही वाटा नाही. अल्लाह कयामतच्या दिवशी त्यांच्याशी बोलणारही नाही, त्यांच्याकडे पाहणारही नाही आणि त्यांना पवित्रही करणार नाही. किंबहुना त्यांच्यासाठी तर अत्यंत यातनादायक शिक्षा आहे." *(दिव्य कुरआन, ३:७६-७७)*

"आणि जे लोक दिलेल्या वचनांची पूर्तता करतात आणि अडचणी, संकटे आणि युध्दप्रसंगीदेखील संयम राखतात हेच लोक सत्यशील आणि अल्लाहच्या कोपचे भय बाळगणारे (ईशपरायण) आहेत." *(दिव्य कुरआन, २ : १७७)*

"आणि जेव्हा तुम्ही बोलाल तेव्हा न्यायोचित बोला मग ती गोष्ट आपल्या नातेवाईकांच्या बाबतीत का असेना व अल्लाहशी केलेल्या कराराची पूर्तता करा. या गोष्टीचे आदेश अल्लाहने तुम्हाला दिले आहेत, कदाचित तुम्ही उपदेशाचा स्वीकार कराल. तसेच त्याचा आदेश असा आहे की हाच माझा सन्मार्ग आहे. म्हणून तुम्ही याच मार्गावर चला आणि इतर मार्गावर चालू नका की ते त्याच्या मार्गापासून हटवून तुम्हाला परागंदा करतील. हाच आहे तो आदेश जो तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला दिला आहे, अधिक संभव आहे की, तुम्ही पथभ्रष्टतेपासून दूर राहाल."
*(दिव्य कुरआन, ६ : १५२-१५३)*

"वचनाचे पालन करा, नि:संशय वचनाबद्दल तुम्हाला जाब द्यावा लागेल."
*(दिव्य कुरआन, १७ : ३४)*

वरील शिकवणीनुसार व आदेशानुसार पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या जीवनात जो आदर्श घालून दिला आहे, त्यावरून कळून येते की इस्लाममध्ये वचनपूर्तीला किती महत्त्व दिले गेले आहे. बदरच्या युध्दाप्रसंगी स्थिती अशी होती की मुस्लिम लष्कर अल्पसे होते. त्यांची संख्या शत्रुपक्षाच्या १ / ३ एवढी होती. मुस्लिम एक एक शिपायाच्या शोधात होते. दोन व्यक्ती इस्लामी लष्करात सामील होण्यासाठी मदिन्याकडे कूच करतात परंतु त्यांना शत्रु रस्त्यातच पकडून त्यांच्याकडून इस्लामी सैन्यात भरती न होण्याचे वचन घेऊन त्यांना सोडून देते. हे दोन्ही जेव्हा

पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याजवळ येऊन रणभूमित हा किस्सा सांगतात तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) त्या दोघांना त्वरित मदीनेकडे पाठवून देतात परंतु सामील करून घेत नाही कारण वचनपूर्ती करणे हा अल्लाहचा आदेश आहे. अल्लाहची मदत युध्दासाठी पुरेपूर आहे.

जगप्रसिध्द हुदैबिया कराराप्रमाणे ज्या अटी अनेकेश्वरवादी कुरैशबरोबर करारबध्द झाल्या होत्या. त्यापैकी एक अट ही होती की मक्केहून पळून जर कोणी मुस्लिमांना जावून मिळाला तर त्याला मुस्लिमांनी कुरैशला परत करावे परंतु मुस्लिम जर मदिन्याहून मक्केला आला तर त्याला परत केले जाणार नाही. हा करार जेव्हा लिहिला जात होता तेव्हा अबू जंदल बिन सुहेल नामक एक मनुष्य मक्केतील कैदेतून कसे तरी सुटून इस्लामी लष्करात सामील झाले. पायात बेड्या होत्या, शरीरावर जखमा होत्या व अत्यंत अशक्त झाले होते. त्यांनी पैगंबर मुहम्मद (स.) यांना विनवणी केली की मला या त्रासापासून मुक्तता द्या. मुस्लिमांना हे पाहून अत्यंत दु:ख झाले. त्यावेळी चौदाशे तलवारी सज्ज होत्या. तरी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी अबू जंदल यांची सुटका करण्यास नकार दिला आणि सांगितले,

"अबू जंदल सबर करा! अल्लाह तुमच्या सुटकेची व्यवस्था जरूर करील."

पैगंबर मुहम्मद (स.) आपल्या लष्करासोबत मदीना शहरी परत आले. काही काळाने एक सोबती माननीय अबू बशीर (रजि.) हे मक्का शहरातील अनेकेश्वरवादींच्या कैदेतून सुटून त्यांच्या (पैगंबर) सेवेत हजर झाले. त्यांच्यानंतर दोन अनेकेश्वरवादीसुध्दा येवून मदिना शहरात आले आणि माननीय अबू बशीर (रजि.) यांना परत देण्याचा आग्रह केला. पैगंबर मुहम्मद (स.) यांना माहीत होते की मक्केमध्ये मुस्लिमांवर कशा प्रकारे अत्याचार केला जातो. तसेच कैदेतून सुटून आलेल्यावर तर अतोनात अत्याचार होतो. परंतु वचनपूर्तीसाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी माननीय अबू बशीर (रजि.) यांना त्या अत्याचारींच्या हवाली केले परंतु करार भंग करणे पसंत केले नाही. अशा प्रकारचे अनेक उदाहरणे पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या जीवनात आणि चार प्रसिध्द खलिफांच्या कारकिर्दित सापडतात. येथे सर्वांचा उल्लेख करणे अशक्य आहे.

**नि:पक्ष लोकांचे हक्क** - इस्लामी कायदा सर्व मुस्लिमेतरांना दोन भागात विभागतो. एक प्रकार तो ज्यांच्याशी करार झालेला आहे आणि दुसरे म्हणजे ज्यांच्याशी करार झालेला नाही. जोपर्यंत करार आहे त्या कालावधीत त्यांच्याशी अटीनुसार व्यवहार केला जाईल आणि युध्दातसुध्दा या अटी पाळल्या जातील. यालाच नि:पक्षपणा म्हटले जाते. इतरांबरोबर युध्द जरी सुरू नसले तरी ते लढण्यासाठी तयार आहेत असे समजले जाईल. कारण मुस्लिमेतरांबरोबर करार आणि करार न होण्या दरम्यानची स्थितीला इस्लाम मान्यता देत

नाही. ज्यांच्याशी करार झाला आहे त्यांच्याशी करारातील अटींनुसार व्यवहार केला जातो. युध्दातसुध्दा त्यांचे हक्क मान्य केले आहे. ते खालीलप्रमाणे,

१) जोपर्यंत करार पाळला जातो तोपर्यंत त्यांच्याशी गैरव्यवहार करणे सक्त मनाई आहे. कुरआनोक्ती आहे,

"आणि त्यांनी तुमच्याशी आपला करार पाळण्यात कोणतीही कसूर केली नाही व तुमच्याविरुध्द कुणाला मदतही केली नाही, तेव्हा अशा लोकांशी तुम्ही देखील कराराची मुदत पुर्ण होईपर्यंत प्रामाणिक राहा, कारण अल्लाह ईशपरायण लोकांनाच पसंत करतो."

(दिव्य कुरआन, ९:४)

२) जर काही मुस्लिम त्या करार केलेल्या देशात राहत असेल आणि त्यांच्यावर तिथे अत्याचार होत असेल तर दुसरा करारातील देश जो मुस्लिम आहे, तो त्यादेशातील मुस्लिमांच्या मदतीला धावून जाऊ शकत नाही. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"परंतु जर ते धर्माच्या बाबतीत तुमच्याकडून मदत मागतील तर त्यांना मदत करणे तुमचे कर्तव्य होय, परंतु अशा कोणत्याही जनसमुदायाच्या विरुध्द नव्हे की, ज्यांच्याशी तुमचा करार झालेला आहे. जे काही तुम्ही करता ते अल्लाह पाहतो. आणि जे सत्याचा इन्कार करणारे आहेत ते एकमेकांचे सहाय्य करीत असतात. जर तुम्ही हे केले नाही तर पृथ्वी वर उत्पात (हिंसाचार) आणि भयंकर बिघाड उद्‌भवेल." *(दिव्य कुरआन, ८:७२-७३)*

युध्दकाळात करार झालेल्यापैकी जर शत्रुने त्या देशात जावून आश्रय घेतला तर शत्रुच्या पाठलाग करून आश्रित देशात इस्लामी लष्कर जावू शकत नाही. याविषयी कुरआन स्पष्ट आदेश देत आहे,

"आणि जर ते स्थलांतरापासून पराड़मुख राहतील तर जेथे आढळतील तेथे त्यांना पकडा व ठार करा आणि त्यांच्यापैकी कोणासही आपला मित्र व सहायक बनवू नका. परंतु ते दांभिक या आदेशाला अपवाद आहेत जे एखाद्या अशा जनसमुदायाला जाऊन मिळतील ज्याच्याशी तुमचा करार आहे." *(दिव्य कुरआन, ४:८९-९०)*

हा नियम नि:पक्षपातीपणाचा मुळाधार आहे. यातून अनेक नि:पक्ष कायदे निर्माण होतात.

**युध्दघोषणा** - जेव्हा एखादे राष्ट्र करार भंग करून इस्लामी शासनाविरुध्द कारवायात सहभागी असेल तर अशा स्थितीत इस्लामी कायदा आहे की त्या राष्ट्राला कडक समज दिली

पाहिजे आणि करार पालन करण्यासाठी वेळ दिला पाहिजे आणि शेवटी युध्द केले पाहिजे. कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"आणि जर तुम्हाला एखाद्या लोक समुदायाकडून दगलबाजीची भीती असेल तर त्यांचे करार जाहीरपणे त्यांच्या तोंडावर फेकून द्या. निश्चितच अल्लाह विश्वासघातकी लोकांना पसंत करीत नाही." *(दिव्य कुरआन, ८:५८)*

याविषयी माननीय उमर (रजि.) यांचासुध्दा निर्णय आहे की करार भंग करणाऱ्यांना परत करार पालन करण्यासाठी योग्य वेळ दिला पाहिजे.

**युध्दकैदी** - वर उल्लेख आला आहे की इस्लामने युध्दकैद्यांना ठार करण्याची सक्त मनाई केली आहे. एवढेच नव्हे तर युध्दकैद्यांशी माणुसकीने, नरमाईने वागण्याचा आदेश दिला. कुरआनमध्ये गरीब, अनाथ व कैद्यांना जेवू घालण्याचा आदेश आहे आणि याला सदाचार व पुण्यकर्म ठरविले आहे. कुरआनोक्ती आहे,

"आणि अल्लाहच्या प्रेमात गरीब आणि अनाथ व कैद्यांना जेवू घालतील आणि त्यांना म्हणतील, आम्ही तुम्हाला केवळ अल्लाहसाठी जेवू घालत आहोत, आम्ही तुमच्याकडून कोणताही मोबदला इच्छित नाही की आभार प्रदर्शन, आम्हाला तर आमच्या पालनकर्त्याकडून त्या दिवसाच्या प्रकोपाची भीती लागली आहे जो भयंकर संकटांचा अत्यंत प्रदीर्घ दिवस असेल." *(दिव्य कुरआन, ७६:८-१०)*

पैगंबर मुहम्मद (स.) यांनी कैद्यांशी नेहमी चांगला व्यवहार करण्याचा आदेश देत असत. बदरच्या युध्दात ते लोक जेव्हा कैदी बनवून समोर आणले गेले ज्यांनी मक्का शहरात त्यांना सतत १३ वर्ष अतोनात कष्ट दिले होते आणि त्यांना घरबार सोडण्यास भाग पाडले होते. परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या सर्वांबरोबर चांगली वर्तणुक ठेवण्यास सांगितले. या आदेशाची सहाबा (रजि.) म्हणजे सोबती लोकांनी त्या युध्दकैद्यांची त्यांच्यापेक्षासुध्दा चांगले जेवण आणि अधिक आराम देऊन त्यांची ठेप ठेवली होती. त्या युध्दकैद्यांपैकी एक असा होता की तो पैगंबरांना नेहमीच अपशब्द बोलायचे. माननीय उमर (रजि.) यांनी त्यांचे दात तोडावे अशी इच्छा प्रकट केली परंतु पैगंबर मुहम्मद (स.) यांनी तसे करू दिले नाही आणि सांगितले, "मी जर ह्या कैद्यांचा चेहरा विद्रुप करील तर अल्लाह मला विद्रुप करील." पैगंबर मुहम्मद (स.) युध्दकैद्यांना काही काळ ठेवून रक्कम घेवून सर्वांना सोडून दिले होते. इस्लामचा आदेश आहे की युध्दकैद्यांना विनारक्कम अथवा रक्कम घेऊन सोडून द्यावे किंवा त्यांच्याशी त्या काळात चांगले वर्तन करावे.

"म्हणून जेव्हा या अश्रध्दावंतांशी तुमचा सामना होईल तेव्हा पहिले काम मानेवर प्रहार करणे (ठार करा) आणि जेव्हा तुम्ही त्यांच्यावर मात कराल तेव्हा त्यांना बांधून ठेवा.

नंतर त्यांच्या वर अनुग्रह करा किंवा खंडणी घ्या, इथपर्यंत की युध्द (आपली) शस्त्रें टाकील. हे आहे तुम्ही करावयाचे काम, अल्लाहने इच्छिले असते तर स्वत:च त्यांच्याशी निपटले असते."

*(दिव्य कुरआन, ४७:४)*

वरील आदेशानुसार पैगंबर मुहम्मद (स.) कधी कधी युध्दकैद्यांना अर्थदंडाची रक्कम न घेताच सोडून देत असत. हुनैनच्या युध्दाप्रसंगी २ हजार कैद्यांना तसेच सोडून दिले होते. यमामा प्रदेशाचा प्रमुखाला कैद करून पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासमोर आणले गेले त्यालासुध्दा पैगंबर मुहम्मद (स.) अर्थदंड न घेता सोडून दिले त्यावर तो प्रभावित झाला आणि त्याने इस्लामचा स्वीकार केला.

**गुलामीचा प्रश्न** - या संदर्भात हा प्रश्न उभा राहातो की इस्लामने युध्दकैद्यांना गुलाम आणि लौंडी बनवून ठेवण्याची परवानगी दिली आहे आणि युध्दकैदी स्त्रियांना तमत्त (लौंडी) बनवून ठेवण्यास परवानगी कशी दिली? यासाठी आपणास तात्कालीन परिस्थितीनुरूप विचार करावा लागेल.

त्या काळी युध्दकैदी गुलाम बनवून ठेवले जात. जर दोन्ही पक्षाचे कैद्यांची अदला बदल कधी कधी होत असे. कधी कधी युध्दात वस्तीतील बहुतेक पुरूष ठार केले जात आणि अशा स्थितीत वस्तीतील तथा देशातील स्त्रिया आणि मुलं अनाथ होत असत. या स्थितीत त्यांची जबाबदारी विजयी देशाने उचलणे आवश्यक होते. आणि याच कारणाने स्त्रियांशी वैवाहिक संबंध स्थापित केले जात. इस्लामने युध्दकैद्याला गुलाम बनविण्याची परवानगी दिली मात्र आदेश दिलेला नाही. तरी इस्लामी लष्कर या परवानगीचा फायदा उठवत नसत. इजिप्त, इराक, जॉर्डन, दक्षिभ आफ्रिका, अर्मानिया या देशांशी युध्दप्रसंगी लाखो सैन्य कैद केले गेले परंतु त्यातील फक्त मोजकेच कैदी गुलाम बनविण्यात आले आणि इतर सर्वांना सोडून देण्यात आले. गुलाम बनवून लोकांना बाजारात विकणे ही प्रथा त्या काळी होती. इस्लामने त्याला सक्त मनाई केली पैगंबर (स.) यांनी आदेश दिला,

"तीन लोकांविरूध्द पुनरुत्थानादिवशी मी स्वत: दावेदार होईल. एक तो ज्याने माझा हवाला देऊन शपथ तोडली, दुसरा तो ज्याने स्वतंत्र माणसाला विकले आणि त्याची किंमत खाली. तिसरा तो ज्याने मजुराकडून पुरेपूर काम करून घेतले आणि त्याची मजुरी दिली नाही."

गुलामी प्रथेला इस्लामने हळू हळू नाहिसे केले यासाठी इस्लामने अनेक प्रकारे गुलामी प्रथेला शह दिला.

१) गुलामाला स्वतंत्र करणे आणि त्यासाठी प्रयत्न करणे पुण्यकर्म ठरविण्यात आले. यासाठी प्रोत्सान देण्यात आले. याविषयी कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"आणि तुम्हाला काय कल्पना की काय आहे तो दुर्गम घाट एखाद्या उपासमारीच्या दिवशी एखाद्या निकटच्या अनाथाला अथवा मातीत पडलेल्या गरिबाला जेवू घालणे. मग (या बरोबर असे की) माणसाने त्या लोकांत सामील व्हावे ज्यांनी श्रद्धा ठेवली आणि ज्यांनी एकमेकाला संयम आणि दयेचा उपदेश दिला." *(दिव्य कुरआन, ९०:१२-१७)*

एकदा एक अनुयायी पैगंबर मुहम्मद (स.) यांच्याकडे आला आणि विचारणा केली, "मला तो मार्ग (कार्य) दाखवा की ज्यामुळे मी स्वर्गात जाईल?" पैगंबरांनी सांगितले, "गुलामाला स्वतंत्र कर आणि एखाद्या मानेला गुलामीतून मुक्त करा." गुलामांना आझाद (स्वतंत्र) करण्यासाठी व प्रोत्साहन देण्यासाठी पैगंबर मुहम्मद (स.) यांनी प्रथा पाडली की जितका जास्त किमतीचा आणि आवडता गुलाम स्वतंत्र केला तर तितके जास्त पुण्य प्राप्त होते. जसे लौंडी (गुलाम स्त्री) ला ज्याने चांगले शिक्षण प्रशिक्षण दिले आणि तिला स्वतंत्र केले आणि तिला आपल्या विवाह बंधनात घेतले तर हे महान पुण्यकार्य आहे. त्या व्यक्तीला दुप्पट पुण्य मिळेल. अशा प्रकारच्या हदीसी अनेक आहेत.

२) दुसरा प्रकार हा होता की गुलामासोबत नरमी आणि प्रेमपूर्वक वर्तन करावे. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपल्या अंतासमयी जी शिकवण दिली त्यात प्रथम नमाजसाठी आदेश आहे. आणि दुसरा आदेश गुलामांना आझाद करण्याचा आहे. पैगंबर यांचे साथीदार (सहाबी) जेव्हा गुलामांना त्रास देत तेव्हा त्यांना पैगंबर (स.) तंबी देत असत. पैगंबर मुहम्मद (स.) यांची शिकवण आहे,

"गुलाम तुमचे बंधु आहेत त्यामुळे त्यांना तेच खाऊ पिऊ घाला जे तुम्ही खाता पिता आणि तेच कपडे घालावयास द्या जे कपडे तुम्ही घालता. त्यांना त्यांच्या कुवतीपेक्षा जास्त काम सांगू नका. काम जास्त असेल तर स्वत: मदत करा. तसेच त्यांना एक दस्तरखान वर बसवून एकत्र जेवण घ्या."

यावरून गुलामाबद्दलचा आदर आणि सन्मान वाढीस लागावा आणि ही प्रथा कालपरत्वे बंद व्हावी तसेच ते गुलाम त्या कुटूंबाचे सदस्य बनावे हा उदात्त हेतु कार्यरत होता जेणेकरून समजातून ही कुप्रथा कायमची बंद व्हावी. इस्लामी कायद्यात गुलामांना जास्तीतजास्त हक्क प्रदान केले गेले होते जेणेकरून ते स्वतंत्र मनुष्याप्रमाणे जीवनाच्या सर्व क्षेत्रांत प्रगती करू शकत होते. कायद्यापेक्षा इस्लामी समाजाने गुलामांना त्यांच्याशी

रोटीबेटी व्यवहार करून आपलेसे करून घेतले होते. गुलाम होणे त्यांच्यासाठी अडचण नव्हती. पैगंबर मुहम्मद (स.) यांनी आपली मावस बहिण एका आझाद गुलाम माननीय जैद बिन हारिस (रजि.) यांच्याशी विवाहबध्द केली होती. माननीय इमाम हुसेन (रजि.) यांनी एका इराणी लौंडीशी विवाह केला होता. अशी अनेक उदाहरणे देता येतील की ज्यामुळे ही कुप्रथा हळूहळू समाजातून नाहीशी होत गेली. जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात गुलाम प्रगती पथावर होते किंबहुना धार्मिक, आर्थिक, राजकीय नेतृत्वसुध्दा त्यांनी त्या काळी केले होते. हे उदाहरण इतर ठिकाणी सापडणे अशक्य आहे. माननीय सालिम (रजि.) हे माननीय अबू हजीफा (रजि.) यांचे गुलाम होते. त्यांच्याविषयी माननीय उमर (रजि.) यांनी आपल्या मृत्यू समयी इच्छा प्रकट केली होती,

"आज जर माननीय सालिम (रजि.) हे जिवंत असते तर मी त्यांनाच माझा उत्तराधिकारी (खलीफा) नेमला असता."

माननीय बिलाल (रजि.) हे आफ्रिकी गुलाम होते, ज्यांच्याविषयी माननीय उमर (रजि.) सांगत असत की, "माननीय बिलाल (रजि.) हे आमच्या मालकाचे गुलाम आहेत आणि माननीय बिलाल (रजि.) आमचे मालक आहेत माननीय ओसामा बिन जैद (रजि.) हे गुलाम होते ज्यांना पैगंबर (स.) यांनी आपल्या अंतसमयी अशा लष्कराचा प्रमुख बनविले ज्यामध्ये माननीय अबू बकर (रजि.) सारखे प्रतिष्ठित सहाबी (सोबती) सुध्दा होते. अशा प्रकारच्या या गुलामांना कोण गुलाम म्हणू शकेल? काय त्यांच्या गुलामीने त्यांना सार्वजनिक क्षेत्रात उच्चतर स्थानापर्यंत जाण्यास रोखले होते? जर गुलामी याला म्हणतात तर आझादीला गुलामीचे नाव देणे उचित ठरते. अशा प्रकारे इस्लामने गुलामीच्या कुप्रथेला कमीकमी करत शेवटी गुलामी आझादीला समर्पित करून टाकली. तथापि दोघांत काही एक फरक ठेवला नाही. गुलामी शब्द शिल्लक राहिला, परंतु गुलामीची वास्तविकता पूर्ण बदलून टाकली. ही इस्लामची किमया आहे. जगात इतर धर्मात असे उदाहरण शोधूनसुध्दा मिळणार नाही.

**युद्धसंपत्ती (गनिमीमाल) चा प्रश्न** - इस्लामविरोधकांनी युध्दसंपत्तीसंबंधीसुध्दा जगात अनेकानेक गैरसमज पसरविले आहेत. इस्लामने गुलामीच्या बाबतीत सुधारात्मक दृष्टिकोन स्वीकारला होता तसाच याविषयीसुध्दा घेतला. त्या काळी युध्द संपत्तीला प्राप्त करण्याची लालसा अरब लोकांत इतकी प्रबळ होती की ती प्राप्त करण्यासाठी जीव देण्यास व जीव घेण्यास तयार होत असत. त्यांच्यानुसार युध्द म्हणजे लुटमार होती. नवमुस्लिम अरब

युध्दभूमीतील युध्दसंपत्तीचा माल पाहून स्वत:वर काबू ठेवू शकत नव्हते. बदर युध्दाच्या वेळी एकीकडून कुरैशचा व्यापारी काफिला येत होता तर कुरैशचे लष्कर मक्केहून कूच करीत होते. इस्लामी लष्कराची सर्व साधारण इच्छा हीच होती की प्रथम व्यापारी काफिल्यावर हमला करून त्याला प्रथम लुटून घ्यावे. याविषयी कुरआन स्पष्टोक्ती आहे,

"स्मरण करा तो प्रसंग जेव्हा अल्लाह तुम्हाला वचन देत होता की दोन्ही जमातींपैकी एक तुमच्या हाती लागेल. तुमची इच्छा होती की दुर्बल जमात तुमच्या हाती लागावी. परंतु अल्लाहचा इरादा असा होता की आपल्या वचनांनी सत्याला सत्य करून दाखवावे व अश्रध्दांचे मूळ कापून टाकावे. म्हणजे सत्य, सत्य सिध्द व्हावे व असत्य, ठरावे, मग ही गोष्ट अपराधी लोकांना कितीही अप्रिय का वाटेना." *(दिव्य कुरआन, ८:७-८)*

युध्दात जेव्हा विजय प्राप्त झाला तेव्हा प्रतिष्ठित व आदरणीय सहाबा (रजि.) यांना युध्दसंपत्ती गोळा करण्याचा मोह टाळता आला नाही. आणि आदेश येईपर्यंत वाट न पाहता युध्दसंपत्ती गोळा करू लागले. त्यावर कुरआनने तंबी दिली आहे,

"जर अल्लाहचे लिखित यापूर्वीच लिहीले गेले नसते तर जे काही तुम्हा लोकांनी घेतले आहे त्यापायी तुम्हाला मोठी शिक्षा दिली गेली असती. तर जे काही माल तुम्ही हस्तगत केला आहे तो खा कारण की तो वैध व शुद्ध आहे आणि अल्लाहचे भय बाळगून असा. नि:संशय अल्लाह क्षमाशील आणि दया दाखविणारा आहे." *(दिव्य कुरआन, ८:६८-६९)*

ओहदच्या युध्दात या युध्दसंपत्तीच्या प्रबळ लालसेने विजयाला पराजयात परिवर्तीत केले होते. अल्लाह क्षमा करो! हे उदाहरण येथे देऊन आदरणीय सहाबांचा अनादर करण्याचा हेतु अजिबात नाही. तर फक्त हे दाखविणे अपेक्षित आहे की युध्दसंपत्तीला प्राप्त करणे स्वाभाविक मानवी लालसा होती. इस्लाम मनुष्य स्वभावाशी युध्द नव्हे तर मनुष्य स्वभावात सुधार आणि क्रांतिकारक बदल आणू इच्छितो. म्हणूनच युध्दसंपत्तीला वैध ठरवून हळू-हळू त्याच्या लालसेला कमी-कमी करण्याचा प्रयत्न होत गेला. यासाठीसुध्दा तीन पध्दतींचा अवलंब करण्यात आला.

१) इस्लामने युध्दसंपत्तीची लोकांच्या नजरेतील किंमत इतकी कमी केली की श्रध्दाशील तो माल घेण्यास नकार देऊ लागले. प्रथम आदेश दिला की जो युध्दसंपत्ती प्राप्त करण्याच्या हेतुने युध्दात सहभागी झाला तर त्याला जिहादचे पुण्य प्राप्त होणार नाही. पुण्य त्यांच्यासाठी आहे जे फक्त अल्लाहसाठी लढतात. जगातील फायद्यापेक्षा परलोकातील फायदा श्रेष्ठ आहे. याची जाणं लष्कराच्या मनात ठाम रूजविली हदीसची शिकवण आहे,

"ज्या लष्कराने अल्लाहच्या मार्गात युध्द केले आणि युध्दसंपत्तीसुध्दा प्राप्त केली त्यांनी आपल्या परलोकच्या पुण्याईतील दोनत्रीतिअंश हिस्सा येथेच घेतला. परलोकात फक्त एकत्रीतिअंश हिस्सा मिळेल परंतु ज्याला युध्दसंपत्ती मिळाली नाही त्याने पूर्ण पुण्याई परलोकातील प्राप्त केली."

या शिकवणीमुळे मुस्लिमांमध्ये युध्दसंपत्तीपेक्षा परलोकातील पुण्यश्रेष्ठ ठरले आणि ते निरवळ अल्लाहच्या मार्गात अल्लाहसाठीच (धनसंपत्तीसाठी नव्हे) युध्द करू लागले.

२) युध्दसंपत्तीच्या संपत्तीत अनाथ, असहाय, गरीबांचासुध्दा वाटा ठेवण्यात आला आणि सार्वजनिक खर्चासाठी पाचवा हिस्सा निश्चित करण्यात आला जेणेकरून लष्कराला कमी माल मिळत जावून त्यांच्याजवळ युध्दसंपत्तीची किंमत राहू नये. कुरआनचा याविषयी स्पष्ट आदेश आहे,

"आणि तुम्हाला माहीत असावे की जो काही गनिमीमाल तुम्ही हस्तगत केला आहे, त्याचा पाचवा वाटा अल्लाह व त्याचे पैगम्बर (स.) व नातेवाईक व अनाथ व गोरगरीब व वाटसरू यांच्याकरिता आहे. जर तुम्ही श्रध्दा ठेवली आहे अल्लाहवर आणि त्या गोष्टीवर जी निर्णयाच्या दिवशी अर्थात दोन्ही सैन्याची गाठ पडण्याच्या दिवशी, आम्ही आमच्या दासावर अवतरली होती, (तर हा वाटा स्वखुशीने अदा करा) अल्लाह सर्व गोष्टींना समर्थ आहे." *(दिव्य कुरआन, ८:४१)*

अशा प्रकारे गनिमीमालाचा (युध्दसंपत्तीचा) चा मोठा हिस्सा नेक कार्यासाठी राखून ठेवून अल्पसा वाटा लष्करासाठी ठेवण्यात आला होता.

३) पूर्वी युध्दसंपत्तीचा माल म्हणजे शत्रुच्या प्रदेशातून प्राप्त झालेला आणि लुटलेला माल अथवा धनसंपत्ती मग ती कशा प्रकारे ही लुटली गेली असो. परंतु इस्लामने युध्दसंपत्ती (गनिमत) फक्त अशा संपत्तीला म्हटले आहे जी युध्दभूमीत फक्त विजयी सेनेच्या हातात येते. सामान्य जनतेची लूट इस्लामने निषिध्द ठरविली. युध्दाव्यतिरिक्त करार केल्याने जो माल प्राप्त होतो त्याला सुध्दा 'मालेगनिमत' मध्ये सामील करण्यात आलेले नाही अशी धन संपत्ती ही युध्दसंपत्ती नसल्या कारणाने ती राजकोषात जमा केली जाते. कुरआनोक्ती आहे,

"आणि जो माल अल्लाहने त्यांच्या कब्जातून काढून आपल्या पैगंबराकडे

वळविले ते असले माल नव्हते ज्यांच्यावर तुम्ही आपले घोडे व आपले उंट दौडविले असावेत. तर अल्लाह आपल्या पैगंबरांना ज्यावर इच्छितो ताबा बहाल करतो, आणि अल्लाहला प्रत्येक वस्तुवर सामर्थ्य प्राप्त आहे. जे काही अल्लाह वस्तीच्या लोकांकडून आपल्या पैगंबराकडे वळविल ते अल्लाह आणि पैगंबर व नातेवाईक आणि अनाथ व गोरगरीब आणि प्रवाशासाठी आहे जेणेकरून ते तुमच्या श्रीमंतांच्या दरम्यानचा भ्रमण करीत राहू नये. जे काही पैगम्बर तुम्हाला देईल ते घ्या आणि ज्या गोष्टींची तो तुम्हाला मनाई करील त्यापासून अलिप्त राहा. अल्लाहच्या कोपचे भय बाळगा, अल्लाह कठोर शिक्षा देणारा आहे.''

*(दिव्य कुरआन, ५९:६-७)*

या आदेशानुसार हे स्पष्ट होते की युध्दभूमीतील लुटून प्राप्त केलेली संपत्तीच ही युध्दसंपत्ती आहे. इतर संपत्ती ही राजकोषात जमा करण्यासाठी आहे जिचा उपयोग अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या कामासाठी होतो. अशा प्रकारे इस्लामने युध्दसंपत्तीच्या माला बद्दलची लालसा मानवी मनातून कमी केली. आणि असे कायदे केले की गनिमतचा माल (युध्दसंपत्ती) ही फक्त युध्दभूमीत लढताना प्राप्त झालेली निश्चित केली. लढाईत प्राप्त झालेला सर्व माल लष्कर प्रमुखासमोर अथवा अमीर (नेता) समोर ठेवला जाई. प्रमुख त्यातून पाचवा हिस्सा राजकोषात ठेवून बाकी चार हिस्से लष्करात वाटत असे.

**शांती व सलोखा** - इस्लामी जिहादचा प्रमुख उद्देश हा आहे की मुस्लिमांनी सतत समेट घडून आणण्यासाठी व शांती स्थापित करण्यासाठी नेहमीच तयार राहिले पाहिजे. कारण इस्लामी जिहादचा उद्देश युध्द मुळीच नाही. तर जनसेवा, शांती व समृध्दी प्राप्त करून देणे आहे. म्हणून हत्यार हातात घेण्या अगोदर समेट होत असेल तर तो अवश्य करावा. कुरआन मुस्लिमांना आदेश देतो की शत्रु प्रथम तुमच्याशी समेट घडविण्याचा प्रयत्न करीत असेल तर तुम्ही खुल्यादिलानं त्याला तयार व्हा. कुरआनोक्ती आहे,

''आणि हे पैगम्बर (स.) जर शत्रुंचा कल, तह व शांततेकडे असेल तर तुम्ही देखील त्यासाठी तयार व्हा आणि अल्लाह वर भरोसा ठेवा. नि:संशय तोच सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे. आणि जर तो दगाफटका करण्याची नियत बाळगून असेल तर तुमच्यासाठी अल्लाह पुरेसा आहे. तोच तर आहे ज्याने आपल्या मदतीने व श्रध्दावंतांच्या द्वारे तुमचे समर्थन केले आणि श्रध्दावंतांची हृदयें एकमेकांशी जोडली. तुम्ही पृथ्वीवरील सारी संपत्ती जरी खर्च केली असती, तरी सुध्दा या लोकांची हृदये जोडू शकला नसता. परंतु तो अल्लाह आहे ज्याने यांची हृदये जोडली, खचितच तो मोठा सामर्थ्यशाली व बुध्दीमान आहे. हे पैगम्बर (स.) तुमच्यासाठी आणि तुमच्या

श्रध्दावंत अनुयायीं करिता तर बस अल्लाह पुरेसा आहे.'' *(दिव्य कुरआन, ८:६१-६४)*

जर युध्दात शत्रु स्वत:हून हत्यार टाकून देतो आणि तुमच्या जवळ शरण मागतो अशावेळी युध्द थांबवा हा आदेश आहे.

''म्हणून जर ते तुमच्यापासून अलिप्त झाले आणि लढाईपासून दूर राहिले आणि तुमच्याकडे सलोखा व शांतीचा हात पुढे केला तर त्यांच्यावर हात उचलण्याचा कोणताच मार्ग अल्लाहने तुमच्यासाठी ठेवला नाही.'' *(दिव्य कुरआन, ४:९०)*

अशा प्रकारे सलोखा आणि शांतीने दुसऱ्याबरोबर राहणे इस्लामी जिहादचा मूळ उद्देश आहे, त्यामुळे युध्द न करता शांती व सलोखा ठेवावा हा आदेश देऊन कुरआन पुढे आदेश देतो,

''आणि जर अनेकेश्वरवादींपैकी कोणी इसम शरण मागून तुमच्याकडे येऊ इच्छित असेल जेणेकरून अल्लाहची वाणी ऐकावी तर त्याला आश्रय द्या येथपावेतो की त्याने अल्लाहची वाणी ऐकावी. मग त्याला त्याच्या सुरक्षित ठिकाणी पोहचवा. हे अशासाठी करावयास पाहिजे की या लोकांना ज्ञान नाही.'' *(दिव्य कुरआन, ९:६)*

अशा प्रकारे इस्लामने इस्लामी जिहादचा उद्देश हा युध्द बाकी न राहण्याचा म्हणजेच शांती व सलोखा राखण्याचा आहे.

**मुस्लिमेतर नागरिकांचे हक्क** - आता आपण मुस्लिमेतरांचे इस्लामी राज्यातील हक्कासंबंधी विचार करू या.

१) मुस्लिमेतरांच्या रक्ताची किंमत मुस्लिम व्यक्तीच्या रक्तासारखी आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्या काळात एका मुस्लिमाने एका मुस्लिमेतराची हत्या केली तेव्हा पैगंबर मुहम्मद (स.) यांनी त्या मुस्लिमाला ठार करण्याचा आदेश दिला.

२) व्यापारात दोघांचा दर्जा सारखाच आहे. आणि गुन्हासाठी शिक्षासुध्दा मुस्लिम आणि मुस्लिमेतरासाठी एकसमान आहे. चोरी करण्यावर हात तोडणे, व्यभिचारासाठी फटके मारणे इ.

३) दिवाणी कायद्यातसुध्दा दोन्ही समान आहेत. दोघांच्या संपत्तीची सुरक्षा सारखीच आहे.

४) गैरमुस्लिमांना त्रास देणे, शिवीगाळ करणे, मारणे अथवा निंदा करणे अवैध आहे ज्या प्रकारे मुस्लिमांसाठी आहे.

५) करार केल्यानंतर त्यावर चालणे अथवा करार तोडून देण्याचे मुस्लिमेतरांना स्वातंत्र्य आहे परंतु मुस्लिमांना एकदा करार केला तर तो मुदत संपेपर्यंत तोडता येत नाही.

६) मुस्लिमेतर कितीही मोठा गुन्हा करो त्याला करार बाह्य केले जात नाही त्याचे उत्तरदायित्व आबाधित राहते. फक्त इस्लामी शासना विरुध्द बंड आणि शत्रुपक्षाला जाऊन मिळणे हे दोन अपराध अक्षम्य आहेत.

७) मुस्लिमेतरांचे वैयक्तिक कायदे आबाधित ठेवले जातील त्यांच्यावर मुस्लिम कायदा लादला जाणार नाही.

८) पूर्वीची धर्मस्थळे आणि मूर्ती यांना आबाधित ठेवले जाईल परंतु ते तुटले तर त्याजागी नवीन बनविता येतील परंतु नव्याने धर्मस्थळे आणि मूर्ती बनविता येणार नाहीत.

९) परंतु ज्या वस्तीत मुस्लिम राहात नाहीत तेथे नवीन धर्मस्थळे आणि मूर्ती स्थापित करता येतील.

१०) जिझिया आणि खिराज कर वसुलीकरिता मुस्लिमेतरांवर अत्याचार व बळजबरी करणे निषिध्द आहे. त्यांच्यावर त्यांच्या कुवतीपेक्षा जास्त ओझे टाकणे गैर आहे.

११) जे मुस्लिमेतर असहाय आणि विवश झाले असतील त्यांना जिझिया माफ फक्त न करता राजकोषातून खावटी दिली जाईल. ही एक नियमित व्यवस्था राहील.

१२) एखाद्या गैरमुस्लिमाचे निधन झाले आणि त्याच्या नावावर जिझिया देणे बाकी आहे तर ती रक्कम त्याच्या वारसदारकडून वसूल केली जाणार नाही.

१३) ज्याप्रमाणे मुस्लिम व्यापाऱ्याकडून मालावर कर आकारला जातो तसाच कर मुस्लिमेतराच्या व्यापारी मालावर आकारला जाईल.

१४) मुस्लिमेतरांना लष्कराच्या सेवेतून मुक्तता आहे. शत्रुशी लढणे हे फक्त मुस्लिमांचेच कर्तव्य ठरविले गेले आहे. जिझिया हा त्यांच्याकडून त्यांच्या सुरक्षिततेसाठी वसूल केला जातो.

इस्लामी विधी–विधानातील काही नियम आपण पाहिले. इस्लामने

मुस्लिमेतरांबरोबर जो न्याय आणि सलोख्याचे संबंध ठेवले तसे उदारण इतिहासात आणि आजच्या तथाकथित सभ्य, सुसंस्कृत देशांमध्येसुध्दा सापडणे कठीण आहे. हे नियम फक्त कागदावरचे नियम नाहीत तर त्यांचा ऐतिहासिक पुरावा इस्लामी शासन काळातील इतिहासात आपणास प्रत्यक्ष दिसून येतो. त्याचा सविस्तर उल्लेख येथे करणे अशक्य आहे.

**मुस्लिमेतरांच्या पोशाखाचा प्रश्न** - याविषयी अनेक गैरसमज हेतुपरस्पर पसरविण्यात आले आहेत. पूर्वी ओळखपत्राची पध्दत नव्हती तर पोषाखाद्वारे एखादा समाज अथवा धर्माचे अनुयायी ओळखले जात असत. आजसुध्दा ही पध्दत पोषाखाविषयीची काही धर्मात प्रचलित आहे. मुस्लिम आणि मुस्लिमेतर त्या काळी ओळखले जावेत यासाठी काही विशिष्ट पोषाख मुस्लिमेतरासाठी तात्कालिन स्वरुपाचा ठरविण्यात आला होता. माननीय अबू बकर (रजि.) आणि माननीय उमर (रजि.) यांच्या शासन काळात हा नियम याचसाठी ठरविण्यात आला होता की मुस्लिम आणि मुस्लिमेतरांची ओळख पटावी. परंतु त्याला एक चुकीचे स्वरूप देऊन इस्लामला बदनाम करण्यात आहे. याविषयी इस्लामचा स्थायी नियमतर फक्त हा आहे की मुस्लिमेतर आपला राष्ट्रीय अथवा पारंपारिक पोशाख घालतील आणि मुस्लिमासारखे दिसू नये.

वरील विवेचनावरून तुमच्या हे लक्षात आले असेल की युध्दासंबंधी प्रत्येक बाबींना इस्लामी कायद्याने एका मजबूत कानून (नियम) मधे दृढतेने नियंत्रित केले आहे. युध्दातील पाशवी अमानवी प्रकारांना कायमचे समाप्त केले. युध्दासंबंधी नवीन कायदे बनविण्यात आले ज्यात लवचिकता ठेवण्यात आली. काही जुने कायदे तसेच ठेऊन त्यात सुधारणेचा भरपूर वाव ठेवण्यात आला. स्वत: पैगंबर मुहम्मद (स.) आणि त्यांचे सहाबी (साथीदार) यांनीही जगापुढे युध्दासंबंधी एक आदर्श जगापुढे शाश्वत स्वरूपात ठेवला आहे. कुरआन आणि हदीसीच्या प्रकाशात आजच्या युगातील युध्दासंबंधी नवीन नियम तयार करून हेतु साध्य करण्यास वाव ठेवण्यात आला आहे.

## प्रकरण ७

या प्रकरणात आपण सध्या जगात प्रचलित युध्दकायद्यांचा मानवतेच्या आणि सभ्यतेच्या दृष्टिकोनातून अभ्यास करू या. मागील प्रकरणातून आपण पाहिले आहे की इस्लामने युध्दाला एक मानवीय व सभ्यतापूर्ण चेहरा प्रदान केला आणि युध्दाच्या खऱ्या हेतुकडे जगाला मार्गदर्शन केले. संपूर्ण जग युध्दाच्या खऱ्या हेतुपासून तोपर्यंत अनभिज्ञ होते. आजच्या प्रगत जगात विज्ञानाच्या आणि तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे युध्दासंबंधी समूळ बदल झाला आहे आणि युध्दाच्या नियमांमध्ये आमूलाग्र बदल घडून आले आहेत. या स्थितीत इस्लामी जिहाद आणि आजचे युध्द यांना समोरासमोर ठेवून तुलना केल्यास वाचकाला समजून येईल की युध्दाचा खरा हेतु कोणता आहे. मानवी समाजाची संस्कृती आणि जडणघडणबद्दल माहिती तीन स्त्रोतांद्वारे आपण प्राप्त करू शकतो. एक धर्म, दुसरा स्त्रोत साहित्य आणि तिसरा सामाजिक रूढी-परंपरा. धर्माला तर आधुनिक संस्कृतीने "वैयक्तिक बाब" ठरविली आहे. त्यामुळे आजच्या सामाजिक जीवनावर धर्माचा काहीही प्रभाव नाही. साहित्याच्या क्षेत्रात पाश्चिमात्य जगात फार मोठी प्रगती झाली आहे. पाश्चिमात्य साहित्यिकांनी युध्दाच्यासंबंधी फार काही लिहून ठेवले आहे. सामाजिक नियमावली बनविण्यात साहित्यिकांच्या विचारांचा मोठा पगडा आहे. परंतु जगातील श्रेष्ठ साहित्यिकांचा विचार म्हणजे देशासाठी कायद्याची जागा असे कधी घडलेले नाही. युध्दासंबंधीचे पाश्चिमात्य अफाट साहित्य याच कारणाने आज कुचकामी ठरले आहे. आता तिसरा स्त्रोत आहे सामाजिक रीती–रिवाज व परंपरा हे दोन प्रकारचे आहे. एक लिखित आणि दुसरा अलिखित. लिखित उदाहरणात आंतरराष्ट्रीय कायद्याचा समावेश होतो. अलिखित कायद्यामध्ये प्रत्यक्ष राजकारण आणि आपापसातील संबंध यांचा समावेश होतो. या दोघांमध्ये कोणता कायदा हा प्रामाणिक कायदा आहे? कोणावर जास्त विश्वास ठेवला जावा? अशा अनेक प्रश्नांची उत्तरें पाश्चिमात्यांना आज तागायत देता आलेली नाहीत. याकडे आपणास लक्ष देण्याची गरज नाही. युध्दाच्या खालील दोन बाबींचाच येथे आपण विचरा करू या.

**१) युध्दशिष्टाचार** - युध्दशिष्टाचारावर प्रथम लक्ष केंद्रित करू या. प्रथम हे पाहू या की पाश्चिमात्य सभ्यता युध्दाकडे कोणत्या दृष्टीने पाहते? युध्दशिष्टाचाराकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन कसा आहे? कोणत्या हेतुसाठी युध्द करणे त्यांना मान्य आहे आणि कोणत्या हेतुसाठी अमान्य? या बाबींमध्ये पाश्चिमात्याकडे काही श्रेष्ठ हेतु असल्यास तो कोणता? या प्रश्नांची उत्तरे आपण प्रथमत: शोधण्याचा प्रयत्न करू या. खरे पाहता वरील प्रश्नांच्या उत्तराबाबत पाश्चिमात्य कायदेप्रणाली अनभिज्ञ आहे. प्रा. लॉरेन्स आपला ग्रंथ 'आंतरराष्ट्रीय कायदे प्रणाली'मध्ये लिहितात,

"सध्याचे आंतरराष्ट्रीय कायदे हे शिष्टाचारासंबंधी अपरिचित आहेत आणि त्याच्याकडे हा कायदा दुर्लक्ष करतो."

प्रा. निपोल्ड लिहितात, "या दृष्टीने गुन्हाचा प्रश्न हा आंतरराष्ट्रीय कायद्यात गुन्ह्याचा प्रश्न होत नाही. तर तो शिष्टाचाराचा प्रश्न आहे. परंतु आंतरराष्ट्रीय कायदा वैध आणि अवैध युध्दात फरक करत नाही कारण युध्द हे आंतरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टिकोनातून वैध अवधैतेच्या पलीकडचे आहे." (येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की हा ग्रंथ पहिल्या महायुध्दाच्या नंतर लिहिला गेलेला आहे. म्हणून येथे फक्त पहिल्या महायुध्दाबद्दलच चर्चा केली गेली आहे. यानंतर जगाने दुसरे महायुध्द अनुभवले आहे की जे क्रुरतेच्या आणि अत्याचाराच्या बाबतीत अद्वितीय आहे आणि प्रथम विश्वयुध्दाच्या कितीतरी पटीने महाभंयकर आहे.)

अशा प्रकारे लिखित अथवा अलिखित कायद्यात वैध अवैध, चांगले वाईट, सत्य आणि असत्य यात काहीच फरक केला गेला नव्हता. त्यामुळे आपण हे सिध्द करू शकत नाही. की कोणत्या हेतुसाठी पाश्चिमात्य सभ्यता युध्दाला वैध ठरवते आणि कोणत्या हेतुसाठी अवैध? डॉ. वाही यांच्या मतानुसार "युध्द आंतरराष्ट्रीय कायदा लिखित अथवा अलिखित असला तरी तो खरा कायदा आहे." जी पाश्चिमात्य राष्ट्रें आपल्याच संस्कृतीला सभ्य संस्कृती समजतात त्यांच्याजवळ सत्यासाठी आणि न्यायासाठीचे युध्द कोणते आहे? यासाठी त्यांच्यातील लहान सहान लढायांचा आपण येथे विचार करणार नाही. आपण येथे पहिल्या महायुध्दावरच विचार करू या. ज्यामध्ये पाश्चिमात्य राष्ट्रांचे आणि धार्मिक गटांचे सर्व प्रतिनिधित्व होते. यावरून आम्हास कळते की पाश्चिमात्यांजवळ वैध आणि अवैध युध्दासंबंधी कोणत्या प्रकारचे शिष्टाचार आहेत.

**प्रथम महायुध्दाची कारणमींमासा** - इ. सन १९१४ ते १९१८ चे विश्वयुध्द हे विशेषत: युरोपाच्या सहा मोठ्या राष्ट्रांच्या दरम्यान झाले होते. त्यात प्रत्यक्षात काही लहानसहान देशसुध्दा सहभागी आले होते. एक गट जर्मनी व आस्ट्रियाचा होता तर दुसरा गट इंग्लड, फ्रान्स इटली आणि रशिया यांचा होता. या दोन गटांत आपापसातसुध्दा ऐतिहासिक काळापासून शत्रुत्व होते परंतु ते विश्वयुध्दाच्या वेळी आपापसातील शत्रुत्व आणि मतभेदांना विसरून एकदुसऱ्या गटाविरूध्द लढण्यास सिध्द झाले. इंग्लड फ्रान्सचा शत्रू होता. इंग्लड आणि रशिया या दोघांत कट्टर शत्रुत्व होते. २० व्या शतकापर्यंत हिंदुस्थानवर रशियाच्या आक्रमणाच्या भीतीने इंग्लंड सतत सतर्क राहत होता. फ्रान्स आणि इटलीत प्रदेशावरून शत्रुत्व होते त्यामुळे इटली विश्वयुध्दापर्यत जर्मनीशी मैत्री बाळगून होता. परंतु विसाव्या शतकात हे सर्व देश विशिष्ट ध्येयापोटी एकत्र आले आणि

दुसऱ्याविरुध्द म्हणजे जर्मन ऑस्ट्रिया उभे ठाकले. सन १९०४ पर्यंत जर्मनी इंग्लडचा मित्र देश होता. सन १९१४ पर्यंत त्यांचे एकमेकांचे करार होते. सन १९०७ पर्यंत रशिया जर्मनीचा मित्र होता. परंतु काही कारणांमुळे या मैत्रीचे रूपांतर शत्रुत्वात झाले आणि जर्मनीला आपल्या एकेकाळच्या शत्रुबरोबर (ऑस्ट्रिया) एकी करून आपल्या जुन्या मित्रांविरुध्द युध्द पुकारण्यास भाग पाडले होते.

ही कारणे कोणती होती? ते तर धर्माने सर्व ख्रिश्चन होते त्यामुळे धर्माचा काही संबंध नव्हता. कोणी कुणावर आक्रमणसुध्दा केले नव्हते. हक्कांच्या बाबतीतसुध्दा काही कारण नव्हते. सर्व आपल्या हक्कांचे रक्षण करीत होते. मग काय कारण होते की त्या राष्ट्रांना एकमेकांविरुध्द लढण्यास बाध्य केले गेले? ऐतिहासिक अवलोकन केल्याने हेच मूळ कारण समोर येते की प्रत्येक राष्ट्र आपल्या हिस्यापेक्षा जास्त प्रदेश व संपत्ती प्राप्त करू पाहत होते. दुसऱ्या राष्ट्राला दाबून, अत्याचार करून अथवा संपवून स्वत:ची तुंबडी भरावी हाच एकमेव उद्देश होता. त्यांच्यामध्ये शत्रुत्वाचे बीज प्रथम इ. स. १८७० मध्ये पेरले गेले जेव्हा जर्मनी ने फ्रान्सचा काही भूभाग बळकावला होता. जर्मनीची औद्योगिक आणि आर्थिक प्रगती वेगाने होत गेली. एकोणावीसव्या शतकात जर्मनी जगातील एक प्रगत आणि व्यापारी देश बनला. त्याने इंग्लडला शह देण्यासाठी नव वायुसेना प्रबळ बनविली. हे इंग्लडच्या लक्षात आल्यावर त्याने जर्मनीशी मैत्रीसंबंध दृढ करण्याचे प्रयत्न केले परंतु जर्मनीने दाद दिली नाही कारण जर्मनीला स्वत: महासत्ता बनायचे होते. म्हणून दोघांचे संबंध बिघडत गेले. त्यामुळे वैश्विक राजकारणात फार मोठ्या प्रमाणात उलथापालथ झाली. इंग्लड आणि फ्रान्स एकमेकांचे जुने शत्रु आता मित्र झाले होते. त्यांना इ. स. १९०७ मध्ये रशिया येऊन मिळाला. रशियाचा त्यात मोठा स्वार्थ होता. त्याला दर्रा दानियाल आणि बास्फोरस या प्रदेशांना मिळंकृत करावयाचे होते. याविरूध्द जर्मनी आणि आस्ट्रिया हे दोघे होते. जर्मनीला बर्लीनपासून बगदादपर्यंत रेल्वे लाईन टाकून व्यापार वाढविणे होते. आस्ट्रियाला बल्कान प्रदेशावर व्यापार वाढविण्यासाठी कब्जा करावयाचा होता. इ. स. १९०८ मध्ये त्याने याचसाठी बोस्निया आणि हर्ज गोनियावर ताबा मिळविला होता. सन १९०७ पर्यंत इंग्लंड रशियाच्या राजकीय विचारांचा विरोध करत राहिला होता. परंतु इंग्लंडला जेव्हा हे कळले की रशियाच्या मदतीशिवाय तो जर्मनीचा गळा घोटू शकत नाही. तेव्हा इंग्लंडने आपल्या जुना शत्रु रशियाशी मैत्री केली. अशा प्रकारे दोन प्रमुख गट तयार झाले. आपले व्यापारी उद्देश आणि आपली राजकीय सत्ता वाढवून प्रबळ करण्यासाठी ते एकमेकांना शह देऊ लागले. याच एकमेव कारणासाठी ते आपापसातील चालत आलेल्या शत्रुत्वाला दूर करून मैत्री दृढ करू लागले. एकमेकांना मदत करू लागले होते. इटली मात्र तोपर्यंत या

गटबाजीमध्ये सामील नव्हता. जर्मनीबरोबर त्या काळी इटलीचा मैत्रीकरार झाला होता. इटली आपल्या जर्मन मित्राला सोडून अचानक दुसऱ्या गटाशी कसा जावून मिळाला? हा एक गूढ प्रश्न आहे. इटली दोस्त राष्ट्रांशी संबंध या अटींवर ठेवले की त्याला ट्युनिशियाचा कब्जा मिळविण्यासाठी फ्रान्सबरोबर युध्द करण्याचा प्रसंग आला तर जर्मनीपासून मदत इटली घेऊ शकते. आस्ट्रियाचे काही प्रदेश ज्यावर इटलीचा ताबा होता त्यांना शत्रुराष्ट्र (जर्मनी व ऑस्ट्रिया) हिसकावून घेऊ लागले तर इटलीच्या मदतीला दोस्त राष्ट्रांनी धाऊन यावे. इंग्लंडच्या सामर्थ्यांवान नवसेना ही फ्रान्सबरोबर आहे आणि अशा स्थितीत फ्रान्सपासून टुनिशियाचा प्रदेश बळकाविण्यासाठी इटलीला जर्मनीची साथ मिळू शकणार नाही. हे जाणून इटली दोस्त राष्ट्रांना जाऊन मिळाला आणि सत्यप्रियतेचे घोंगडे पांघरून दावा करू लागला की आम्ही जर्मनी आणि ऑस्ट्रिया दोघांना असत्य व शत्रु मानतो.

**युध्दाची सुरवात** - दि. १४ जूनला जेव्हा आस्ट्रियाचा एक नागरिक सरबियी मारला गेला तेव्हा उपद्रवाची ४४ वर्षापासून धगधगत असलेल्या आगीचा भडका झाला. आस्ट्रियाने सर्बियाला समाप्त करण्याची सुवर्णसंधी चालून आली हे समजून बल्कानियाला गिळंकृत करण्याच्या मार्गातील हा काटा (सर्बिया) कायमचा दूर करण्यासाठी जर्मनी त्याच्या मदतीला धावून आला, कारण जर्मनीलासुध्दा व्यापार वाढविण्यासाठी सर्बियाचाच अडसर होता. दुसरीकडे रशिया सर्बियाला आपला लहान भाऊ समजत होता त्याचासुध्दा डोळा बल्कान प्रदेशावर होता म्हणून रशिया सर्बिदाच्या मदतीला धावून गेला. फ्रान्ससुध्दा याच राजकीय स्वार्थापोटी रशियाला जावून मिळाला. इंग्लंडला एकटे राहाणे अशक्य होते. त्याच्या कथित 'सभ्यताप्रिय आणि सत्यप्रियते'मुळे जगात जो ढिंडोरा त्याने केला होता, त्यामुळे अनेक शिष्टाचाराच्या जबाबदाऱ्या त्याच्यावर आलेल्या होत्या. त्यांना पार पाडण्याचा बहाणा करून जर्मनीच्या वाढत्या प्रभावाला खतम करण्यासाठी इंग्लंडने हत्यार उचलले. त्यामागे छुपा एजेंडा व्यापार उदीम वाढविण्याचा कार्यरत होता. अशा प्रकारे स्वधर्मिय राष्ट्रांनी ते महान युध्द छेडले ज्याच्यासारखे उदाहरण मागील इतिहासात विविध धर्मियांच्या लढायामध्येसुध्दा दिसून येत नाही.

**युध्दाचा हेतु** - या युध्दात सामील प्रत्येक राष्ट्र हा दावा करीत होते की ते आपल्या हितरक्षणासाठी लढत आहेत. तसेच स्वत:चे हक्कासाठीच नव्हे तर दुसऱ्या कमजोर, लहान राष्ट्रांची स्वतंत्रता आबाधित ठेवण्यासाठी आणि जगातून अत्याचार आणि उपद्रव समाप्त करून जगात सुखशांती स्थापन करून हक्कांचे आणि सत्याचे रक्षण करणे हा हेतु या युध्दाचा आहे. परंतु युध्दाच्या वेळी आणि युध्द समाप्तीनंतर त्या तथाकथित 'सत्यप्रिय' राष्ट्रांनी ज्या

प्रकारे देश आणि प्रदेशांची लेनदेन केली आणि राज्यांना आपापसात वाटून घेतले यावरून हेच सिध्द होते की पाश्चिमात्य संस्कृतीत व सभ्यतेत 'सत्य' हे काय आहे. सन १९१७ मध्ये आस्ट्रिया हंगेरीच्या राजाने (कार्ल) प्रयत्न केला होता की आपल्या दोस्तांपासून अलग होऊन इंग्लंड, फ्रान्स आणि इटलीशी वेगळा करार करावा आणि यासाठी त्याने बारबल राजपुत्र सिक्ते याच्याशी संधान साधून इतर राष्ट्रांशी (मित्र) बोलणी सुरू केली. त्याचा तपशील त्या राजपुत्राने स्वत: 'ऑस्ट्रियाचा शांतता करार' म्हणून ग्रंथबध्द करून ठेवला. त्या ग्रंथानुसार या विश्वयुध्दाच्या हेतुसंबंधी पूर्ण तपशील कळून येतो. एकमेकांचा प्रदेश गिळंकृत करणे हा प्रमुख हेतु या प्रथम विश्वयुध्दात कार्यरत होता. इंग्लंड आणि फ्रान्स यांनी इटलीला दगा देऊन युध्दात सामील केले होते की आस्ट्रियाचा दक्षिण भाग (प्रदेश) त्याला दिला जाईल. फ्रान्सला हे पाहिजे होते की ऑस्ट्रियाला जर्मनीपासून अलग करावे म्हणून त्याने इटलीवर दबाव आणला होता. परंतु इटलीने विरोध केला. त्यामुळे दोस्त राष्ट्रांना असे वाटू लागले की इटली 'सत्याची' बाजू सोडून 'असत्या'ची (जर्मनी) ची बाजू तर घेणार नाही ना? इटलीने वांरवार घोषित केले की तो युध्दात ऑस्ट्रियाचा प्रदेश बळकावण्यासाठीच सामील झाला आहे. इटलीची ईर्षा त्याला कोणत्याही बदमाश कृत्य करण्यास प्रवृत्त करेल अशी भीती त्या वेळी इतर मित्रराष्ट्रामध्ये होती. तात्कालिन फ्रान्स राजदूत कांबो लिहितो की, "इटली आमच्यासाठी काही करू शकत नाही. त्याचा फक्त एकमेव हेतु आहे तो म्हणजे युध्द समाप्तीनंतर जेव्हा इतर राष्ट्र थकलेले असतील तेव्हा त्यांच्या प्रदेशांना बळपूर्वक गिळंकृत करावे."

अशा प्रकारचाही नंतर 'छुपा एजेंडा' या दोस्त व तथाकथित सत्यप्रिय राष्ट्रांचा युध्द करण्या मागचा होता. (अफगणिस्तान व इराक या दुर्बल व लहान स्वतंत्र राष्ट्रांवर आक्रमण करण्यामागे आजच्या युगाचा दादा अमेरिकेचासुध्दा अशा प्रकारचा 'छुपा एजेंडा' कार्यरत आहे.) हे तथाकथित 'सत्यप्रिय' दोस्त राष्ट्र एकमेकांविरुध्दसुध्दा डाव साधून होते. बहाणा मात्र 'सत्यासाठी' युध्दाचा होता! जेव्हा हे उघड झाले की इटली ऑस्ट्रियाशी करार करण्यास तयार होत नाही तेव्हा याच 'सत्यप्रिय' राष्ट्रांनी ऑस्ट्रियाला सांगितले की तुम्ही इटलीसाठी तो प्रदेश सोडून द्या आणि त्याबदल्यात आम्ही जर्मनीकडून सहिसिया आणि बुटारिया हे प्रदेश बळाने हडप करून तुम्हाला देऊ. हे दोन्ही प्रदेश जर्मनबहुल होते. हे सत्यप्रिय दोस्त राष्ट्र ऑस्ट्रियाला (जो युध्दात जर्मनच्या बाजुने होता) ते जर्मन प्रदेश स्वत:चे समजून ऑस्ट्रियाला दिले आणि ऑस्ट्रियानेसुध्दा आपल्या मित्र राष्ट्राचा लचका तोडला ऑस्ट्रियाची नुकसानभरपाई करण्यासाठी दोस्त राष्ट्र आणखी काही प्रदेशावर डोळा ठेवून होते. त्यांची तुराब्लस प्रदेशावर नजर गेली, परंतु इटली त्यास सोडण्यास तयार नव्हता, कारण इटलीला ऐतिहासिक रोम

साम्राज्याचे स्वप्न पडत होते. इरिट्रिया आणि तरीलेंड प्रदेश त्याला देण्याचे ठरले इटलीने मान्यता दिली, कारण त्या प्रदेशात त्याचा काही फायदा नव्हता, तरी पण काही कारणामुळे हे घडू शकले नाही. इटलीला बाजूला सारून ऑस्ट्रियाशी दोस्तराष्ट्रांनी छुपा करार करण्याचा प्रयत्नांना तडा गेला.

**छुपे करार** - युध्दाच्या वेळी दोस्तराष्ट्रांत छुपे करार झालेले होते. ही आंतरराष्ट्रीय दरोड्याची दोस्तराष्ट्रांची (आंतरराष्ट्रीय दरोडेखोर) योजना पडद्यातून उजेडात तेव्हा आली, जेव्हा रशियात ऐन युध्दकाळात क्रांती झाली होती. सन १९१७ मध्ये जेव्हा झार साम्राज्याचे पतन झाले आणि बालशेविकाची सत्ता आली. त्यांनी भांडवलदारांना बेनकाब करण्यासाठी त्यांचे सर्व छुपे एजेंडे (छुपे करार) उघड करून टाकले. अशा प्रकारे त्या स्वधर्मिय (ख्रिश्चन) दोस्त राष्ट्रांचे खरे रूप आणि विश्वयुध्दाचा खरा हेतु जगासमोर आला. त्या छुप्या करारात इतर कोणत्या देशांचे लचके कोणी तोडायचे याचा तपशील होता. अलीस आणि लारेन हे प्रदेश फ्रान्सला देण्यात यावे हे दोन्ही प्रदेश जर्मनबहुल लोकांचे होते आणि जर्मनीचा तो प्रदेश होता. तसेच रेहान नदीच्या पश्चिमेला जर्मनीला जेवढा प्रदेश आहे तो सर्व फ्रान्सच्या हवाली करण्यात येईल. या कराराला फ्रान्स आणि रशियाने आपल्या मित्र राष्ट्र इंग्लंडपासूनसुध्दा लपवून ठेवले होते. हे उघड तेव्हा झाले जेव्हा युध्द संपल्यानंतर 'युध्दलुटी'चे हिस्से पाडण्यात येत होते. तिसरा करार हा होता की जॉर्डन जो फ्रान्सच्या ताब्यात होता त्याला फ्रान्सचा प्रदेश गणले जाईल आणि जर्मनीचे ताब्यातील सर्व अफ्रिकी प्रदेश फ्रान्सची होतील आणि तुर्कीचासुध्दा मोठा हिस्सा देण्यात येईल. हा होता 'सत्यप्रिय' फ्रान्सचा हिस्सा (लचका).

इटली जो सत्यासाठी असत्याची बाजू (जर्मनी) सोडून दोस्त राष्ट्रांत (आंतरराष्ट्रीय दरोडेखोर) सामील झाला होता. त्यालासुध्दा त्याचा हिस्सा देणे भाग होते. त्यालासुध्दा तरतीनो, तरलिता, इ. प्रदेश देण्याचे ठरले. तुर्कीच्या ताब्यातील बराच प्रदेश देण्याचे ठरले होते. रशिया तर सत्याचा श्रेष्ठ दावेदार! पोलंडच्या बाबतीत समझोता झाला. त्याच पोलंडला युध्द सुरू होतांना स्वतंत्रतेचे आश्वासन दोस्त राष्ट्रांनी दिले होते. परंतु युध्द संपल्यानंतर त्याचे लचके तोडण्यात आले. बास्फोरस, दर्रा दानिया, कस्तनतिनिया इ. प्रदेश रशियाला बहाल केला जाईल. एक रशियन पत्रकार लिहितो, "ह्या छुप्या करारानुसार रशियाला आस्मानिया, आस्ट्रिया, हंगेरी हे पूर्ण युध्दसंपत्ती म्हणून माणले गेले होते. ज्यांना दोस्त राष्ट्रात वाटून घेण्याचे ठरले होते."

आता राहिला इंग्लंड जो दोस्त राष्ट्रांचा मार्गदर्शकच्या भूमिकेत मिरवत होता. तुर्कीबरोबर युध्दाला सुरवात होण्याच्या पाच महिन्याअगोदर त्याने फ्रान्सबरोबर छुपा करार केला

ज्यात अरब राष्ट्रांना दोन भागात विभागले गेले. एक इजिप्त आणि दुसरा इराक, पहिल्यासाठी फ्रान्स आणि दुसऱ्या विभागासाठी (इराक इ.) इंग्लंडची मालकी ठरविण्यात आली. या दुष्ट हेतुसाठी अरबांबरोबर चाल खेळली गेली. अरबांनी त्याशी हातमिळवणी करून त्यांना तुर्की साम्राज्य नष्ट करण्यासाठी मित्र राष्ट्रांची मदत करण्यास भाग पाडले. त्यासाठी अरबांना अरब साम्राज्यांचे आमीष दाखविले. या स्वतंत्र अरब साम्राज्याच्या स्वप्नामुळे त्यांनी सन १९१५ मध्ये दोस्त राष्ट्रांशी एक छुपा करार केला होता. या कराराच्या एक वर्षानंतर (सन १९१६) शरीफ हुसेन याने तुर्कीच्या विरोधात बंड पुकारले. इराक, इजिप्त आणि लेबेनन मध्ये बंडाचा भडका झाला. अरबराष्ट्रांत तुर्की साम्राज्य टिकाव धरू शकणार नाही हे उघड झाले. फ्रान्स आणि इंग्लंडचा हेतु साध्य होणार होता. यासाठी नोव्हेंबर १९१६ साली दोन्ही देशांदरम्यान पुन्हा चर्चा सुरू झाली. गुप्त एंजेडा तयार झाला व छुपा करार होऊ घातला. हा करार 'सायकस पॅक्ट' नावाने प्रसिध्द आहे. करारानुसार ठरले की इराकचा भाग ब्रिटनच्या ताब्यात राहील व जॉर्डनचा भाग फ्रान्सच्या ताब्यात राहील. फिलीस्तीन हे एक आंतरराष्ट्रीय प्रदेश म्हणून घोषित केले. हैफा बंदर मात्र ब्रिटनच्या ताब्यात राहील. इराक आणि जॉर्डनच्यामध्ये जे राष्ट्र आहेत, त्यांचे दोन भाग केले जातील. एक भाग ब्रिटनला आणि दुसरा फ्रान्सला दिला जाईल. परंतु इ. स. १९१५ साली एक छुपा करार रशिया आणि ब्रिटन या दोघांत झाला होता. यानुसार आर्मेनिया, दक्षिण कझकिस्तान आणि तुर्कीचा काही भाग रशियाला दिला जाईल. परंतु ब्रिटन रशियाच्या सीमांना आपली सीमा भीडवू शकत नव्हता म्हणून दोघांच्या सीमेंदरम्यानचा प्रदेश फ्रान्सला वाटून देण्याचा निर्णय त्या करारात झाला होता. परंतु रशियापासून आपल्याला धोका अजिबात नाही हे कळल्यावर ब्रिटनने करार मोडून रशिया नजिकचा प्रदेश फ्रान्सशी दोस्तीला पायदळी तुडवून बळकावला होता.

**युध्दानंतर राष्ट्रांची वाटणी** - हा होता विश्वयुध्दाचा हेतु ज्यासाठी 'सत्यप्रिय' मित्र राष्ट्र पाश्चात्य देश हे युध्दात उतरले होते. आता आपण पाहू या की युध्द संपल्यानंतर या पाश्चात्य राष्ट्रांनी आपल्या सत्यनिष्ठतेचा काय पुरावा जगापुढे सादर केला.

युध्दाच्या शेवटच्या काळात दोन प्रसंग घडले ज्यामुळे सन १९१५ आणि १९१७ साली झालेल्या छुप्या करारांच्या मुखवट्याला संपूर्ण बदलून टाकले. पहिला प्रसंग म्हणजे अमेरिका खुद्द युध्दात सामील झाला आणि दुसरा महत्त्वाचा प्रसंग रशियाची क्रांती होता. अमेरिका युरोपच्या बाबतीत असलेली तटस्थ भूमिका सोडून युध्दात यासाठी सामील झाला की जगात आपला व्यापार वाढावा. अमेरिकेला धोका वाटत होता की युध्दानंतर पराजित राष्ट्रांचे एकमेकांना वाटप हे दुसऱ्या महायुध्दाचा पाया न ठरो. सन १९१७ सालात रशियात क्रांती होऊन सत्ता पालट झाले. जे दोस्त राष्ट्रांसाठी खतरनाक होते. त्यामुळे रशियाला ठरल्याप्रमाणे 'हिस्सा'

देण्यात आला नाही. 'सत्यनिष्ठ' दोस्त राष्ट्रांना अमेरिकेच्या दबावा खाली काम करावे लागले. फ्रान्स आणि रशियात जो छुपा तह झाला होता, त्यानुसार कारवाई करण्यास सांगितल्यावर तत्कालिन फ्रान्सिसी अध्यक्षांनी स्मित हास्य करून म्हटले "मनुष्यासाठी हे आवश्यक नाही की त्याच्या मनातील गुप्त गोष्टी त्याने जाहिर कराव्यात" (आस्ट्रियाचा शांती करार - पृष्ठ ९९) अशा प्रकारे गुप्त करार करून ही 'सत्यनिष्ठांच्या' मनात त्या वेळी वेगळेच काही शिजत होते. युध्द संपल्यानंतर फ्रान्सने ठरल्याप्रमाणे रेहानचा प्रदेशाची मागणी केली. परंतु इंग्लड व अमेरिका एकत्र येऊन त्यांनी ती फेटाळली. युरोपला या असमान तत्त्वावर विभागून पुढे दुसऱ्या विश्वयुध्दाचा पाया घातला जातोय याची कल्पना ब्रिटनचे तात्कालिन पंतप्रधान मिस्टर लॉर्ड जॉर्ज यांनी १९१९ मध्ये समेट समितीसमोर दिली होती. त्यांनी सांगितले सर्वात मोठा धोका मला या स्थितीत दिसतो तो हा आहे की जर्मनी आपले संबंध बोलशीझमशी दृढ करून आपले सर्वस्व त्या वेड्या क्रांतिकारकांच्या हातात देईल जे जगाला तलवारीच्या नोकावर आपल्या तत्त्वप्रणालीला आत्मसात करण्यासाठी वेठीस धरील. (दुसऱ्या विश्वयुध्दात जगाने हा परिणाम उपभोगला आहे.) तरी स्वार्थ आणि हट्टीपणामुळे या सत्यनिष्ठांनी युध्दात उडी मारून त्यांनी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी ते सर्व काही केले जे ते सर्व दुसऱ्या विश्व युध्दाची नांदी समजून होते.

हा झाला 'सत्यनिष्ठवंतांचा' युरोपचा संक्षिप्त आढावा. आशिया खंडात स्थिती कशी होती, ते संक्षिप्तपणे पाहू या. अरब राष्ट्रांचे वाटप कशा प्रकारे आपापसात करावयाचे याबाबत वर खुलासा आलेला आहे. युध्द काळातच इराक, जॉर्डन आणि फिलिस्तीन ही राष्ट्रे ब्रिटनला आणि फ्रान्संच्या मध्ये वाटप करण्याचे ठरले होते. परंतु अरबांना हे दाखवून देण्यात आले होते की तुर्कस्थानच्या पंज्यातून त्यांची सुटका करण्यासाठी ही लढाई आहे. त्यांचे (अरबांचे) एक साम्राज्य बनविण्यासाठी ही लढाई आहे असे त्यांना पटवून देण्यात येत होते. (आज अफगणिस्तान आणि इराक या देशातील जनतेच्या आणि जगाच्या डोळ्यात अमेरिका जशी धूळफेक करत आहे) युध्द समाप्तीनंतर फ्रान्स आणि ब्रिटन यांनी संयुक्त जाहिरनामा काढला होता, "जगाला जर्मनीच्या अत्याचारापासून वाचविण्यासाठी हे युध्द होते. (स्वत:चा स्वार्थ त्यामागे होता) फ्रान्स आणि ब्रिटन त्या सर्व राष्ट्रांना जे तुर्कस्थानाच्या ताब्यात होती, त्यांनी स्वातंत्र्य बहाल करण्यासाठी होते." त्यांचा हा जाहिरनामा जगाच्या डोळ्यात धूळ फेकण्यासाठीच होता. जेव्हा फ्रान्सचे लष्कर जार्डनमध्ये आणि इराक व फिलिस्तीनमध्ये ब्रिटनच्या फौजा दाखल झाल्या तेव्हा अरब राष्ट्रांना त्या दोस्त राष्ट्रांचा कावा कळून आला. तुर्कस्थान आणि अरब राष्ट्रांत शत्रुत्व निर्माण करून आपले पाय या प्रदेशात मजबूत करण्याचा डाव दोस्त राष्ट्रांचा होता. (आज तेल संपत्तीवर डोळा ठेवून अरब राष्ट्रांना वश करण्याची जी फसवेगीरी अमेरिका करत आहे, तीच चाल त्या वेळी तेल संपत्ती हडप

करण्यासाठी दोस्तराष्ट्रांनी खेळली होती.) ब्रिटन आणि फ्रान्स यांनी आपल्या फायद्यासाठी स्वत:ला जास्त प्रदेश व्यापारी दृष्टिकोनातून हडप करता येण्यासाठी दीड दोन वर्ष या "लुटी"चे वाटप करण्यासाठी घालवले. जेव्हा अरब राष्ट्रांत प्रांतिय चळवळी सुरू झाल्या तेव्हा या दोघा दोस्तराष्ट्रांनी समझोता केला. इराक आणि फिलिस्तीन ब्रिटनला आणि जॉर्डन फ्रान्सच्या ताब्यात देण्याचे ठरले. हे वाटप डाकू लोक एखाद्या घराला लुटल्यानंतर करतात त्याचप्रमाणे होते. परंतु या पाश्चिमात्य सुसंस्कृत डाकूंनी याला 'सत्य' आणि 'न्यायनिष्ठे'चा रंग देऊन जगाला धोका दिला होता. जनरल गौड यांने त्यानंतर एक लाख फौजेसह जॉर्डनवर हमला करून जॉर्डन वश करण्यात आले. तुर्कस्थानाला वश करण्यासाठी जॉर्डन आणि इतर अरब राष्ट्रांची मदत घेण्यासाठी त्यांना दोन वर्षापूर्वीच यालुटारू पाश्चात्यांनी स्वातंत्र्याचे आमिष दाखविले होते आणि त्यांना आश्वासन देण्यात येत होते की तुमच्या देशांत तुमचेच राज्य (लोकशाही) असेल. परंतु हा सर्व धोका होता. (आजसुध्दा अमेरिका जगाला आणि विशेषकरून लहान लहान अरब राष्ट्रांना वश करण्यासाठी आतंकवादाचा बागुलबुवा तयार करून जगाला धोका देत आहे.)

दुसरीकडे इराकी जनतेने ब्रिटनच्या फौजेशी निकराची झुंझ दिली तेव्हा तलवारीच्या बळावर त्यांना चिरडले गेले. 'अत्याचारी' तुर्कीने इराकमध्ये १४ हजारपेक्षा जास्त फौज इराकमध्ये ठेवली नव्हती तिथे 'सत्यनिष्ठ' ब्रिटनने ९० हजारपेक्षा जास्त फौज आणून ठेवली होती. इराकमध्ये वर्षातून दोनशेपेक्षा कमी अरबांना तुर्की कंठस्तान घालत, तिथे एका वर्षात दहा हजारपेक्षा जास्त अरबांची 'सत्यनिष्ठ' ब्रिटनने हत्या केली. हे सर्व अत्याचार आणि हिंसाचार अरबांना विश्वासात घेऊन म्हणजे "आम्ही तुमचे शत्रु नाही तर आम्ही तुम्हाला स्वातंत्र्य (लोकशाही) बहाल करून देण्यासाठी करत आहोत." या आश्वासनाखातर केले. नंतर इराकमध्ये ब्रिटनने एक पिट्टू सरकार स्थापन केले. (जसे आज अमेरिकेने अफगणिस्थान आणि इराकमध्ये स्थापन केले आहेत.) अशा प्रकारे इराकच्या नशीबाचा पूर्ण वाली ब्रिटन बनला. अशा प्रकारे वरील मोजक्या उदाहरणावरून हे सिध्द होते की युध्दप्रसंगी आणि युध्दानंतर या पाश्चिमात्यांचे कारवाया पाहून त्यांची काय आणि कशी सत्यनिष्ठा आणि न्यायनिष्ठा होती आणि आहे, हे उघड होते आणि याच बनावटी, धोकेबाज हक्कांसाठी तलवार हातात घेणे पाश्चात्यांची संस्कृती व सभ्यता आहे.

१) आपला व्यापार–उदीम वाढविण्यासाठी जगाचा वापर करून घेणे.

२) व्यापारात एखादा प्रतिस्पर्धी पुढे जात असेल तर त्याला नष्ट करणे.

३) आपल्या ध्येयप्राप्तीच्या मार्गात जी राष्ट्रे येतील त्यांना वश करून आपल्या

ताब्यात घेणे.

४) राष्ट्रांराष्ट्रांत भांडणतंटे लावून देणे व आपला फायदा करून घेणे. लहान राष्ट्रांना आपला गुलाम बनविणे.

५) एखाद्या राष्ट्रांशी शत्रुत्व निर्माण झाले तर त्याचा विनाश करणे अथवा त्याला विवश करून सोडणे. वरीलप्रमाणे या 'प्रगत' पाश्चिमात्य राष्ट्रांची सत्यनिष्ठता आणि न्यायनिष्ठता होती आणि आजही कार्यरत आहे! यांच्या या बनावटी संस्कृती आणि सभ्यतेबद्दल वाचक निर्णय घेऊ शकतो. पाश्चिमात्यांच्या अशा या सामूहिक बनावटी कृत्यांनांच पाश्चिमात्य सभ्यता आणि संस्कृतीचे नामकरण केले आहे. पाश्चिमात्य संस्कृती आणि सभ्यता यापेक्षा दुसरे काय असू शकते? धर्माला तर त्यांनी राजकारणातून केव्हाच फारकत दिली होती. तसेच त्यांचा धर्मसुध्दा राजकारणाशी संबंध ठेवू शकत नाही. याच कारणाने युध्दाच्या वैध आणि अवैध उद्देशांबाबत पाश्चात्यांजवळ काही फरक नाही. पाश्चात्यांजवळ धर्म आणि राजकारण वेगवेगळे क्षेत्र आहेत, त्यामुळे पाश्चिमात्य संस्कृतीची श्रध्दा कोठून प्राप्त होते? हा मूळ प्रश्न आहे. काय ही श्रध्दाशीलता जी मानवी सभ्यतेसाठी अत्यावश्यक आहे ती त्यांनी पत्रकार, लेखक, कवी, साहित्यिक, तत्त्वज्ञ अथवा प्रवचनकारांकडून प्राप्त केली? एक दोन हजार नव्हे तर एक दोन अशी नावें त्यांनी दाखवावीत की जे पाश्चिमात्य संस्कृतीचे मापदंड आहेत. जर असे नाही तर आम्ही युध्दासंबंधी नैतिकता आणि वैधता पाश्चिमात्यांसाठीची कोठून प्राप्त करणार आहोत? याचा खुलासा वरील संक्षिप्त चर्चेतून आणि सद्यस्थितीद्वारे तुम्हा आम्हाला होत आहे.

**शांती स्थापित करण्याचे प्रयत्न-** युध्दासंबंधी पाश्चिमात्यांची नेकनियत सिध्द करण्यासाठी त्या प्रयत्नांचा हवाला दिला जातो जो काही वर्षांपासून युध्द रोखण्यासाठी केले जात आहे. तसेच शांती प्रस्थापित करण्यासाठी आणि युध्दाची खुमखुमी कमी करण्यासाठी प्रयत्न या पाश्चिमात्य राष्ट्रांकडून (विशेषत: अमेरिकेकडून) होत आहेत. त्यांच्या या प्रयत्नांच्या कावेबाजपणा पलिकडे जाऊन आम्ही जेव्हा वास्तविकतेकडे पाहतो तेव्हा कळते की युध्दाला रोखण्यासाठी नव्हे तर युध्द आणखी जास्त भडकविण्यासाठी हे प्रयत्न आहेत. प्रथम विश्वयुध्दानंतरच्या उद्‌भवलेल्या परिस्थितीमुळे संयुक्त राष्ट्रसंघाची स्थापना झाली. यामागे महत्त्वाचा उद्देश हा होता की युध्द आणि युध्दसामग्रीला नष्ट केले जावे. नियमानुसार (कलम नं.१६) जर राष्ट्रसंघाच्या एखाद्या सदस्याने दुसऱ्या सदस्यावर आक्रमण केले तर ते आक्रमण सर्व सदस्य राष्ट्रांवरचे मानले जाईल व सर्वांनी मिळून त्या आक्रमक राष्ट्राचा समाचार घ्यावा आणि त्याच्याशी सर्व प्रकारचे राजनैतिक संबंध तोडले जातील. तसेच

कोणत्याही प्रकारचे आर्थिक संबंधसुध्दा तोडले जातील. राष्ट्रसंघ यासाठी सदस्य राष्ट्रांकडून फौजा मागवू शकते.

अशा प्रकारे युध्द रोखण्याचे आणि विश्वशांती प्रस्थापित करण्याचे हे वरवरचे उपचार आज तागायत सिध्द झाले आहेत. जेणेकरून जगातील महासत्ता इतर लहान आणि गरीब राष्ट्रांना आपल्या काबून ठेवू शकतील. आज अमेरिका जगाचा दादा आणि 'खुदाई फौजदार' बनला आहे. त्याचे मूळ आपणास याच प्रवृत्तीत सापडते. जेव्हापासून संयुक्त राष्ट्रसंघ (युनो) स्थापन झाली तेव्हापासून आजतागायत मोठ्या राष्ट्रांना (महासत्ता) त्यांच्या चुकीचा जाब त्यांना विचारायची हिंमत युनोने आज तागायत दाखविलेली नाही. मात्र लहान लहान राष्ट्रांना महासत्तेच्या दबावाखाली अनेक प्रकारांची नियंत्रणे टाकून संपविण्याचाच प्रयत्न युनो आज तागायत करत आली आहे. आज युनो तर अमेरिकेच्या हाताखालचे बाहुले आहे. अशा प्रकारे पाश्चामात्य राष्ट्रांचा दांभिकपणा दिसून येतो. वरवर सांगावयास हे जगात शांती प्रस्थापित करण्यासाठी प्रयत्नशील आहेत. हिंसाचार व आतंकवाद जगातून हद्दपार करण्याचा जणू काही या महाभागांनी विडा उचलला आहे. मानवतेच्या कल्याणाचा ठेका या दांभिक पाश्चात्य राष्ट्रांनी घेतलेला दिसून येतो. परंतु वस्तुस्थिती पूर्वीपासून याविरुध्द आहे हे आपण वरील विवेचना वरून पाहिले आहे. त्यांच्यात आपापसातसुध्दा शत्रुत्व आतून धगधगत आहे. प्रत्येकजण दुसऱ्यावर मात करू पाहत आहे. लष्करी ताकद जो तो आपापली इतरांपेक्षा जास्त वाढवण्याच्या प्रयत्नात सतत लागलेला आहे, जेणेकरून समोरच्याचा नायनाट करून स्वत:चे वर्चस्व जगात सिध्द करता यावे.

**युध्दाचे आक्राळ विक्राळ स्वरुप** - येथपर्यंत युध्दासंबंधी जे काही वर्णन आले आहे ते पाश्चात्याच्या युध्दासंबंधीच्या शिष्टाचारासंबंधी आहे. आपण पाहिले की युध्दाचा हेतु हा पूर्वी जो होता तो आजसुध्दा जसा की तसाच आहे. जरी पाश्चिमात्य राष्ट्रांनी प्रगतीचे शिखर गाठले आहेत. युध्दसामग्रीमध्ये त्यांनी दैदिप्यमान प्रगती जरूर केली. परंतु युध्दाच्या हेतुसंबंधी ते एक इंच प्रगतीसुध्दा करू शकले नाहीत. त्यांची लष्करी सुसज्जता त्यांच्या लष्करांचे वैविध्य पूर्ण पोषाख, त्यांच्या जनरल लोकांचे नैपुण्य आणि लष्करी कयावतींचा दिमाखदारपणा पाहून लोक मंत्रमुग्ध होतात. परंतु त्यांच्या युध्दाच्या हेतुसंबंधी जो आत्मा कार्यरत आहे. तो पूर्वीपेक्षा आजच्या या प्रगत वैज्ञानिक आणि तंत्रज्ञ युगात अनेक पटीने भयानक बनला आहे. प्राचीन काळातील पाशवी युध्द हेतु आजसुध्दा तसाच कार्यरत आहे त्यांच्या पुढे आजही काही आदर्श अथवा मानवतेच्या सेवेचे आणि मानव कल्याणाचे उद्देश मात्र कार्यरत नाही. तेच ते उद्देश धनप्राप्ती, प्रदेश प्राप्ती आणि सत्ता बळकावणे इ. अमानवी उद्देश प्राचीन काळात त्यांना युध्दासाठी प्रेरणादायी होते तेच ते

आजसुध्दा या सभ्य आणि प्रगत पाश्चात्यांना प्रेरणादायी आहेत. सामाजिक आणि सांस्कृतिक क्षेत्रात तसेच जीवनाच्या सर्व क्षेत्रांत नेत्रदिपक प्रगती करूनसुध्दा त्यांनी शिष्टाचाराच्या आणि व्यक्तीच्या आणि राष्ट्रांच्या चारित्र्यघडणीत मागासलेपणाच जतन करून ठेवला आहे. प्रगती झाली ती मात्र त्यांच्या युध्दसामर्थ्यांमध्ये आणि विध्वंसकतेच्या स्वरूपामध्ये! पूर्वी विध्वंस युध्दात जो होत होता त्याच्या शेकडो, हजारो नव्हे लाखो पटीने नव्हे तर अटॅमबॉम्बचा विनाश हा दसलक्ष पटीत अथवा त्यापेक्षा जास्त झाला आहे. हे निर्विवाद आहे की हेतु पवित्र आणि जनहिताचा नसेल तर हेतु साध्य करण्यासाठी वापरण्यात आलेले साधन कितीही चांगले आणि सुंदर असले तरी ते पुण्यशील ठरत नाही. पाश्चिमात्यांचा हा दावा आहे की जुन्या पाशवी युध्दनियमांना बदलून त्या जागी सभ्यतापूर्ण असे युध्दनियम बनविण्यात आले आहेत. याचा प्रचार इतक्या जोरात केला जातो की इतर जग त्यावर विश्वास ठेवू लागतो. परंतु या नियमांना ज्यांना आंतरराष्ट्रीय नियम म्हणतात त्यांना प्रत्यक्षात आणल्यानंतर त्यांचे आक्राळविक्राळ स्वरूप जगाने अनुभवले आहे. हे आंतरराष्ट्रीय नियम दुसरे—तिसरे काही नसून पाश्चात्यांच्या रूढी परंपरा आहेत. यांना नियमसुध्दा म्हणणे योग्य नाही. नियमांचे पालन हे सर्वांसाठी अनिवार्य आहे. परंतु युध्दात एखादे मोठे राष्ट्र अथवा राष्ट्रसंघ त्यांच्या लहरीपणामुळे अथवा शक्तीच्या बळावर अशा नियमांना धाब्यावर बसवतात. अशा आंतरराष्ट्रीय नियमांचे उल्लंघन वारंवार होताना जगाला अनुभव येत आहेत. युध्दाचे नियम अशासाठीच अनिवार्य ठरत नाही असे त्यांच्या विद्धानांचे मत आहे.

जगात एक चांगला तर दुसरा वाईट असे दोन प्रकार आहेत त्याच तिसरा प्रकार नसतो. पुण्य व पाप तसेच सदाचार विरुध्द दुराचार आहे. ह्याच नियमाने युध्दाचेसुध्दा दोनच प्रकार आहेत. एक युध्द ईशमार्गात लढले जाणारे युध्द आणि दुसरे सैतानी मार्गात लढले जाणारे युध्द! जगातील युध्दासंबंधी तिसरा प्रकार नाही. ईश (अल्लाह) मार्गात लढले जाणारे युध्द हे ईश्वर प्रसन्नतेसाठी म्हणजे जगात सदाचाराचा फैलाव व दुराचाराचा नायनाट करून मानवतेच्या कल्याणासाठी असते. याविरूध्द सैतानी मार्गात लढले जाणारे युध्द हे भौतिक फायद्यासाठी म्हणजे दुसऱ्याचा प्रदेश हडप करण्यासाठी, व्यापार वाढविण्यासाठी, सत्ता हस्तगत करण्यासाठी, शत्रुंला नष्ट करण्यासाठी केले जाते. या सैतानी मार्गातील युध्दात जगात शांती नांदू शकत नाही आणि पर्यायाने मानवतेचा विनाश अटळ असतो. म्हणून इरादा आणि हेतु कितीही चांगला असून भागत नाही. तर कार्यप्रणालीसुध्दा तितकीच चांगली आणि पवित्र असणे आवश्यक आहे. जगात अक्कलवान हे पाहतो की सांगणारा काहीही सांगो करणारा काय करीत आहे. पाश्चात्यांचे असली युध्द नियम ते नाही जे कागदावरची शोभा आहेत परंतु युध्दकाळात ते कशा प्रकारे कार्यवाही करतात यावरून त्यांचे खरे नियम

कळून येतात. इस्लामला पोटतिडकीने जिहादसंबंधी बदनाम करण्यासाठी, पाश्चात्यांचे याबाबत अंधानुकरण करणाऱ्यांनी थोडावेळ थांबून येथे आत्मनिरीक्षण करून घेणे त्यांच्या व त्यांच्या समाजाच्या हिताचे ठरेल. पाश्चिमात्य राष्ट्रांनी तयार केलेले हे नियम किंबहुना त्यांचे रीती-रिवाज आणि त्यांचे युध्दकाळातील महत्त्व काय आणि किती आहे? युध्द सभ्यता व शिष्टतापूर्ण लढले जावे यासाठी हे नियम किती सामर्थ्यशील आहेत? युध्दाला त्याच्या मर्यादेत ठेवण्यासाठी हे नियम किती उपयोगी सिध्द होतात? या प्रश्नांची उत्तरे तपशीलवारपणे आपण येथे पाहणे अपेक्षित नाही. एका वाक्यात सांगावयाचे झाले तर ज्यांना युध्द नियम म्हणून पाश्चिमात्य राष्ट्रांनी मान्यता दिली आहे ते मुळातच नियमात बसत नाही व ते नियम ही नाहीत. अशा या दूषित मानसिकतेतूनच पुढे कुरआन व हदीसचे संदर्भहीन पुरावे मन मानेल पध्दतीने सादर करून इस्लामचे तथाकथित सिध्दान्त व नियम पुढे करून जगाची दिशाभूल करणाऱ्यांचे दिवस संपत आले आहेत. जगाने आता त्यांच्याकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलला आहे. इस्लाम आणि इस्लामी जिहादचे वास्तव रूप ओळखण्यात पाश्चात्य जगाला आणि त्यांच्या आंधळ्या अनुयायींना आलेले अपयश हे आजच्या युगातील सर्वात मोठे वैचारिक अपयश म्हणून गणले पाहिजे.

# समारोप

जिहाद हे जगाच्या पाठीवरून श्रध्दाहीनांचे समूळ उच्चाटन करण्यासाठी केलेले सर्वंकष युध्द आहे, असा खोटारडा प्रचार पाश्चिमात्यांनी आणि त्यांच्या आंधळ्या अनुयायींनी जगभर केला आहे. इस्लामच्या विस्तारासाठी जिहाद हेच सर्वोकृष्ठ साधन बनले आहे हासुध्दा अनेक अपप्रचारांपैकी एक आहे. दुसरा महत्त्वाचा अप्रचार म्हणजे जिहाद हे दुसरे तिसरे काही नसून सशस्त्र युध्द आहे, हे युध्द चार प्रमुख कारणांसाठी लढले जाते. १) युध्दाच्या (तलवारीच्या) सहाय्याने इस्लामचा विस्तार, २) श्रध्दाहीनांचा नि:पात, ३) जिझियाप्राप्ती, ४) लूटप्राप्ती इ. इ. जिहाद करणे हे मुस्लिमांचे परमोच्च कर्तव्य असल्याचे कुरआन सांगतो. परंतु कुरआन व हदीसच्या शिकवणुकींवर दृढपणे व अढळपणे आधारित असा विशुध्द इस्लाम आधुनिक जगात कुठेही अस्तित्वात नाही, असा युक्तिवाद करून आपले काही देशबांधव "जिहादविरहित इस्लाम" मुस्लिमांमध्ये रूजविण्याचे स्वप्न पाहून आहेत. त्यांच्यामते इस्लामी सिध्दान्ताची शिकवण देणाऱ्या मकतब व मदरशांमध्ये दिले जाणारे शिक्षण सर्वांत मोठा अडथळा आहे. त्यांना या शिक्षणप्रणालीत आमूलाग्र सुधारणा करावयाची आहे कारण या मदरसा शिक्षण प्रणालीत आमूलाग्र सुधारणा केल्याशिवाय "जिहाद विरहित इस्लाम" अस्तित्वात येण्याची शक्यता खूपच कमी आहे. हा अडसर या देशबांधवांना हिमालय पर्वताहूनही मोठा आहे असे वाटते. इस्लामचा अभ्यास नि:पक्षपातीपणे न केल्याचा हा परिणाम आहे. त्यांना "जिहादविरहित इस्लाम"च्या चळवळीसाठी सध्या देशात व जगात असलेल्या इस्लामी शिक्षणपध्दतीत आमूलाग्र बदल आणि सुधारणा करावयाची आहे. अल्लाहने जिहादचे कर्तव्य आपद् धर्म म्हणून सांगितले आहे, हे मानणाऱ्या कट्टर मुजाहिदांना वर्तमानकाळातील शांतताप्रिय मुस्लिम उत्तर देऊ शकतो, अशी त्यांची धारणा आहे. या कामी शांतताप्रेमी मुस्लिमांचे सर्वात मोठे शत्रु त्यांचे धर्मपंडित नसून हिंदू व जगातील इतर समाजातून बहुसंख्येने आलेले तथाकथित निधर्मवादीच आहेत, अशी त्यांची ठाम समजूत आहे. इस्लामसंबंधी यांचे घोर अज्ञान कल्पनेपलीकडचे आहे. हे अज्ञान सार्वत्रिक आहे. अशा स्थितीत "परतोनी अज्ञान न ये घरा" या जिद्दीने इस्लामचा संदेश जगातील कानाकोपऱ्यात पोहचता करणे हे जागतिक शांततेसाठी अनिवार्य आहे. जगातील हे घोर अज्ञान आणि जगाचा बौध्दिक ऱ्हास समाप्त होण्यासाठी 'इस्लाम संदेश' ही नवसंजीवनी ठरणार आहे.

'जिहाद' या विषयाचा समारोप करताना मला आवर्जुन सांगावेसे वाटते की

इस्लामी विधी–नियम जे मानवनिर्मित नसून ईश्वरनिर्मित आहेत ते मानवनिर्मित पाश्चात्यांच्या नियमांपेक्षा अगदी श्रेष्ठ आहेत. मागील सर्व वृत्तांत आपल्या मन:पटलावर ताजा आहे. त्या अनुषंगाने इस्लामी विधी–विधानांचे श्रेष्ठत्व सिध्द होते.

१) आंतरराष्ट्रीय कायदे आणि विशेषत: युध्दासंबंधीचे कायदे हे मुळात कायदे नाहीतच! देशांच्या मर्जीवर त्यांचे अस्तित्व आणि कार्यप्रणाली अवलंबून असते. येथे कायदा हा निर्णय घेऊ शकत नाही की शासन पध्दती कशा प्रकारची असावी तर शासनप्रणाली निर्णय घेते की कायदा कसा असावा. शासन बदलताच कायदासुध्दा बदलतो. इस्लामच्या विधी–नियमांचे स्वरूप मात्र तसे नाही. इस्लामी विधीनियम हे खऱ्या अर्थाने विधीनियम आहेत. या इस्लामी विधीनियमांचा निर्माता तोच एकमेव आहे जो या सृष्टीचा निर्माता आहे. जो स्वयंभू आणि सर्वश्रेष्ठ आहे. त्याने श्रध्दावंतांना त्याच्या विधीनियमांत हस्तक्षेप करण्याचा अधिकार दिलेला नाही. इस्लामचे जे अनुयायी आहेत त्या सर्वांनी त्या नियमांचे काटेकोरपणे पालन करणे अनिवार्य आहे. ज्याने अल्लाहच्या आदेशांचे नियमांचे पालन केले नाही तर तो अवज्ञाकारी व द्रोही सिध्द होतो. दुसरीकडे मात्र पाश्चात्यांनी त्यांनी स्वयं:निर्मित नियमांचे पालन केले नाही तर कालांतराने ते नियम राहत नाहीत. परंतु इस्लामी विधीनियमांचे, आदेशांचे समस्त मुस्लिमांनी जरी पालन केले नाही आणि इस्लामच्या विरोधात आचरण करत राहिले तरी इस्लामी कायदेकानूच्या स्वरूपात किंचितही बदल होत नाही.

२) आंतरराष्ट्रीय कायद्यांमध्ये ज्यांना युध्दाविषयी कायदे संबोधले जाते त्यांची स्थिती तर अत्यंत बिकट आणि अविश्वसनीय अशी आहे. युध्दाच्या स्थितीनुसार त्यात बदल होत जातात. तसेच लष्करी आणि कायदेविषयक विरोध त्यांना आणखी बेकार बनवतो. कायदा एखाद्या वस्तूला कायद्याच्या कक्षेत आणतो तर लष्करी सत्ता त्यास कायद्या बाहेरचा ठरवते. एखादा कायदा तयार केला तर त्यावर लष्कर आचरण करत नाही. अशा प्रकारे कायद्याला निष्प्रभ बनविणे लष्कराच्या हातात असते. अशा प्रकारे युध्दाचे कायदेकानू हे कागदावरच राहतात आणि युध्दभूमितील लष्कराचा कायदा हा खरा कायदा ठरतो. परंतु इस्लामी युध्दाचे कायदे हे अपरिवर्तनीय असे आहेत. त्यात युध्दाच्या आवश्यक गोष्टींना लक्षात घेऊन सृष्टीनिर्मात्यानेच बनविले आहे. त्यांना आता जगातील कोणतीही शक्ती बदलू शकत नाही. इस्लामी लष्करातील जनरललाही हा अधिकार नाही की त्या ईशनिर्मित नियमात बदल, परिवर्तन घडवून आणावे. अथवा त्या नियमांपैकी काहींना मान्य करण्यास

कोणीही नकार देऊ शकत नाही.

३) आंतरराष्ट्रीय युध्दाविषयी कायदे हे लढणाऱ्या देशांच्या हितरक्षणासाठी आहेत. काही देश एकत्र येऊन तह करतात की युध्दाच्या वेळी अमुक अमुक नियमांचे पालन केले जाईल. या करारनाम्यात एखादा देश सामील नसेल तर त्यावर हे नियम पाळणे बंधनकारक नाही. जर एखादा सदस्य नियम धाब्यावर बसवत असेल तर इतर सदस्य देशसुध्दा नियम पाळण्यास त्याच्याविरूध्द मुक्त होतात. अशा प्रकारे युध्दाचे हे नियम काही नीतिनियमावर आधारित नसतात तर परस्परांच्या सोईसाठी असतात. एक सदस्य दुसऱ्या देशाशी चांगली वर्तणूक यासाठी करीत नाही की त्याला तसे वागणे नैतिकतेला धरून आहे. परंतु तो तशा प्रकारे यासाठी दुसऱ्या देशाशी सशक्त वर्तणूक ठेवतो की, दुसरा चांगला वागला तर हासुध्दा चांगला वागतो. दुसरा चांगला वागला नाही तर हासुध्दा चांगला वागत नाही. इस्लामी कायदा याच्याविरुध्द टोकाचा आहे. तो अशा स्वार्थी अटींवर कायम नाही. प्रत्येक स्थितीत इस्लामी विधीनियम पाळणे मुस्लिमांना अनिवार्य ठरते. ज्याला मुस्लिम बनून राहावयाचे आहे, त्याला कोणत्याही स्थितीत इस्लामी विधीनियमांचे पालन करणे अनिवार्य ठरते. इस्लामी कानून कोणत्याही मुस्लिम हा अधिकार देत नाही की त्याने इस्लामी कानूनचे आज्ञापालन करू नये. ही स्थिती पाश्चात्यांच्या स्वयंनिर्मित कानूनव्यवस्थेला लागू पडत नाही त्यामुळे त्यांचे आज्ञापालन न केल्यास ते नियम कालबाह्य आपोआप ठरतात.

४) हे पाश्चिमात्यांनी घालून दिलेले कायदे–नियम अगदी अलिकडचे म्हणजे १५०-२०० वर्षापूर्वीचे! अशा प्रकारे त्यांना तयार करून तसा जास्त काळ झालेला नाही परंतु इस्लामी कायदे तर १५०० वर्षांपूर्वीचे आहेत आणि ते मानवी सभ्यतेला आजतागायत सदृढ करत आलेले आहेत. या इस्लामी कायद्यांवर पाश्चिमात्यांच्या कायदेकानूचा तिळमात्रसुध्दा परिणाम झालेला नाही. एका शब्दाची वाढसुध्दा त्यामुळे इस्लामी कायद्यामध्ये झालेली नाही. तसेच इस्लामी कायद्यांमुळे पाश्चिमात्य कायदे–कानूनमध्ये काही सुधारणा झाली असे नाही. दोन्ही कायदेप्रणाली आणि विधीनियमांमध्ये मोठे अंतर आजसुध्दा आहे.

५) तसे पाहता पाश्चिमात्य कायदेकानूद्वारा काही मोजक्या कायद्यांतर्गत फक्त मनुष्याला पुढे ठेऊन त्याला स्वतंत्र करण्यात आलेले आहे. या सभ्य पाश्चिमात्य कायद्यांतर्गत मनुष्य आपल्या शक्तीला जिथे पाहिजे तिथे वापरात आणू शकतो. हा 'सभ्य' कायदा त्या मनुष्याला हेच सांगतो की दुसऱ्याला मारावयाचे असेल तर अमक्या पध्दतीने

मारावे आणि अमक्या पध्दतीने मारू नये. कोणत्या हेतुसाठी दुसऱ्याला मारावयाचे अथवा कोणत्या हेतुसाठी मारावयाचे नाही याबद्दल हा सभ्य कायदा मौन बाळगून आहे. या तथाकथित सभ्य आणि तथाकथित सुसंस्कृत पाश्चिमात्य संस्कृतीत दुसऱ्यांचा प्रदेश हडप करणे, स्वत:चा व्यापार वाढवणे, धनसंपत्तीची लालसा आणि वैश्विक लूटमारीच्या सैतानी महत्वकांक्षा युध्द करण्याला बाध्य होते. हा आजतागायतचा त्यांचा इतिहास आहे आणि त्यांच्या युध्दाचा तोच एकमेव हेतु आहे. हे ऐतिहासिक सत्य आहे. याविरुध्द इस्लाम मात्र आपल्या अनुयायींना लढाईची आणि युध्दाची सुसंस्कृत व मानवी पध्दतच फक्त शिकवत नाही तर कोणत्या हेतुसाठी युध्द करावे आणि कोणत्या हेतुसाठी युध्द करू नये हे अगदी स्पष्ट शब्दांत आदेशित करतो. या युध्द करण्याच्या उद्देशाला इस्लामने मनुष्याच्या मनावर आणि पसंतीवर सोडून दिलेले नाही तर त्यास विशिष्ट नैतिकतेच्या बंधनात जखडले आहे. ज्यातून बाहेर पडण्याचा मनुष्याला इस्लामने अधिकार दिलेला नाही. हा मूलभूत फरक मानवनिर्मित व ईशनिर्मित कायद्यातील आहे. मानवनिर्मित या कायद्यामुळे आज वैश्विक अनाचार, हिंसाचार आणि उपद्रव मानवी समाजात थैमान घालून आहे. या वैश्विक विनाशकारी समस्येवर उपाय फक्त आणि फक्त ईशकायदे (ईशनिर्मित विधीविधान) आहेत. मानवतेच्या मुक्तीचा एकमेव स्त्रोत! ह्याच कारणांमुळे इस्लामी कायदा आज पाश्चिमात्यांनी निर्मिलेल्या अथवा मानवनिर्मित जगातील इतर सर्व कायद्यांपेक्षा श्रेष्ठ, मजबूत, मानवी प्रवृत्तीस अनुकूल आणि फायदेशीर आहे.

याच तत्त्वांनुसार इस्लामी युध्दाचे (जिहाद) ईशनिर्मित विधीनियम हे जगातील इतर सर्व युध्दकायदे जे मानवनिर्मित आहेत, त्यांच्यापेक्षा जास्त मानवतावादी, जास्तश्रेष्ठ व मजबूत आणि मानवी स्वभावास जास्त फायदेशीर आणि अनुकूल आहेत, हे ऐतिहासिक सत्य जगाने अनुभवले आहे.

येथे अभ्यासक हा प्रश्न विचारू शकतो की पाश्चात्यांच्या विधीनियमांसाठी तुम्ही पाश्चात्यांच्या व्यवहाराला आणि त्यांच्या वागणुकीला पुढे ठेवतात मात्र इस्लामच्या बाबतीत मुस्लिमांच्या व्यवहार आणि वागणुकीला पाहिले जात नाही तर फक्त इस्लामी कायद्याचाच उदोउदो करताना दिसता. परंतु या पुस्तिकेतील मागे आलेल्या सर्व विवेचनाला अभ्यासकाने जर पुन्हा आपल्या मन पटलावर आणले तर याचे उत्तर आपोआप मिळते आणि शंकेचे निरसन होते. वस्तुस्थिती ही आहे की इस्लामी कायदे आणि मुस्लिमांचे वागणे अथवा वर्तणूक या दोन वेगवेगळ्या गोष्टी आहेत. विधीविधानामध्ये मुस्लिमांच्या मर्जीला

अजिबात वाव ठेवला गेलेला नाही अथवा त्यांच्या वागणुकीलासुध्दा विचारात घेतले गेलेले नाही. जेव्हा इस्लामी कायद्याच्या गुणविशेषाचा विचार होतो तेव्हा स्वाभाविकच अनुयायींच्या वागणुकीचा अथवा त्यांच्या वर्तणुकीचा प्रश्न निकालात निघतो. याविरुध्द पाश्चिमात्यांनी घडलेला कायदा आणि पाश्चिमात्यांची वर्तणूक या दोन वेगवेगळ्या गोष्टी नाहीत. पाश्चिमात्य कायद्याच्या जडणघडणीत पाश्चिमात्य लोकांच्या मर्जीचा आणि त्यांच्या वर्तणूकीचा, वागणुकीचा मोठा सहभाग आहे. या पुस्तिकेत अभ्यासक हे जाणून घेतो की युध्दाच्या नितीनियमासंबंधी पाश्चिमात्य रूढी–परंपरा (वर्तणूक) पुढे पुढे चालते आणि युध्दकायद्याला त्याचे अनुकरण करावेच लागते. हे सत्य या पुस्तिकेने थोडक्यात सिध्द केले आहे आणि वाचकाच्या सद्‌विवेकाबुध्दीला आवाहन केले आहे. अशा स्थितीत "परतोनी अज्ञान न ये घरा" ही जागतिक शांततेसाठी अनिवार्य अट आहे आणि याच एकमेव कारणामुळे जग आज पाश्चिमात्यांच्या वागणुकीकडे लक्ष ठेवून आहे.

**- समाप्त -**